# वैद्य दप्तरांतून निवडलेले कागद.

भारत-इतिहास-संशोधन मंडळ पुणें, पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ४९

## खंड ४

## १७४२ ते १७४९ अखेर

३७१, बुधवार पेठ, राममंदीर पुणें.



शके १८७१



किंमत ८ रुपये

# वैद्य-दप्तरांतून निवडलेले कागद

## खंड ४

( सन १७४२ ते ४९ अखेर )

संपादक :

शंकर लक्ष्मण वैद्य,

३७६ बुधवार पेठ, राममंदिर, पुणें.



शके १८७१



किंमत ६ रुपये

मुद्रक : अनंत कृष्ण कुलकर्णी, आनद प्रेस, १८२ सोमवार पेठ, सातारा.
प्रकाशक : शंकर लक्ष्मण वैद्य, ३७६ बुधवार पेठ, पुणे.

# अस्सल पत्रें पाहण्याचें महत्त्व



प्रत्येक सालांतील छापलेलीं अस्सल पत्रे जपून ठेवलीं आहेत. त्यांचा उपयोग पुढे लिहिल्याप्रमाणे होईल:—

१ त्या त्या सालांतील एखाद्या पत्राबद्दल शंका आली तर ती अस्सल पत्र पाहिल्यावर दूर होईल.

२ निरनिराळ्या ठिकाणचे अक्षरांचे वळण.

३ निरनिराळे शिक्के व मोर्तब यांचे आकार व त्यांतील मजकूर यांची माहिती त्यांचे अवलोकनाने होईल.

४ लिहिण्याची पद्धत–पत्राचा आरंभ, शेवट, संक्षिप्त शब्द, र, ल, वगैरे अक्षरांचे वळण, गळलेले शब्द लिहिण्याची पद्धत, निरनिराळ्या लोकांचे श्रीकार, इतिहासप्रसिद्ध लोकांचे अक्षरांचे वळण.

# परिशिष्ट

## आठ वर्षांच्या कागदाची सूची

यांत ज्या व्यक्तींची पत्रें बरींच आहेत त्यांचीच नावे घेतलीं आहेत.

ज्या व्यक्तीचा संबंध विशेष महत्त्वाच्या मजकुरात प्रामुख्याने आला आहे तिचा उल्लेख एखाद्याच कागदांत जरी आला असला तरी ती व्यक्ति ठेविली आहे.

ज्या व्यक्तीबद्दल माहिती मिळाल्याने वैद्य घराण्यांतील नात्याचे संबंध कळतात व त्यांची कर्तबगारी दिसून येते अशीं पत्रे घेतलीं आहेत. नोकर, चाकर, जासूद यांचीं नांवे बहुतकरून वगळलीं आहेत. पण भोसले, आंग्रे, प्रतिनिधि व सचिव, वगैरे संस्थानिक व सरदार घराण्यांतील कर्तबगार व्यक्ति बहुतेक वगळल्या नाहींत.

या सूचना तंतोतंत अमलांत आणल्या आहेत असे म्हणतां येत नाहीं, याचे कारण शरीरदौर्बल्य होय. विश्वनाथभट व बाळंभट यांना लिहिलेल्या पत्रांचे क्रमांक दिले नाहीत; कारण बहुतेक पत्रें त्यांच्याच नांवचीं आहेत; पण त्यांनी लिहिलेल्या पत्राचे मात्र दिले आहेत.

उणीव—प्रत्येक व्यक्तीबद्दल माहिती व कागदांतील त्या व्यक्तीबद्दल आलेला विषय हे देण्यास वेळ अपुरा पडला. रा. ब. सरदेसाई यांच्या रियासतींत ही स्तुत्य गोष्ट त्यांनीं होतां होईल तो अमलांत आणली आहे. आडनांवांवरून सूची त्यांनी दिलेली आहे.

# अर्पण पत्रिका



जन्म :
२३-१०-१८४५

मृत्यू :
८-३-१९२४

माझे चुलते

कै. ***रामकृष्ण माधवराव*** ऊर्फ ***नानासाहेब वैद्य***

यांच्यातील गुणसमुच्चयांची स्मृती म्हणून हा ग्रंथ अर्पण करीत आहे

— ग्रंथकर्ता

# पुरस्कार



प्रस्तुत 'वैद्य-दप्तरांतून निवडलेल्या कागदां'चा चौथा खंड **श्री. शंकरराव वैद्य** यांनी हांतरुणावरून संपादिला आहे, हे पाहून त्यांच्या चिकाटीचे व इतिहासलेखन-व्यासंगाचें फार कौतुक वाटते असे म्हणणे त्यांच्यापेक्षां लहान असणाऱ्यांना शोभणार नाही. तथापि श्री. वैद्यांचे उदाहरण लहान संशोधनेच्छु लेखकांनीं डोळ्यांपुढे अवश्य ठेवावे, इतके तें उत्कृष्ट आहे.

गुदस्तां २ रा व ३ रा खंड काढल्यानंतर या सालवार प्रकाशनपद्धतीमुळे पुढील सुमारे शंभर वर्षांतील वैद्य-दप्तरांतील कागदपत्रे प्रकाशित होण्यास अर्धा-पाव शतक तरी उलटेल अशी साधार भीति वाटून श्री. शंकरराव वैद्यांचे राष्ट्रीय वृत्तीचे कर्तबगार चिरंजीव **श्री. बाबूराव वैद्य** यांनीं आठ-दहा किंवा अधिकहि सालांतील महत्त्वाचीं तेवढींच पत्रे एकेका खंडांत प्रसिद्ध करण्याची योजना आंखून तिचा उपक्रम या खंडानें केला, ही फार चांगली गोष्ट झाली. पितृऋण प्रत्यक्ष पित्याच्या हयातींतच फेडण्याचाहि सुयोग यामुळें येणार आहे व इतिहासाभ्यासकांना फार काळ वाट पहात बसावें लागणार नाहीं. आम्ही श्री. बाबूरावांचे ही जबाबदारी पत्करल्याबद्दल अभिनंदन करतो. १७६१ च्या पानपतच्या संस्मरणीय प्रसंगापर्यंत पुढील खंडांत जी पत्रे येणार आहेत त्यांकडे आम्ही डोळे लावून बसलो आहोत.

या खंडांत इ. स. १७४२ ते १७५० पर्यंत म्हणजे शाहूच्या निधनकालापर्यंतचीं सालवार पत्रे छापलीं आहेत. पूर्वीप्रमाणेंच पत्रांखालीं इंग्रजी साराश व टीपा दिल्या आहेत. प्रारंभीं श्री. शंकररावांनी स्वतः सुमारे ६० पानांची प्रस्तावना लिहून तींत आपल्या संशोधनांतील शंका, कागदांची निवड करण्याची पद्धति, व पत्रातील महत्त्वाच्या प्रसंगांचें वर्गीकरण ही मोठ्या साक्षेपानें दिलीं आहेत. ही प्रस्तावना काळजीपूर्वक वाचल्यास प्रस्तुत खंडांतील ग्राह्यांश चटकन् समजेल.

नागपूरकर भोसले आणि पेशवे यांच्यांतील वितुष्टावर या पत्रांमुळे आणखी प्रकाश पडतो ( उदा., १७४२–१३; १७४३–१८; १७४५–१४ हीं पत्रें पहा ). तसेच रघूजीचा मुलगा शाहूनें दत्तक घेण्याचा विचार, पण पुढे तो बदलला गेला याबद्दलची कांहीं माहिती मिळते ( १७४७–२६; १७४९–९ ). मागील खंडातील चंदाखानाच्या मुक्ततेच्या खंडणीबद्दल दोन पत्रे ( १७४४–४२, ४३ ) यांत आहेत. भास्करराम कोल्हटकराप्रमाणेंच बंगाल, बिहारमध्ये पराक्रम करणारा ब्राह्मणवीर शिवभट साठे याच्याबद्दल उल्लेख सांपडतात ( उदा., १७४४–५७ ). ज्याच्या-बद्दलच्या अपुऱ्या माहितीमुळे ज्याची कर्तबगारी अद्यापि मुळींच कळलेली नव्हती,

गैरसमज मात्र दृढ होता त्या बापूजी नाइकाची कर्नाटकांतील मोहीम यांत वर्णिली आहे ( १७४७-२७ ).

अशा रीतीने मागच्याप्रमाणेच हाहि खंड महत्त्वाचा वाटेल. वैद्य घराण्याची भूषणावह परंपरा या चारहि खंडांवरून प्रतीत होते. ऐतिहासिक घराणीं देशांत कित्येक आहेत; पण श्री. शंकररावांप्रमाणे आपल्या घराण्याची महती व माहिती जनतेपुढें श्रम आणि पैसा यांचा निरपेक्ष व्यय करून ठेवणारे फारच थोडे 'कुलदीपक' आढळतात. तेव्हां श्री. शंकररावांचे ८० च्या घरातील जीवमान निरामय होऊन त्याना पुढील खंडांचे असेच संपादन करण्यास स्वास्थ्य आणि आयुष्य लाभो, ही आमच्याप्रमाणेच इतिहासाभ्यासकांची इच्छा असणार. ती परमेश्वरानें पुरी करावी.

कार्तिक कृष्ण १२
शके १८७१.

चिंतामण गणेश कर्वे,
चिटणीस,
भारत इतिहास संशोधक मंडळ.

---

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

प्रस्तावना लिहिण्यासंबंधानें कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं आपल्या ऐतिहासिक साधनांच्या खंडांत त्यांतील पत्रांस अनुसरून कांहीं लिहिलेच पाहिजे असा नियम ठेवला नाहीं. आतांपर्यंत मी मात्र प्रसिद्ध केलेल्या खंड १।२।३ मध्यें बहुतकरून त्यांतील पत्रांसंबंधीं वाचकास जास्त माहिती मिळावी अशीच प्रस्तावना लिहिली आहे.

२. आतां या खंडास प्रस्तावना लिहिण्यापूर्वी माझ्या कांहीं शंकांबद्दल जास्त माहिती मिळाली व कांहीं शंका अजून राहिल्याच आहेत त्याचे त्रोटक निवेदन करणार आहे. हें करतांना कांहीं सूचना कराव्या लागतील त्या मींही पाळल्या आहेत अशी खात्री देतां येत नाहीं. याचे कारण एकच कीं, मला या कामीं प्रकृतीचे अस्वास्थ्यामुळे पाहिजे तितका वेळ देतां आला नाहीं. असेही आणखी होण्याचा संभव आहे की, आतां जी माहिती लिहिणार ती पूर्वींच्या खंडांत येऊन गेल्यामुळे दुबार होईल, याबद्दल वाचकांनी क्षमा करावी.

३. कागद छापतांना, ते मूळ कागदांतील लिखाणाप्रमाणें छापणें, व्यक्ति व स्थले मोठ्या टाइपांत घालणे, मुद्रा (शिक्का व मोर्तब) यांतील मजकूर जशाचा तसा ओळीबरहुकूम छापणें, फाटलेला व न लागलेला मजकूर अशा (×) फुलीनें दाखविणें, कागदाचे उजवे बाजूस प्रथमतः पत्राची शक–मिति व त्याचेखालीं इंग्रजी तारीख देणे व मराठी पद्धतीनें इंग्रजी तारीख देतांना महिना अगोदर देऊन पुढे तारखेचा आंकडा घालणें, कागदास तारखेप्रमाणें अनुक्रम देणें, आरंभींचा शिक्का व समाप्तीचा मोर्तब यांच्या आकाराचें वर्णन श्रीकाराचे डावे बाजूस देणे, लेखकाचें स्वतःचे अक्षर या (+) फुलीनें दाखविणे या गोष्टी होतां होईल तों पाळल्या आहेत. वंशावळ देतांना व्यक्तीच्या जन्ममरणाच्या तारखा व स्त्रीचें नांव देऊन माहेरचें आडनांव पूर्वींच्या खंडांत दिले आहे.

४. कागदांत श्रीकाराच्या उजवे बाजूस कागदांचा काल देतांना शालिवाहन शकाप्रमाणें प्रथमतः शक–मितीसच प्राधान्य दिले आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं आपल्या ‘कालगणन’ या निबंधात या शकासच कां महत्त्व द्यावे याचा ऊहापोह केला आहे. त्यांच्या निबंधांतील कांहीं भागाचा कारणापुरता थोडासा उतारा खालीं देत आहे.

“देशांतील सर्वमान्य कालगणनेची ओळख बुजून जाण्याला इंग्रज लोकांचें हें परदेशी शिक्षण कारण झालें आहे. ह्या विचित्र शिक्षणानें स्वेतिहासाशीं व

स्वकालगणनेशीं आपण पारखे बनत चाललो आहो. नवीन इसवी सनाचा अज्ञानानें आदर केल्याने २५ वर्षांपूर्वीच्या आपल्या इतिहासाची नीट ओळख आपल्यास पटत नाहीं. पूर्वीचा एखादा प्रसंग अमुक शकांत व संवत्सरांत झाला असे सांगितलें किंवा लिहिले तर अलीकडील इंग्रजी शिक्षकांस कालाचा बोध जसा व्हावा तसा होत नाही. ते कावरेबावरे होतात. शालिवाहन शकाचा जेव्हां इसवी सन करावा तेव्हां कालाचा बोध त्यांना झाल्यासारखा वाटतो. तिथीपेक्षां तारखांची ओळख जलद पटते, व अमावास्या–पूर्णिमेपेक्षां रविवार हा अनध्यायाचा व विश्रांतीचा दिवस चटकन् ओळखतां येतो; शास्त्रदृष्ट्या पाहिले असतां तिथि, चैत्रादि चांद्रमास व शकादि सौर-संवत्सर, तारीख, जानुआरी वगैरे महिने व खिस्ती सन, ह्यांपेक्षां कोणत्याही प्रकारे गौण आहेत असा प्रकार बिलकुल नाही. उलट इंग्रजी कालगणनेपेक्षां आपली शालिवाहनी कालगणना सहस्रपटीनें जास्त सशास्त्र आहे. आपले महिने चांद्र असून वर्ष सौर आहे, यामुळे भूमंडळांतील जे मोठे दोन दिवे त्यांच्या दैनंदिन गतीशीं आपल्या तिथि, मास व वर्ष यांची जुळणी मोठी सशास्त्र व सुंदर बसली आहे. ही सुंदर जुळणी टाकून वाटेल तेव्हा, केव्हां तरी सुरू होणाऱ्या इंग्रजी तारखांचा व महिन्यांचा आपण अभिमान बाळगावा हा शुद्ध अडाणीपणा आहे... निदान आपण तरी ही आपली जुनी सुंदर व सशास्त्र पद्धत सोडण्याचा आचरटपणा करूं नये. या आचरटपणाने पूर्वेतिहासाशीं आपला संबंध तुटतो तो तुटूं नये हा तर आपणां सर्वांचा हेतु आहे...शास्त्र, युक्ति, पूर्वापारसंबंध व अभिमान या सर्वांचे पक्षपातित्व शालिवाहन शकाकडेच आहे. मुसलमानांचे राज्य या देशावर कैक वर्षे होते. परंतु आपल्या पूर्वजांनी शालिवाहन शकाला, तिथींना, महिन्यांना सोडलें नाही. त्यांच्या-प्रमाणेंच आपणांला ती सोडण्याचे कांहीं एक कारण नाहीं. आज दोन हजार वर्षे परकीयांचीं राज्ये ह्या देशावर अधून मधून होतात व जातात; परंतु शालिवाहन शक कायमचा आहे तो आहे. तेव्हा ह्या ध्रुव गोष्टीला सोडून अध्रुवाच्या मागे कां बरे लागावे?" हा अस्सल सर्व निबंध मिळवून वाचकांनीं वाचावा अशी विनंति आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तरी इसवी सनास फाटा देऊन या शालिवाहन शकाचा प्रघात सरकारकडून कां केला जाऊं नये?

५. या खंडांत १७४२ ते १७४९ चे कागद छापण्यास घेतले आहेत. आतांपर्यंत छापलेल्या खंडांत एकेका सालचे कागद छापले आहेत व त्यांची प्रत्येकी संख्या १०० पर्यंत आहे. असे प्रत्येक सालचे निरनिराळे खंड छापण्यास घेण्याचा विचार प्रथमतः होता; पण यास लागणाऱ्या खर्चाचे मान व छापण्याची अडचण व माझें वयमान ही लक्षात घेतां, आतांच ४ पुस्तकांचा खर्च रु. २५०० पर्यंत झाला आहे, या मानाने पानिपतपर्यंतचें आणखी १९–२० खंड छापून काढण्यास लागणारा खर्च मी करणे कठिण आहे. छापण्याच्या अडचणी व लागणारा वेळ लक्षांत घेतां व माझ्या प्रकृती-कडे पाहतां, पुढे कागद छापणें बंद करावे कीं काय असा प्रश्न उपस्थित झाला.

लागवणकर वैद्य यांचा कुलवृत्तांत लिहावयाचा आहे, पण हे कागद ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे असल्यामुळे १७४९ पर्यंतच्या कागदांतील अगदीं महत्त्वाचे कागद निवडून काढून तेवढेच ८ वर्षातील शाहूअखेर ( १७४९ ) पर्यंतचे छापून काढावे असे ठरविलें. ही निवड रा. यशवंतरावजी फफे यांजकडूनच करविली. कारण त्यांतील कागदांच्या नकला वाचून तपासतांना त्यांनीं मदत केल्यामुळे, कागद महत्त्वाचा कोणता हें त्यांस कळणे सुलभ होते. हें काम त्यांनीं आपला वेळ मोडून आस्थेने करून दिले. चि. बाबुरावांनींही निरनिराळ्या छापखान्यातून ते कागद छापून घेण्याची खटपट केली व मला प्रुफे तपासून ही प्रस्तावना लिहिण्यापुरती शक्ति राहिली, म्हणून हा खंड बाहेर पडत आहे. असा प्रसंग येऊं नये व सर्व कागद छापले जावे असा सरकारशीं पत्रव्यवहार करून खटपट केली व ती अजून साध्य झाली नाही. तेव्हां वगळलेले ८ वर्षांचे कागद व १७५० पासून पुढील कागद निवडून तारखा लावून नकलेले कागद यांची वाट काय होईल व माझे दप्तर कोणाच्या ताब्यांत जाईल हें मला आतां कांहीच सांगतां येत नाहीं. ते चि. बाबुरावच ठरवितील.

६. या खंडांत देवालयाचे व हिशोबाचे कागद फारच थोडे सांपडतील. निरनिराळ्या छापखान्यांस निरनिराळ्या सालाचे कागद छापण्यास द्यावे लागल्यामुळे त्या त्या सालचे व कागदाचे क्रमांक निरनिराळेच देणें भाग पडले. प्रत्येक सालचे कागद ५०।६० पेक्षां जास्त नसल्यामुळें निरनिराळीं सालवार पुस्तके न बांधतां आठही सालाचे एक पुस्तक बांधून त्याचा खंड ४ म्हणून छापून काढण्यांत येत आहे. ८ सालांची एकच व्यक्ति व स्थलसूची तयार केली आहे. मदतीची व शक्तीची उणीव पडल्यामुळें कागदांच्या तारखा, शुद्धलेखन, कागदाचा इंग्रजी सारांश व सूची यांत चुका राहिल्या असतील त्याबद्दल वाचकांनी क्षमा करावी. दोन्ही सूची रा. कृष्णाजीपंत पेडसे यानीच दिल्या याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

७. आतां कांहीं शंकास्थानांचा उल्लेख करून कागदांच्या निवडीबद्दल कांही अनुभव देणार आहें. नंतर प्रत्येक सालातील कागदाचा खुलासा पूर्वीच्या खंडांत केल्याप्रमाणे करणार आहे.

( १ ) कांही हिशेबांत रेघांत आणे पै लिहिल्यावर आण्याच्या दोन्ही बाजूंस टिंबें दिलेलीं असतात उ. ।।। ≐ हीं सर्वच ठिकाणीं असतात असे नाही. केव्हां टिंबे द्यावीं याबद्दल कांहीं नियम समजला नाही.

( २ ) रकमांची बेरीज केल्यावर नुसत्या रुपयांत बेरीज आली तर तिच्या पुढे तुटके आळे दिलेले असतें. हा नियम नेहमींच पाळला जातो असे नाही. याबद्दलही नियम समजला नाही.

( ३ ) वाक्याच्या शेवटीं 'ऊ' कारांत क्रियापद आले तर त्या 'ऊ' वर आपण नेहमीं अनुस्वार देतो. पण कांहीं कागदात ऊवर अनुस्वार न देतां त्याच्या

पुढे ' न ' असें अक्षर घालतात. उ०, देऊं व देऊन यांचा अर्थ एकच आहे. पण केव्हां अनुस्वार द्यावा व केव्हां तो न देतां पुढे ' न ' अक्षर घालावे याबद्दल कांहीं नियम असल्यास कळला नाहीं.

( ४ ) कांहीं घराण्यांच्या वंशावळींत पुरुषांचीं नांवे राममानी, नारमानी, पीलमानी, केसमानी अशीं आहेत. यातील मानी या प्रत्ययाचा अर्थ कळत नाही. मानी म्हणजे महाजन असें रा. शंकरराव जोशी म्हणतात. पण यास आधार नाही. तो कळणे जरूर आहे. ( कोलटकर व लिमये कुलवृत्तान्त पहा. )

( ५ ) पुंडलीक नाईक रास्ते यांचीं पत्रें बरींच आहेत; पण गोखले–रास्ते घराण्याच्या कुलवृत्तान्तांत त्यांचे नांव नाहीं. वैद्यांशी त्यांचा पुष्कळ देवघेवीचा व्यवहार होता. हे रास्ते कोण समजत नाही.

( ६ ) बाबुराव भोसले यास खंड २ पृ. ३४ मध्ये वैद्यांनीं पैसे दिल्याचा उल्लेख आहे. ह्यास ब्राह्मण म्हटले आहे हे चमत्कारिक वाटण्यासारखे आहे. पण यांचेच एक पत्र आहे त्यांत त्यानीं ' दंडवत ' शब्द न वापरतां ' नमस्कार ' शब्द लिहिला आहे ( १७४४ नं. ५४ पहा ).

( ७ ) एका पत्रांत ' काणे ' व ' कानडे ' यांचें नातें होते असे म्हटले आहे. एक कोकणस्थ व दुसरे यजुर्वेदी देशस्थ, याचे नाते कसें झाले ?

( ८ ) डबीर म्हणजे सुमंत. अष्टप्रधानांत यांचे नांव आहे. हणमंते घराण्याकडे हा हुद्दा होता. पुढे तो आनंद रघुनाथ भोपळ्यास गेला, असें अष्टप्रधानाच्या मिड्याच्या इतिहासात म्हटले आहे. पण आनद रघुनाथ सुमंत असे नांव पे. द. १७· १६०, पे. द. २०·१०, पे. द. २२· ३·३००. यात असा उल्लेख पुष्कळ वेळां सन १७४० पूर्वी आलेला आहे. पे. द. ३०.३६०, ३६१ मध्यें याचे आडनांव जगदळे असें दिले आहे. यावरून भोपळे व जगदळे ही आडनांवे एकच असावी असा संशय येतो. जगदळे मराठ्यात आडनांव आहे तेव्हां भोपळे हे नांव जरी ब्राह्मणांत आहे तरी ते मराठ्यांतही असण्याचा संभव आहे. कदाचित् १७४९ पूर्वी जगदळे सुमंत असतील व नंतर भोपळे १७४९ त सुमंत झाले असतील. दोघाच्या वंशावळी पाहिल्या तर आनंदराव रघुनाथ हे नांव दोहोत आहे. जगदळे यांचा सुमंत म्हणून उल्लेख निजामवरील स्वारींत पुष्कळदां आला आहे. रा. ब. सरदेसाई म्हणतात कीं, मोडी वाचतांना ' भोपळे ' हा शब्द चुकून ' जगदळे ' वाचला गेला असेल. हणमंते घराण्याबद्दल माहिती वै. द. खड १ मध्ये पान ३ वर व पु. खंड १ पान २४ च्या प्रस्तावनेत दिली आहे.

( ९ ) सिदखेडच्या जाधवांचा शिवाजीमहाराजांपासून बऱ्याच वेळां छत्रपतीशीं नात्याचा संबध आला आहे. तेव्हां या घराण्याची वंशावळ पाहून त्यांच्या धडाडीबद्दल व कुशलतेबद्दल कौतुक वाटते. रा. ब. सरदेसाई यांनीं मराठी रियासत, राजाराम पृ. १३४ मधील टीपेत जगदेवराव जाधवाचा मुलगा बहादुरजी व त्याचा

मुलगा मानसिंग असें म्हटले आहे व म. रि. बाजीराव पान ६४ मध्ये जगदेव-रावाचा मुलगा रघूजी हा मुबारिजखानाचे युद्धांत पडला असे लिहिले असून त्याचा मुलगा मानसिंग असे लिहले आहे ही दोन विधाने परस्परविरोधी आहेत. तेव्हा जगदेवरावाचा मुलगा रघूजी का बहारहुजी अशी शंका उत्पन्न होते.

( १० ) वै. द. खंड ३ कागद नं. २० मधील ' वल्लभसुंदर व राजापुरीवाला ' कोण हे अजून समजले नाही.

( ११ ) पत्राचे आरंभीं लेख्याचे नांव लिहिल्यावर लेखक खालीं ' अखंडित लक्ष्मीआलंकृत ' लिहिण्यापूर्वी ' द ' असे किंवा ' छ ' वळणाचे अक्षर लिहून त्याच्या डोक्यावर लपेटीदार रेघ देतो. हे अक्षर हेमांडपती ' दाा ' असल्याचे कै. राजवाड्यांनी लिहिलेले भा. इ. सं. मंडळाच्या शके १८३२ च्या अहवालांत पान ६ वर छापिले आहे. कधीं कधीं या अक्षराच्यामागे उभ्या दोन रेघा ( ।। ) असतात. ' अखंडित लक्ष्मी 'च्यापुढे रिकामी जागा ठेवलेली असते. तेथे लेख्याचे नांव असावयाचे. रिकामी जागा लेख्याचे सन्मानार्थ ठेवितात व पुढे लेखक आपणास ' स्नाो ' म्हणून आपले नांव लिहितो ही गोष्ट नवशिक्यास ठाऊक नसते.

( १२ ) कांहीं व्यक्तींचे शिक्के व मोर्तब यांचा आकार व त्यांतील मजकूर यांत फरक दिसून आला. हे दाखविणारे कागद छापण्यास घेतले आहेत. शिक्क्यां-तील श्रीच्या डाव्या व उजव्या बाजूस चंद्र व सूर्य काढलेले असतात, पण कधीं डाव्या बाजूस सूर्य असतो तर कधी उजव्या बाजूस असतो असा फरक केव्हा असतो कळत नाही.

( १३ ) तसेच शिक्यांतील कांहीं अक्षरें उलटीं कोरलेली असतात. स्वतः शिक्का वापरला तर त्या शिक्क्यात अक्षरे उलटीं नसतात. पण मुखत्यारानीं तो वापरावयाचा तेव्हां उलटीं अक्षरे असलेला शिक्का वापरतात असे सागण्यांत येतें. यास लेखी आधार नाही.

( १४ ) भास्कर राम कोलटकर याचा खून झाल्यावर त्याची बायको ताईबाई काशीस गेली. ती गरोदर होती. तिला तेथे मुलगा झाला. त्याचें नांव काशीराव ठेविले होतें असे म्हणतात. या वेळीं काशीरावाचा जन्म झाला नसावा असे त्याचीं पत्रें ४।५ वर्षांत लिहिलेलीं सांपडतात व त्यांत राजकीय विषयांचा व देव-घेवीचा उल्लेख आहे, म्हणून तो पूर्वीच जन्मला असावा असें वाटतें. हीच शंका रा. ब. सरदेसाई यांनीं माझी पत्रे वाचून एका लेखांत प्रदर्शित केली आहे. तो असा :

If Kashirao Bhaskar who frequently occurs in these papers, is Bhaskarram Kolatkar's son, born after his murder in 1744, than he must be a child : But he is a grown up man, doing various jobs. He must have been born much earlier. Sd./ G. S. S.

( १५ ) म. रि.-राजाराम, पृ. ९० मध्ये राजारामाच्या बायकामुलांत मुली मुळींच दिल्या नाहीत. म. रि.-बाजीराव पृ. ६४ मध्ये राजारामाची मुलगी अंबिकाबाई जाधवाकडे दिल्याचे लिहिले आहे. ही मानसिंग जाधवाची आई म्हणजे रघूजीची स्त्री होय. हीं विरुद्ध विधानें दिसतात.

९. पेशवे दफ्तरातील कागदांची निवड रा. ब. सरदेसाई यांनीं केली. त्या मानाने माझी निवड कमी दर्जाची वाटणार नाही. कांहीं सकृद्दर्शनी किरकोळ वाटणाऱ्या कागदाची खालील गोष्टींबद्दल महत्त्व वाटून निवड केलेली आहे.

( १ ) लेखक किंवा लेख्य महत्त्वाचे असून त्यांच्या संबंधाच्या एखाद्या कागदांत तारखेची निश्चिति होत असेल तर इतर बिनतारखेच्या कागदास योग्य तारीख देता येते.

( २ ) कांहीं शब्द संक्षिप्त लिहिलेले असतात उ. बा, दि॥, ता, पा, रुये, वाो, इ. याचे अर्थ स्पष्ट दिलेल्या कागदांची निवड केली आहे. एका संक्षिप्त शब्दाचा संदर्भाने निरनिराळा अर्थ लावावा लागतो.

( ३ ) सध्यां एखाद्या शब्दाचा अर्थ ज्याप्रमाणे केला जातो त्याच्या उलट किंवा चमत्कारिक अर्थ कागदात होत असेल तर त्याची निवड केली आहे. सुमार म्हणजे निश्चित, ठाम. नेहमींचा अर्थ 'अदमास' येथें नाहीं.

( ४ ) एखाद्या महत्त्वाच्या गांवचे पाटील, प्रांताचे सुभेदार, प्रसिद्ध व्यक्तीचे दिमत, मुखत्यार, दिवाण, मुतालिक, सरदार, वगैरे नावांचा उल्लेख ज्यांत आहे असे कागद निवडले आहेत.

( ५ ) अपरिचित आडनावे, गांवे, चटकदार, प्रभावी भाषा, म्हणी ज्यांत आहेत असे कागदही निवडले आहेत. 'मामलत आणि कन्या राहत नाहीं.' ही म्हण भगवंतराव अमात्याच्या पत्रांत आहे.

( ६ ) हिशोबाचे कागदांचे महत्त्व रा. ब. सरदेसाई यांनीं वै. द. खं. १ मध्ये आपल्या अभिप्रायांत वर्णिले आहे. तसेच रा. नानासाहेब चापेकर यांनी 'पेशवाईच्या सावलीं'त असा एक उपयुक्त ग्रंथ तुळशीबागवाले, बिवलकर, चिपळुणकर व वैद्य यांच्या हिशोबाच्या पुडक्यांतून मिळालेल्या माहितीवरून लिहिला आहे. त्यास अनुसरून मीं कांहीं हिशोबही दिले आहेत. मजपाशीं पुष्कळच सालचे—दीडशे सालचे—हिशोब आहेत ते मला पाहण्यास वेळ झाला नाही. कांही फेरिस्ते माणसांच्या नांवांचीं, कपड्यांची, कर्जदारांच्या नांवांची, इनाम-सनदांचीं आहेत. त्यांपैकी कांही या कागदांत निवडलीं आहेत.

( ७ ) कांहीं कागदांत पूर्वीच्या पत्राचे मायने, चालीरीती, निरनिराळे श्रीकार असल्याचें दिसून येईल. कळावे लोभ असावा हे वि. या वाक्यानें पत्राचा शेवट होतो.

( ८ ) देवघेवीच्या व्यवहारात हुंड्या, चिठ्या, वराता, रोखे, हवाले, वगैरेचा उपयोग कसा होतो हें दाखविणारीं हिशोबी पत्रेही आढळून आलीं, तीं दिलीं आहेत.

( ९ ) जुन्या पत्राचे लिखाणांत जोडाक्षरे टाळण्याची, रुपयांचे आंकडे देऊन ते अक्षरीं लिहिण्याची, शब्दांची द्विरुक्ति करण्याची प्रवृत्ति असते. उ., 'पैक्याविशी = पैकियाविसी', 'रुपये ४ चार', 'कोन्हेररामांनीं असे सांगितले कीं, मी पांडेवाडीस जातों असे सागितले.' हे दाखविणारे कांहीं कागदही देण्यांत आले आहेत.

( १० ) शिलकचंद, ताळेचंद, खतावण्या, कीर्दी, जिन्नसांचे जिन्नसांतच जमाखर्च, पूर्वी कसे लिहीत हे दाखविणारे कागद निवडलेले दिसून येतील.

( ११ ) प्रसिद्ध घराण्याच्या कुलवृत्तांतास उपयोगी पडतील असे कांहीं कागद छापण्यास निवडले आहेत. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कुलवृत्तातांत वैद्य दफ्तरांतील कागद मिळाल्याचा उल्लेख आहे.

( १२ ) कांहीं पत्रें आरंभापासून शेवटपर्यंत प्रसिद्ध व्यक्तींनी स्वतः लिहिलेलीं सांपडली. त्यांचीं अक्षरे कळण्यासाठीं तीं छापलीं आहेत. उ., रघूजी भोसले, तुळोजी आंग्रे, दिवाकर पुरुषोत्तम, विश्वनाथभट वैद्य, इ. यांतील मजकूर महत्त्वाचा असेलच असे नाहीं.

## ( १७४२ )

( अ ) सनदा व आज्ञापत्रे नं. १ ही वंशपरंपरेची वक्तृत्वाची सनद वैद्यांना महाराजांनीं कोकणांतील ११ महालांची ( सरदेशमुखी व मोकदमी ) मार्गशीर्षांत दिली व पौषांत आज्ञापत्रे पाठविली. अशा तऱ्हेची सनद खंडकर यास दिलेली खंड १ मध्यें छापलेली आहे. वैद्यांना या वतनामुळे कोणते हक्क मिळाले हें यांत दिलें आहे. सध्यां हीं वतने वैद्यांकडे चालू नाहींत. या सनदेचा अमल बरोबर व्हावा म्हणून या वतनपत्राच्या १४ नकला करून, महालांच्या देशमुख–देशपाड्यांस, देशाधिकारी, कदीम, वर्तमान व भावी सुभेदारांस व संभाजी आंग्रे यांस आज्ञापत्रे पाठविलीं आहेत. नं. २ ही वंशपरंपरेची सनद वैद्यांस भोर संस्थानांतील जांभळी, ता. राजगड हा गांव इनाम दिल्याबद्दल आहे. हा गांव वैद्यांकडे अजून चालत आहे. खंड २ च्या प्रस्तावनेच्या दुसऱ्या पानांत 'सनदा व आज्ञापत्रे' या सदरांत दोहोंमधील फरक, भाषा व त्यांचे महत्त्व याबद्दल सविस्तर माहिती दिली आहे. इनामदारांस दिलेल्या सनदेची अमलबजावणी होण्यासाठीं वतनदारांस आज्ञापत्रे जातात, त्यांत देशाधिकारी व कारकून वर्तमान व 'भावी' यासही पत्र आहे. त्यांतील 'भावी' शब्दाच्या अर्थावरून ही सनद यावच्चंद्र दिवाकरौ चालली पाहिजे

असा व्यापक अर्थ लक्षांत घेतला पाहिजे. नंबर १ च्या पत्रांत भावी सुभेदार असा शब्दप्रयोग आहे. यासंबंधीची वतनदारास दिलेलीं आज्ञापत्रे दप्तरांत आहेत तीं याच मजकुराची असल्यामुळे छापली नाहीत. सनदेची ता. १२ । १ । ४२ आहे व आज्ञापत्राची १३ । १ । ४२ आहे. हा सचिवांचा मुलूख असल्यामुळे चिमणाजी नारायणासही आज्ञापत्र आहे. महाराजांच्या सनदा व आज्ञापत्रे यांच्या शेवटीं 'लेखनालकार' शब्द असून मोर्तबही असतो. सही किंवा स्वतःचे अक्षर नसते.

(आ) ताकिदी :—या सालात शाहूमहाराजानीं दिलेल्या ताकिदी आहेत. या सर्व वैद्यांच्या कर्जफेडीबद्दल आहेत. नं. ५ मध्ये मल्हारराम यास ताकीद आहे. नं. ३२ मध्यें सचिवांनी वैद्यांकडून घेतलेले कर्ज फेडण्यासाठीं सिंहगड, राजगड, प्रचंडगड व विचित्रगड येथील हवालदार व कारकून यांस मावळ प्रांताचा खालशाचा अमल कर्ज फिटेपर्यंत वैद्यांशिवाय कोणास देऊं नये अशी ताकीद आहे. हें वसुलीचे काम सिलिमकरांचे होते. नं. ३८ मध्ये लासुर्णे समत कोरेगांव या गावचा मोकासा, त्या गांवच्या मोकदमांनीं महादाजी गदाधर अमात्याचा जरी असला तरी तो त्यांनी वैद्यांकडून घेतलेले कर्ज फिटेपर्यंत अमात्यांना न देतां वैद्यासच द्यावा अशी ताकीद आहे. वै. द., पु. खं. १ मध्यें अमात्यांनीं अशा प्रकारचे पत्र त्याचा कमाविसदार केशवराव मल्हार यास लिहिलेलें आहे. नं. ३ हे तुळोजी आंग्रे याचे पत्र वैद्यांस असून महाराजांनीं संभाजी भोसले यास साताऱ्यास येण्याबद्दल लिहिलेल्या ताकिदांचा त्यांत उल्लेख आहे. नं. ५ मधील पत्राच्या शेवटीं महाराजानीं 'छ छ' अशीं अक्षरें घातली आहेत त्यांचा अर्थ समजत नाहीं.

(इ) पत्रे (वैद्यांस लिहिलेली)—[ १ ] नं. ७ या पत्रांत राजाराम छत्रपतींची कन्या अंबिकाबाई जाधव (मानसिंगाची आई) हिने जाधवांचा वाडा औरंगाबादेस असलेला गहाण होता तो सोडविण्यासाठीं महाराजांनी पंतप्रधानास १२,००० रु. देण्यास सांगावे, अशी वैद्यांस विनंति केली आहे. महाराजांनी औरंगाबादचा वकील रा. शामजी गोविंद टकले याजकडून याबद्दल चौकशी केली होती. गहाण सोडविण्याचा करार चैत्रात संपत होता. राजाराम छत्रपतींची अंबिकाबाई नांवाची बायको खानविलकराकडील होती. त्यांस आणखी चार बायका होत्या. जाधवाकडे दिलेली त्यांची कन्या अंबिकाबाई कोणत्या बायकोची समजत नाहीं. नं. १५—प्रतापजी सोमवंशी (संताजीचा मुलगा) यांनीं मौजे ढोरज हा गांव चिंचवडचे मोरया गोसावी यांजकडे दिल्याबद्दल छत्रपतिमहाराजांची सनद मिळवावी अशी वैद्यांस विनंति केली आहे. वैद्यांचे शब्दांस महाराजांजवळ किती मान होता याचे हे पत्र द्योतक आहे. नं. ३३ हे पत्र भोर संस्थानातील गडांचा हवालदार बाजी साबाजी पासाडकर याने मावळ प्रांताचा खालशाचा अमल, महाराजांनी जरी आपल्याकडे दिल्याबद्दल आज्ञापत्र पाठविले आहे. तरी यंदांची अवर्षणामुळे झालेली पिकाची दुःस्थिति लक्षांत घेऊन वसूल करावा अशी विश्वनाथभट वैद्यांस विनंति केली आहे.

(नं. ३२ मधील ताकीद पहा). आईदरी शब्दाचा अर्थ कळत नाहीं. कोशांत अर्थ नाहीं. पासलकरांना 'यशवंतराव' हा किताब होता. नं. ३६ हें पत्र याकूतखानाचा वैद्यांबद्दल पूर्ण विश्वास असल्याचें दर्शवितें. यांत पुष्कळ पर्शियन शब्द आहेत. त्यांचे अर्थ टीपेंत दिले आहेत. याकूतखान हा मुहमतशहा बाहशहाचा नोकर होता. त्यास वैद्यांच्या विश्वासूकपणाबद्दल वकील शेख महमदअल्ली याने माहिती दिली होती. नं. ४१ हें पत्र राणी सौ. सकवारबाईनीं वैद्यांना मातुश्रीचे दुःखशमनार्थ लिहिलें आहे. मातुश्री पौष शु० १ स वारल्या. त्याचे दुसरे दिवशीच हे लिहिले आहे त्यावरून वैद्य घराण्याबद्दल राणींचें प्रेम व्यक्त होतें. नं. ३५ हे पत्र तुळाजी आंग्रे यानें आचऱ्याचे देवास राणीसाहेबांस दुखण्यास उतार पडावा म्हणून केलेल्या प्रयत्नाची हकीगत लिहून वैद्यांना पाठविले आहे.

(वैद्यांनीं लिहिलेलीं) [ २ ]—नं. २६ यांत वैद्यांनीं याकूतखानास महाराजांजवळ आपल्यासंबंधीं योग्य ती बाजू मांडीत असतो, असें महमदअल्लीबरोबर लिहून कळविलें आहे.

वैद्यांचा आणखी पत्रव्यवहार प्रसिद्ध व्यक्तींबरोबर असल्यामुळे त्यांनीं पाठविलेल्या व त्यांस आलेल्या पत्राचा उल्लेख त्या व्यक्तींच्या पत्रांत होईल.

इतर पत्रें [ ३ ]—नं. ३४ मध्ये राणी सौ. सगुणाबाई या सालींही आजारी होत्या त्यांस उतार पडावा म्हणून आचरे येथें अनुष्ठान सुरू केले होतें त्याचा उल्लेख शके १६६४ च्या जमाखर्चात आहे. तोच उल्लेख या पत्रांत आहे. पण लेख्य व लेखकाचा बोध होत नाहीं. शंकराजी गोविंद कोणाचा मेव्हणा? याच नांवाचा उमरखेडचा वैद्यांचा कारकून होता त्याचे आडनांव परांजपे आहे. तो वैद्यांचा मेव्हणा असल्याचे ठाऊक नाहीं. तसेंच यामधील बाळाजी कोण, हें समजत नाहीं. सालसी व आचरे हीं कोंकणांतील कडक देवस्थाने कौल लावण्याबद्दल प्रसिद्ध आहेत.

(ई) हिशोब— नंबर २९ च्या पत्रांत त्र्यंबक विश्वनाथ केतकर यांचा वैद्यांशीं झालेल्या देवघेवीचा हिशोब असून हा मनुष्य साताऱ्याजवळ भोगद्याच्या पलीकडे डोंगराच्या पायथ्यास जकातवाडी म्हणून खेडेगांव आहे तेथील राहणारा असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. त्र्यंबक विश्वनाथ नांव आले म्हणजे तो 'पेठे' असे समजण्यांत येते, ही चूक होते. साधारणपणे पेठे याचे पत्रांत त्र्यंबकराव असे नांव असतें. नुसते नांव त्र्यंबक असले म्हणजे तो केतकर असण्याचा जास्त संभव असतो, हें लक्षांत येण्यासाठींच हा हिशोब दिला आहे. या हिशोबांत वैद्यांनी केतकरास दिलेल्या पैशाची फेड त्यानेच सदाशिवभट सोमण, उमदी, कृष्णाजी विठ्ठल लिमये यांजकडून रु. ६,००० ची केली आहे. या नवीन व्यक्तीशीं त्याचा व

वैद्यांचा संबंध होता ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. या व्यक्तींचा इतर कागदांतूनही उल्लेख आलेला आहे. त्र्यंबक विश्वनाथ हा वऱ्हाडचा सुभेदार असेंही इतर हिशोबांत आहे. हा छत्रपतिमहाराजांच्या प्रीतींतला माणूस असून त्याने वऱ्हाडांत रघूजी भोसल्यास त्रास दिल्यामुळे व त्याच्या कर्जांची फेड न केल्यामुळे त्याने त्यास अडकवून ठेविले होतें. त्यास सोडून द्यावे म्हणून महाराजांनीं भोसल्यास लिहिल्याचा इतर पत्रांतून उल्लेख आहे.

( उ ) याद्याः-- या फक्त २ च घेतल्या आहेत. न १८ ची याद मौजे बऱ्हाणपूर, ता. भिमथडी हा गांव वैद्यांकडे सोमवंशांनी कर्जफेडीसाठीं वहिवाटीस दिला असतांना तेथें चारणीसाठीं पाठविलेल्या उंटास झालेल्या खर्चाची आहे. यांतील 'सनद' या शब्दाचा अर्थ 'परवानगी' असावा. 'रा' म्हणजे 'रवाना' असा यांत अर्थ आहे. नं. १९ यांत तुळोजी आग्रे यांनीं छत्रपतींस पाठविलेल्या सामानाची यादी आहे. हे जिन्नस कोकणांत चांगले मिळतात. ही त्याची महाराजांना भेट असून वैद्यांच्यामार्फत पाठविली आहे. हा आग्रे जरी उद्दाम होता तरी तो महाराजांना व राण्यांना खुष करण्यासाठीं वरचेवर तिकडील जिन्नस पाठवीत असे. अशा याद्या इतर पत्रांत आहेत. या यादींत कांही फळझाडाची व फुलझाडांचीं रोपे आहेत. यावरून महाराजांस बागेचा नाद होता असे म्हणता येईल.

( ऊ ) लढायाः--या पत्रांतून रघूजी बंगाल्यांत लढाईस गेला होता त्या संबंधाची हकीकत असलेलीं पत्रे आहेत. त्यांत त्याचे निश्चित मुक्काम व पेशव्यांशीं व नबाबांशीं झालेल्या संग्रामाचे वर्णन आहे. याची माहिती काणे याच्यासंबंधीं लिहिलेल्या सदरांत दिली आहे.

( ऋ ) भोसलेः—आमच्या दप्तरांत रघूजीसंबंधीं पुष्कळच पत्रे आहेत त्यापैकीं ३ च महत्त्वाचीं म्हणून घेतलीं आहेत. नं. १३ मध्ये रघूजीचे स्वतःचे पत्रात पेशव्यांनीं बुंदेलखंडांत जातांना देवगड, शिवनी छपारे प्रातात केलेल्या लुटालुटीची, मंडलेकर राजा मेल्याची व वऱ्हाडचा सुभेदार त्र्यंबक विश्वनाथ कोनकर याने केलेल्या नुकसानीची हकीगत महाराजाच्या कानावर घालण्यासाठीं वैद्य याना कळविली आहे. नं. १६ हे पत्र विसाजी गोविंद याने नागपुराहून वैद्यांना लिहून, रघूजीबाबा कटकचा किल्ला ता. १९।४।४२ रोजी घेतल्यावर मुर्शिदाबादेस गेले असे कळविले आहे. त्यास ही बातमी निजामनमुलूख यांस देवराव त्र्यंबकाकडून गेलेल्या पत्रावरून कळली होती. पत्राच्या शेवटीं विसाजी गोविंदाचे अक्षर आहे. नं. २७ हे पत्र रघूजीने मूर्तिजापूर व अकोट परगण्याचीं राजपत्रे महाराजांकडून मिळविण्याबद्दल विश्वनाथभटांस लिहिले आहे. या पत्राबरोबर आपल्या खाजगतसरंजामाची यादोही पाठविली होती व त्याचीं राजपत्रेही त्यानें लवकर मागितलीं आहेत. पत्राची तारीख बरोबर लावतां येत नाहीं. नं. ३१ हे पत्र रघूजीने वैद्यांना लिहून श्रीपतराव प्रतिनिधि व यमाजीपंत कधीं वऱ्हाडांत येणार ही बातमी विचारली आहे. तसेच राणोजी

भोसले व सिदोजी गुजर यांस लवकर पाठवून द्यावे असे लिहिले आहे. हे दोघे त्याचे नातलग सातान्यास असावेत.

( ऋ ) आंग्रे :—यांच्या संबंधाची १२ पत्रे या सालांत आहेत. यांपैकी नं. ३ व १९ या पत्रांचा खुलासा अनुक्रमें आज्ञापत्र व याद्या या सदरात केला आहे. नं. १९ यांत तुळोजीने महाराजांच्या वाड्यांतील लग्नासाठीं वैद्यांकडे पाठविलेल्या जिन्नसांची यादी दिली आहे. हे जिन्नस सौ राणी सगुणाबाईची मुलगी राजसबाई निंबाळकराकडे वैशाखांत दिली तिच्या लग्नासाठीं तिने जिन्नस मागविले असावे, या पत्रावर संभाजी आंग्र्याचा शिक्का आहे. नं. १० हे पत्र वैद्यानीं तुळोजीस लिहून कळविले कीं, पेशवे, रामचंद्र हरी पटवर्धन याजबरोबर फौज देऊन तिकडे पाठवीत आहेत, तरी तुम्ही त्याचा बंदोबस्त करून राहावे. तुळोजी दरसाल वैद्यांना तांदूळ पाठवीत असे ते पाठविण्याबद्दल यांत त्यास सुचविण्यांत आले आहे. न. ११ चे पत्रांत तुळोजीने महाराजाकडे आपला पुढील बेत कळविण्यासाठीं आपले २ कारकून पाठविले होते त्यांस लग्न संपतांच पाठवावे म्हणून वैद्यांना त्याने लिहिले आहे. वैद्याकडून तुळोजीने मोत्याची जोडी घेतली होती त्याची किंमत देणें राहिली होती असे यांतील मजकुरावरून दिसते. या पत्रावर शिक्कामोर्तब नाही. नं. १२ मधील मजकूर नं. ११ मधीलच आहे, पण तें शाहू महाराजांना लिहिले आहे. यावरही शिक्कामोर्तब नाहीं. विसाजीपंत हा कल्याणकर बिवलकर केशवराव यांचा मुलगा असावा. तुळोजीने सरखेली मिळविण्यासाठीं महाराजास आर्जवानें व अदबीने हें पत्र लिहिले आहे. नं. १४ मध्ये तुळोजीने अंजनवेल व गोवलकोट किल्ले घेण्यासाठीं आपली तयारी असल्याचे वैद्यांस कळविले आहे. सरखेली दिली नसली तरी तो लढण्यास सिद्ध होत आहे. रामचंद्र हरीस पाठविण्याची कल्पना त्याला पसंत नाहीं. न. २४ यांत तुळोजीने महाराजास जिन्नस पाठविलेले दिल्या-नंतर ते कितपत आवडले, हे वैद्याना विचारले आहे. यांत वैद्यांबद्दल त्याने आपला पूर्ण भरंवसा व्यक्त केला आहे. नं. ३७ मध्यें तुळोजी अंजनवेल व गोवलकोट किल्ल्यास मोर्चे लावण्याकरता महाराजांची परवानगी वैद्यांमार्फत मागत आहे. यावर शिक्कामोर्तब संभाजीचा आहे. संभाजी वारला त्याचे आदले दिवशीं हें पत्र लिहिले आहे. नं. २९ यात तुळोजीने वैद्यास त्यांचे पत्रांतील मजकूर वाचून समाधान व्यक्त केले आहे व महाराजांस नवा खजूर देण्यासाठीं वैद्यांकडे पाठविल्याचा मजकूर आहे. हा मर्जी संपादण्याचा प्रयत्न आहे. नं. ४० हे पत्र तुळोजीने महाराजांस २ खंडी नवीन खजूर पाठविल्याबद्दल लिहिले आहे.

( ए ) गोविंद सामराज वडगांवकर :—नं. ४ मध्ये वडगांवकराने वैद्यांस लिहून कळविले कीं, तुम्हांस राहण्यास मनमोहन किल्ल्याजवळ माची व पाथरवाडी अशी दोन ठिकाणे सोईची आहेत. पाण्याची टंचाई आहे खरी; पण त्याबद्दल तजवीज होईल. गोविंद सामराज हा प्रांत मावळचा सुभेदार असल्यामुळे त्याच्या

हद्दींत मोहनगड होतें. या वेळीं वाई–साताऱ्याकडे कांहीं गडबड झाल्यामुळें वैद्यांना दुसरीकडे राहण्यास जाण्याचा प्रसंग आला असावा. वैद्यांना एका कुणबिणीची जरूर होती त्याबद्दलही यांत मजकूर आहे. नं. ६ हें गोविंदपंताने आपला भाऊ रामचंद्र ऊ. आबा यास वैद्यांस द्यावयाच्या कुणबिणीबद्दल मजकूर लिहिला आहे. कुणबिणीचा उल्लेख असणारीं पुष्कळ पत्रें दफ्तरांत आहेत त्यांपैकीं हीं दोन देण्याचें कारण असे कीं, जे कुणबिणी ठेवतात त्यांचा उपयोग ते काय करतात, हा विचार उत्पन्न होतो. त्यांच्या गैरवर्तनाशीं याचा संबंध असावा असे वाटण्याचा संभव आहे. याबद्दल मला थोडक्यांत असे म्हणावयाचे कीं, पत्र कोणत्या काळचे आहे, त्या वेळची समाजस्थिति काय होती, राजकारणांत पडलेली माणसे संपत्तिवान् असलीं तर त्याच्या ठिकाणीं शुद्ध आचारण राहणे त्या काळीं शक्य असू शकेल किंवा नाही, याचा विचार केला असतां त्या काळी त्या माणसांतलि या दुर्वर्तनाने त्यांस विशेषसा कमीपणा येत नव्हता असे मला वाटते. नं. ८ हे पत्र रामचंद्रपंत करकरे यास लिहिलेल्या पत्राची पुरवणी असून त्यांत वऱ्हाडांतील ४ गांवाची मामलत मिळविण्यासाठीं जरूर लागणारे पैशापैकीं काही विश्वनाथभट वैद्याकडून मिळवावे असा मजकूर आहे. रक्कम ५० हजार पाहिजे होती. या गोविंद सामराजाची वंशावळ पे. द., भा. ४४ मध्ये आहे त्यावरून याच्या घराण्याची माहिती होते. पत्राची तारीख अदमासाने इतर पत्रावरून लावली आहे.

( ऐ ) कोलटकर:—नं. २४ हे पत्र रामचंद्र ऊ. बाबुराव कोन्हेरचे विश्वनाथभट वैद्यांस असून त्यांत बरीच माहिती रघूजी, छत्रपति शाहू, फत्तेसिग, सौ. राणी सगुणाबाई यांच्या हालचालीबद्दल व पुढील बेताबद्दल दिली आहे. तुळजोपंत व लंबोदर धुंडिराज यांच्याकडे मुर्शिदाबादेहून आलेल्या बैराग्याच्या सांगण्यावरून समजते की, भास्करराम याजला तलवारीच्या व गोळीच्या जखमा झाल्या आहेत. आबाजी शिंदे, भानजी महाडिक व रायाजी पाढरे हे सरदार जखमी झाले आहेत. अकोळनेरहून सौ. गंगुबाई ( बाळंभटांची स्त्री ) आल्याचें यांत लिहिले आहे. हा रामचंद्र विश्वनाथभटांस मामा म्हणतो, यावरून विश्वनाथभटांची बहीण ही त्याची आई म्हणजे कोनेररामाची बायको म्हणावी लागते. विश्वनाथभटांची बहीण भास्कररामाच्या मुलास ( काशीरावास ) देण्याबद्दलचें पत्र आहे. पण तें सन १७५० मधील आहे. नं. ३० हें पत्र नागपुराहून लक्ष्मण कोनेर व विसाजी गोविंद यांनीं विश्वनाथभट व कृष्णाजीपंत यांस नागपुराहून लिहिलें आहे. त्यांतील मुख्य गोष्टी खालीलप्रमाणे आहेत—

( १ ) कोनेररामास नांदेडची मामलत मिळाली नाहीं, पण त्यानें मकडाईची मामलत राणोजीकडून मिळण्यासाठीं रु. ३००० देण्यासाठीं सदाशिव हरी यास लिहिले आहे.

( २ ) जानोजी व तुळजोपंत वऱ्हाडचा वसूल करण्यासाठीं गेले असल्यामुळें त्यांनाच वऱ्हाडच्या मामलतीचे पैसे मागावे. ही मामलत राणोजीनें वैद्यांकडे गहाण ठेवून कर्ज घेतले होते. तुळजोपंताने पण वसूल घेतला. बंगाल्यांतून रघूजी व कोनेरपंत आल्यावर या गोष्टीचा उलगडा करतां येईल. ते गयेपर्यंत आले होते.

(ओ) काणे:—नं. १७ यांत हरीपंत काणे यांनीं वैद्यांस लिहिलेली हकीगत आहे. बापूजी नारायण जोग या वेळीं साताऱ्याकडे गेले होते. त्यांनीं काण्यांची दैन्यस्थिति त्यांना कळविली. काण्यांना रघूजीकडून खर्चास पैसे मिळत नव्हते. या वेळी रघूजी बंगाल्याहून आल्यावर कोनेरपंताची त्यांची समजावीस झाली. मग रघूजी इलिचपुरास आला. काणे कर्जफेडसाठी वैद्यांकडे पैसे मागण्यास जाणार होते. नारो अनंत गद्रे यांनीं उमरखेडास जाऊन त्यांची स्थिति पाहिली व तेही साताऱ्याकडे जाणार होते नं. २० व २१ यात अंताजीपंत गद्रे यानीं अनुक्रमें करकरे व वैद्य यांस पत्रें लिहून काणे मुर्शिदाबादेस भास्कररामाबरोबर गेल्यानंतर ते सुखरूप असल्याबद्दल माहिती विचारली आहे. या वेळीं कृष्णाजी अनंत गद्रे अंताजीजवळ कोकणांत असल्यामुळें त्यांनींही पत्राखाली वैद्यांना नमस्कार लिहिला आहे व वे. रा. दातार हे आदित्येश्वरास अभिषेक करतात त्यांची दक्षणा बापूजी गणेश जोगाकडून देण्याबद्दल सुचवित आहेत. हे देवालय गद्रेलावगन येथे असून त्यावर वैद्यांचा अभिषेक असे. ते बांधण्यास वैद्यांनीं खर्च केल्याचीं पत्रे १७४१-४२ सालचीं आहेत. नं. २२ मध्यें महादाजी व हरी कृष्ण काणे उमेरखेडाहून वैद्यबंधूंस लिहितात कीं, आम्हांस नादेडचा मामला वाकडे याजकडून रु. ५,००० कबूल करून ठरवावा. याच मजकुराचे पत्र त्यांनी कोलटकर व करकरे यांस लिहिलें आहे. ' वाकडे व काणे आप्त कसे हें कळत नाही. ' नं. २३ हे पत्र उमरखेडाहून हरीपत, वैद्यांस लिहून कळवितात कीं, रघूजी व भास्करपतांची भेट घेऊन आपल्या कर्जफेडीची तजवीज करून घेतली; दसऱ्यास त्यांजकडे उंदरीस जाऊन कराराप्रमाणें पैसे घेऊन शंकराजी गोविद परांजपे याजबरोबर रक्कम पाठवितो. नं. २८ मध्यें हरीपंत काणे वैद्यांस कळवितात कीं, भास्करराम कोलटकर बापूजी नारायणास बरोबर घेऊन बंगाल्यांत तेलंगण प्रांतातून जात आहेत.

## १७४३

( अ ) सनदा:—नं. १२ हे पत्र फाटलें आहे, तरी कर्जफेडीसाठीं वैद्यांना इनाम गांवांतील कोणकोणते हक्क रघूजी भोसले यानीं दिले आहेत याचा उल्लेख यांत आहे. झुलाजी जगन्नाथ देशमुख याची पत्रावर पैवस्ती केसो हरी सावरकर यांनीं घातली आहे. सायेर जकाती, कुळबाब व कुळकानू यांचे त्यांस उत्पन्न मिळत

असे. वऱ्हाडांत भुगांव गांव वैद्यांना होता त्याबद्दल हें पत्र असावे. या सालांत शाहू छत्रपतींनीं वैद्यांना इनाम गांवच्या सनदा नं. १५ काऱ्हाटी, ता. भिमथडी; नं. १९ भातगांव, ता. वेलंब; नं. २७ कासारी, ता. रत्नागिरी अशा दिल्या आहेत. सनदांच्या भाषेसंबंधी पूर्वीच्या प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें शेवटी लेखनालंकार असा शब्द व इतर बारनिशांचे उल्लेख आहेत. याबरोबर निघणारीं आज्ञापत्रे यांत छापली नाहींत. भातगांवची सनदही छापली नाही. त्याची भाषा इतर दिलेल्या सनदेप्रमाणेच आहे. भातगांव दिल्यानंतर तो गांव चालविण्यास हरकत होते, म्हणून महाराजांनी आंग्र्यांना ताकीद दिली ती नं. १९ मध्ये दिली आहे. यांतच असा उल्लेख आहे कीं, हा गांव वैद्यांना देण्याचे कारण त्यांनी स्वामीस औषधउपाय करून आरोग्य दिले. या वैद्यबंधूंचा मुख्य धंदा वैद्यकीचा नव्हता, पण ते औषधपाणी देत असा याच्च ताकिदीत उल्लेख आहे. या ताकिदीच्या शेवटीं 'बहुत काय लिहिन' हे वाक्य महाराजांच्या हातचें आहे. सध्यां हा गांव या वैद्यबधूंच्या ताब्यांत नाहीं. तो सध्यां कोणाकडे आहे कळले नाही. कासारी व काऱ्हाटी गांव सध्यां वैद्यघराण्याकडे आहे.

( आ ) ताकिदी :- नं. १७ ही ताकीद सोमवशी सरलस्करचा मुखत्यार भिकाजी बल्लाळ सुभेदार, सुपे यानें मोकदम मौजे तरडोली यास दिली आहे. अशा ताकिदी त्याच्याच इतर सुपे प्रातातील गावाना आहेत. हा सर्व प्रांत सरलस्करकडे सरंजाम होता. त्यांतील काहीं गांव त्यानी कर्ज घेऊन वैद्याना वाहिवाटीस दिले होते. पुढे तो सरजाम बंद झाला असे दिसते. नं. १९ मधील ताकिदीबद्दल 'सनदा' या सदरांत उल्लेख केला आहे.

( इ ) पत्रे :—ही सर्व वैद्यांस आलेली आहेत. नं. ६ हे नारो हरीने फडमाखजनाहून लिहिले असून त्यात सौ. अनुबाई ( विश्वनाथभटांची स्त्री सौ. उमाबाई ) इची रवानगी केल्यासंबधीं मजकूर यांत आहे. शिर्के यांची धामधूम चालत असल्यामुळें शिपाई न देता ६ गडी तिजबरोबर द्यावे लागले. या वेळीं राघोचा ना॥ दखे साताऱ्यास गेलेला होता. त्याचेबरोबर मोत्यांची जोडी पाठविण्याबद्दल विनंति आहे. नं. १३ मध्ये शिवराम तुकदेव करमरकर याने कऱ्हाटीस घेतलेली ज्वारी पावसाळा लागण्यापूर्वी नेण्याची तजवीज करण्याबद्दल लिहिले आहे. नं. ३० मध्ये भोसल्याकडलि गांवच्या पोतदारी वतनाच्या सनदा कधी मिळतील हे बादशहाने सेख महमदअलीमार्फत कळविले आहे. नं. ३३ हे पत्र कासारी गांवाजवळील पनळीचा खोत केशव विश्वनाथ जोशी याने लिहिले असून आपण द्यावयाचा वसूल दुष्कळामुळे देणे तूर्त कठिण आहे असे कळविले आहे. भातगांवचे रानडे याच्याशीं याचा नात्याचा संबंध असावा. यांतील सुपाऱ्या शब्दाबद्दल सुपारिया शब्द वापरला आहे. यावरून जोडाक्षर टाळण्याची प्रवृत्ति दिसून येईल.

( ई ) हिशोब :--नं. ५ हा हिशोब यशवंतराव पोतनिसांकडून महाराजांनीं करविला. त्याचे पैसे वैद्याकडून त्याने घेतले त्याबद्दल वैद्यास तो दिलेला दिसतो. १७४० मधील पत्र नं. २९ मध्ये ४ सोन्याच्या कड्यांचा तपशील आहे. त्यांत तुळोजी आंग्रे व विश्वनाथभट यांस ही कडीं बक्षीस दिलीं असे म्हटले आहे. यात सोडरक्कम आहे. त्याचा अर्थ सूट असा आहे. नं. ७ मधलि हिशोबास ' खासुदगी ' म्हटले आहे. त्याचा अर्थ ' नक्त रक्कम ' असा आहे. हा उमरखेडचा वैद्यांचा कारकून शंकराजी गोविंद परांजपे याने दिला आहे. यांत त्र्यंबक विश्वनाथ केतकर हा सुभेदार प्रांत वऱ्हाड असें स्पष्ट म्हटले आहे म्हणून हे पत्र घेतले आहे. नं. २९ व ३१ चे हिशोब रघूजी भोसल्याच्या कर्जासंबंधीं आहेत. रु. २५,००० त्यास वैद्यानीं दिले ते कोणत्या व्यक्तींसाठीं व कोणत्या सामानासाठीं किंवा कार्यासाठीं घेतले याचा तपशील यांत आहे. रु. ५,००० हे राणी सकवारबाईने त्यास दिले त्याचा यांत तपशील आहे. या हिशोबावरून रघूजीचा कोणत्या वजनदार लोकांशीं संबंध होता याचा बोध होत आहे. रु. २५,००० ही रक्कम चंद्राखानाबद्दल रघूजीस जी रक्कम पुढे दिली त्यात वळती करून हे रुपये वैद्यांनी वसूल केले आहेत.

( उ ) याद्या :—नं. ३ ची यादी, वैद्यबंधूंचे वडील रघुनाथभट १०।१।१७४३ रोजीं वारले त्यांचेबद्दल दुखवटा ज्या लोकानीं १३ व्या दिवशीं केला, त्यांची आहे. यावरून वैद्यांशीं लोभाचा व प्रेमाचा संबंध टेवणारी त्या वेळीं कोण कोण माणसे होतीं याचा बोध होतो. न. ३४ ची यादी आपाजी आंग्रे याच्या तैनातीला असलेल्या माणसांची आहे. यांचा महिना पगाराचा खर्च रु.५१२ होता. येसाजी ऊर्फ आपाजी हा आपला भाऊ मानाजी याजबरोबर साताऱ्यास या वेळीं गेला असावा. यांत बरेच न समजणारे शब्द आहेत त्याचे अर्थ टीपेत दिले आहेत. नं. २४ ही यादी रघूजी भोसले व पेशवे यांमधील तह शाहू महाराजानीं ठरविला तिचा मसुदा आहे. हा ३१ ऑगस्ट १७४३ मध्ये कायम झाला.

( ऊ ) लढाया :--या वर्षांत दोनच लढायांचा उल्लेख आहे : १ कोकणांतील, २ बंगाल्यातील. रघूजीने बंगालची स्वारी भास्कररामाकडून करविली त्याची हकीकत रघूजीसंबंधाच्या कागदावर लिहिलेल्या सदरांत दिली आहे. कोकणांतील तुळोजीच्या स्वारीबद्दल, तिकडील सरदार मोत्याजीराव बिचारे, सुवर्णदुर्गचे अमलदार व तुळोजीचा कारकून केसो त्र्यंबक याची पत्रे आहेत. नं. ८ चे पत्रात बिचारे याने विश्वनाथभटांस बाणकोट वसवणे व कृष्णाजी घाटगे यास इकडे पाठवणे याबद्दल काय ठरले आहे याची माहिती विचारली आहे. साताऱ्या राजकारणाची माहिती यजमान आंग्रे यास कळविण्यासाठी लिहीत जावी अशीही विनंति केली आहे. वैद्य आंग्र्यास सावधगिरी बाळगण्यासाठीं साताऱ्या महाराजांच्या वाटाघाटींत कांहीं समजल्यास लिहीत असत. नानासाहेब पेशव्यांचा पुढील बेत काय आहे हेंही विचारण्यांत आले आहे. नं० १० हे मोत्याजीचेच पत्र असून तो कृष्णाजी घाटगे याचें

काय ठरलें, बाणकोट वसवण्याच्या बाजारगप्पा कितपत खऱ्या आहेत, अनाजी साटम हा विजयदुर्ग प्रांतीं जाऊन लुटालूट करणार कीं काय, अशाबद्दल वैद्यांस त्यानें माहिती विचारली आहे. नं. ३६ व ३७ ही पत्रे केसो त्र्यंबकाची आहेत त्यांची तारीख बरोबर लागली नाही. अंताजी घाटगे महाड प्रांतीं लोकांस कसा त्रास देत आहे याचे दोन्ही पत्रांत वर्णन केलें आहे. हा त्रास नाहींसा करण्यासाठीं छत्रपतींनीं कांहीं उपाययोजनेची तजवीज करावी अशी खटपट वैद्यांमार्फत याने चालविल्याचा मजकूर या पत्रांत आहे.

(ए) देवालये— नं. ३२ हे पत्र रामाजी महादेव चिवलकर यानें वैद्यबंधूंस लिहून मालगुंड येथील रामेश्वराचे देवालयासाठी लागणारीं लांकडें खरेदी केलीं होतीं. तीं पाठविण्यास तजवीज करावी लागेल व पैसे पोंचले किती व आणखी किती लागतील याचा तपशील यांत दिला आहे. मौजे देहूड, ता. रत्नागिरी, येथील डाळेश्वराचे देवालय वैद्यांनीं गाणसावंत देसाई व नारायणभट वैद्य याजकडून बांधण्यास सुरुवात केली, ते १७४४ मध्ये पुरे झाले, यासबंधाचे कागद छापले नाहींत.

(ऐ) भगवंतराव अमात्य :—याने ही सर्व पत्रे वैद्यबंधूंना लिहिलीं आहेत. नं. ४ मध्यें महाराजांनीं मागितलेली फुलझाडांचीं रोपे पाठविल्याचे कळविले आहे. वतन व पैशाची मदत यासंबंधी केलेल्या अर्जाचा महाराजानीं विचार केला नाहीं अशी त्याची लाक्षणिक भाषेत तक्रार आहे. तुळोजी आंग्रे यांनी नागोजी आंग्रे व राव ठाकूर देसाई याजवर चालविलेल्या जुलमाचा उल्लेख यांत आहे. तुळोजीने ठाकुरांच्या बायकांस पकडून विजयदुर्गास नेले होते. नं. ९ मध्ये त्याने आपली दैन्यावस्था वर्णन करून वैद्यांना वाईस भेटण्यास येतो असे कळविले आहे. तुळोजीने बाणकोट घेऊन महाराजाच्या मर्जीविरुद्ध नवीन गांव वसविण्याचे ठरविले आहे, ही बातमी यांत लिहिली आहे. भास्करभट बावापासून आमचें सारथ्य तुमच्या घराण्याकडे आहे, तुम्ही गोड बोलता, आश्वासने देतां, पण त्याचा कांही परिणाम दिसून येत नाहीं, अशी त्याची तक्रार आहे. अमात्य व वैद्य या घराण्याचा एकमेकांशीं ४ पिढ्यांचा संबंध दिसतो. नं. २० मध्ये तो वैद्यांना लिहितो, आपले वजन खर्च करून महाराजांकडून आमचे वतन सोडवा व कोल्हापूरचे महाराज, राणीसाहेब व अर्जोजी यादव माझ्या वाइटावर आहेत असे तो म्हणत आहे. तुळोजी आंग्रे साताऱ्यास महाराजांकडे येऊन काय घडून आले ही बातमी तो विचारीत आहे. नं. २२ मध्ये तुळोजीने महाराजांकडून सरखेली मिळाल्यावर विसाजीपंत व गंगाधर नाईक त्यांजकडे पाठविले होते. त्यांची गांठ पडून महाराजांपाशी काय बोलणीं झालीं हे त्याने वैद्यांना विचारले आहे. आंगरे व सावंत कुडाळकर हे कोकणात श्रीमंत व सत्ताधीश आहेत, व घाटावर अर्जोजी यादव बलिष्ठ आहेत, त्यांजवर महाराजांची हुकमत चालत नाही. यामुळे त्यांजकडून आम्हा ब्राह्मणांवर जुलूमजबरदस्ती होत आहे, याचा बंदोबस्त देवच करूं जाणे, असे केविलवाण्या शब्दात तो लिहीत आहे. नं. २३ मध्यें तो

लिहितो, (१) बापूजी ना। बारामतीकर यांचे कुंदगोळचें ठाणें निजामनें घेतलें तरी ते धनत्तर आहेत ( २ ) यमण्णा चिकोडीकर व कागलकर यांनीं चिकोडी प्रांतावर फौज पाठवून धुव्वा उडवून यादवाच्या सैन्याचा बराच नाश केला, पण त्याला कोल्हापूरकर राजाराम महाराजांचा पाठिंबा आहे. (३) कोल्हापूरचे व साताऱ्चे प्रतिनिधि पेशव्यांस सामील झाले आहेत. पेशवे मनांत आणतील तें करतील. (४) बाबूजी नाईक, अर्जोजी यादव, आंग्रे व सावंत यांपैकीं कोणी धनत्तर व कोणी सधन असून बलवत्तरही आहेत. आम्ही मात्र निर्बल व धनहीन असल्याने देवाचा धावा करण्यापलीकडे कांहीं करूं शकत नाहीं.

( ओ ) भोसले—नं. १४ चे पत्र पुरुषोत्तमभट शेवडे यानें नागपुराहून विश्वनाथ-भटांस लिहिले आहे. त्यांत रघूजी कटक घेऊन बंगाल्यांत जात असतां वाटेंत बंगालचा नबाब अलीवर्दीखान, याचा सेनापति मुस्ताफाखान भेटला त्याच्या १० हजार फौजे-बरोबर लढून त्यास पकडलें, पुढे तो अलिवर्दीखान यास भेटला, ही बातमी महा-राजांस कळविण्यासाठीं लिहिली आहे. हा शेवडे पैसेकरी होता असा उल्लेख पूर्वी आलेला आहे. याच पत्रांत गोपाळ रघुनाथ शेवडे यास कर्जाबद्दल तगादा न करतां आणखी दहा-पांच हजार लागल्यास द्यावे अशी विनंति केली आहे. नं. १८ चे लांबलचक पत्र रघूजीने नागपुराहून वैद्यबंधूंस बंगाल्यांतून आल्यावर लिहिले आहे. त्यांत बराच महात्त्वाचा भाग आलेला आहे. बंगाल्यांत १७४२ मध्ये भास्करराम अलीवर्दीखानाशीं लढण्यास गेले असतां झालेली हकीगत दिली आहे. त्याचा सारांश—नबाबाशीं मूर्शिदाबादेस लढाई करून भास्करराम कोलटकर छावणी करून राहिले होते. त्याचे मदतीस रघूजी जात असतां गयेजवळ मुक्काम केला, इतक्यांत पेशवेही आले, त्याची भेट होऊन बोलणेंचालणें झालें, नंतर त्याचा निरोप घेऊन रघूजी मूर्शिदाबादेकडे गेले, कटवागंजास मुक्काम असतांना अलीवर्दीकडील निरोप आला कीं, आम्ही वाजवी अमल देतो, सलोखा करा. इतक्यांत नानासाहेब पेशवेही तेथें आले व कळविलें कीं, बादशहाचे हुकुमावरून तुमच्या मदतीस मीं आलों आहे, गनीमास बाहेर काढूं. नंतर रघूजी रामगड बदामीचे नजीक आले. पंतप्रधान यांनीं मोंगलांशीं सलोखा करून अलीवर्दीस मूर्शिदाबादेस जाण्यास सांगितले व आपण पंचेटचे रोखे गयेकडे चालले. इतक्यांत रघूजीकडे अलीवर्दीने निजामाचा वजनदार वकील शेषराव याजकडून पत्रे पाठवून कळविले कीं, मोगल तुमच्याशी सलोखा करीत आहे तरी भास्कररामास फौज घेऊन परत बोलवावे व तुम्हीं देशास जावे. त्याप्रमाणें भास्करामास फौज देऊन रघूजीने देशी पाठविले व आपणही परत फिरले. घाट कठिण म्हणून आघाडीस फौज घेऊन बेंडूचे घाटानजिक आले. तेथे दुसरे दिवशी त्यास समजले कीं, पतप्रधान यांनीं लांब मजली करून खिड चढून येत असता घाट चढून येणाऱ्या फौजेच्या पिछाडीवर हल्ला केला. म्हणून रघूजी परत लवकर

सैन्य उतरले होते तेथे आले. ही हकीगत वैद्यांनीं छत्रपतींना कळवावी म्हणून रघूजीनें लिहिली होती. यापूर्वीही त्यानें महाराजांकडे या स्वारीबद्दल पत्रे पाठविलीं होतीं. नं. २१ चे पत्र वैद्यांच्या हातचें गुप्त म्हणून रघूजीस मजकूर कळविण्यासाठीं आपल्या नागपूरच्या विश्वस्त कारकुनास लिहिले असावें. त्यांतील दोन महत्त्वाच्या गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत. १७४२ मधील नं. १३ च्या पत्रांत त्र्यंबक विश्वनाथ केतकर याने त्रास दिल्याची हकीगत आहे, त्यास रघूजीने पकडून ठेविलें होतें, यावर महाराजांची मर्जी असावी. त्यांना त्यास अटक केल्याचे कळतांच त्यांनीं रघूजीकडे हुजरे पाठवून कळविलें कीं, त्यास सोडून द्यावें, पण त्याजकडून रघूजीने दिलेली बरीच रक्कम येणे होती म्हणून ती वसूल केल्याखेरीज त्याची सुटका करावयाचें रघूजीचे मनांत नव्हतें. रघूजीनें महाराजांस हें त्याचें वर्तन कळावें म्हणून वैद्यबंधूंस पत्र लिहून हुजरे परत पाठविण्याबद्दल परवानगी मागितली होती, त्यासंबंधीं हें पत्र आहे. या पत्रावरून वैद्य महाराजांस खुष करून कसे वागत होते व रघूजीच्या बाजूनें महाराजांशीं कशी बतावणी करून भोसल्याचा विश्वास संपादन करीत होते, याची कल्पना येते. या पत्रांतील दुसरा मुद्दा असा आहे कीं, रघूजीला महाराजांनीं साताऱ्यास बोलावले होते. तिकडे जातांना सावधगिरीने जावे, कारण पंतप्रधान यांची तुमच्याबद्दल दुर्बुद्धि आहे हे रघूजीस कळविण्याबद्दल त्या कारकुनास वैद्यांनीं यात लिहिले आहे. यावरून नानासाहेबाच्या वृत्तीबद्दल वैद्य किती साशंक होते व भोसल्यावर त्यांचे किती प्रेम होते हें दिसून येईल. नं. २६ चे पत्र रघूजीचेच आहे. त्यावरून वैद्यांनीं महाराजाच्या आग्रहावरून त्र्यंबक विश्वनाथ यास सोडावे म्हणून लिहिलेले दिसते. त्यास सोडतांना रघूजीने वैद्यास पुनः त्याच्या वर्तनाबद्दल महाराजाची खात्री करून त्यास कर्जाची फेड करून देण्यासाठीं परत पाठविण्याची खटपट करावी म्हणून लिहिले आहे. सकवारबाईचा भाऊ बऱ्हाणजी मोहिते हा साताऱ्यास होता. त्यासही याबद्दल रघूजीने पत्र लिहिले होते असें दिसतें. नं. ३५ हें पत्र विश्वनाथभटांनीं रामाजीपंत वाकडे यास लिहिले आहे. रघूजीस रु. ५०,००० देवविले त्याबद्दल हिशोब नं. २९ च्या पत्रांत आहे. ते रुपये बर्वे याजकडून रघूजीने वैद्यांना परत करविले. पण त्यांनीं त्यांपैकीं रु. २५,००० देवबा नाा काळे यांना देण्यास सांगितलें होतें, ते त्यास मिळाले नाहींत. चिटी लिहून दिली होती त्याची मुदत संपण्यापूर्वी त्यास देण्याची तजवीज झाली पाहिजे. म्हणून वैद्यांनीं आपले रु. २५,००० व हे काळे यांचे रु. २५,००० मिळून ५०,००० रु. गोपाळ अनंत गद्रे यास देण्याबद्दल बर्वे यास हें पत्र लिहिले आहे. गद्रे हा वैद्यांचा फडणीस नांदगांव परगण्याचा होता.

( औ ) सोमवंशी सरलस्कर--नं. १ मध्यें आपाजी सोमवंशी यास महाराजांनीं बोलावण्यास द्वारकोजी सोमवंशी यास पाठविलें होतें; पण कर्जदारांचे तंटे उपस्थित झाल्यामुळे येतां येत नाही, त्यांची समजावीस करून ८ दिवसांत निघून

येतों, असें दरबारीं कळवून मला कळवावें असें तो वैद्यांस लिहीत आहे. यावरून महाराजांजवळ वैद्यांचे वजन असे, असे दिसून येईल. पत्रावर अप्पाजीचा शिक्का व मोर्तब आहेत.

(अं) आंग्रे —नं. २ मध्यें तुळोजीने वैद्यांना तिळगुळाच्या थैल्या पाठविल्याचा उल्लेख आहे. केसो त्र्यंबक व विसाजीरत राजकीय प्रश्नाबद्दल निरोप घेऊन गेले होते. खालील 'जाहोलेयाचे' हा शब्द जोडाक्षर टाळण्यांत आल्याचे उदाहरण आहे. नं. ११ मध्ये तुळाजीनें बाणकोट घेऊन नवी वसाहत केल्यामुळे त्याचें वर्तन महाराजांस पसंत न पडून ते कृष्णाजी घाटग्यास पाठवीत असले तर त्याचा प्रतिकार आपण करूं अशा तऱ्हेचा निरोप घेऊन त्याने जगन्नाथ आवजीस पाठविल्याचा उल्लेख आहे. हें तुळोजीचें वर्तन उद्दामपणाचे समजण्यांत आले आहे. या वेळीं त्यास सरखेली मिळाली नव्हती. नं. १६ मध्यें राणी सौ. सकवारबाईनीं तुळोजी व त्याची स्त्री गिरजाबाई यांस पाठविलेल्या सनगांचा उल्लेख आहे. हीं सनगे गुणाजी आंबकर याबरोबर पाठविलीं होतीं. आबवे गांव माखजनजवळ असून त्यावरून हें आडनांव पडले आहे. आबकर हे तेथील सुभेदाराचे कारकून पादशाही अमलांत होते असा उल्लेख पोक्षे कुलवृत्तांत पान २० वर आहे. गुणाजी आंबकर हा तुळोजीचा सरदार होता.

नं. २५ मध्ये यमाजीपंत व अंताजीपंत मुतालिक यांस महाराजांनीं तुकोजीच्या-विरुद्ध चळवळ करण्यास पाठविले तर त्यांचा प्रतिकार करण्याची चढेल भाषा वापरली आहे. हा बेत रहित करण्यासाठीं राणीसाहेबामार्फत महाराजाचे मन वळवावें असें तो वैद्यांस लिहीत आहे. या वेळीं सरखेली किताब तुळाजीस मिळाला होता. पण शिक्का संभाजीचाच वापरला आहे. नं. २८ मध्ये मोत्याजीराव विचारे यानें तुळोजीच्या सागण्यावरून महाराजांना देण्यासाठीं १५ सुपारीच्या पिशव्या पाठविल्या त्याचा उल्लेख केला आहे. हा त्यांस खुप करण्याचा प्रकार आहे. अंताजी घाटगे यानें महाराजांकडे येऊन चालविलेल्या मसलतीची बातमीही त्याने विचारली आहे.

## १७४४

(अ) सनदा-पत्रे— नं. ५ हे एक मिरास पत्र शिवराम तुकदेव करमरकर व घोंडो अनंत जोग यांस कान्हाटी, ता. बारामती येथें गांवच्या लोकानीं वंशपरंपरा राहण्यासाठीं वाडा बांधण्यास जागा दिली त्याबद्दल आहे. घरजागेची चतुःसीमा दिली असल्यामुळें ती जागा कोणती हे अजूनही निश्चित करतां येईल. सध्यां त्या दोघांपैकीं कोणीही तेथें राहत नाहीं. अशा प्रकारचे कागद पूर्वी कसे लिहीत त्याचा हा एक नमुना आहे. हे दोघे वैद्यांचे कारकून तेथें वसुलास त्या काळीं जात असत, असें इतर पत्रांवरून दिसून येत आहे.

( आ ) आज्ञापत्रें :—नं. ६ हृ पेशव्यांनीं मौजे कान्हाटीच्या मोकदमास लिहिले असून त्यांत वैद्यांना फौजदारी व सरदेशमुखी अमल बिनहरकत देत जावा असा मजकूर आहे. नं. ९ हें पत्र भिकाजी बल्लाळ सुभेदार, प्रां. सुपे, यांनी सोमवंशीतर्फे मौजे अंजनगांव, ता. बारामती, येथील मोकदमांस लिहिले असून त्यांत गांवचे पाटील व कुलकर्णी यास तावडतोब पाटवावे असा मजकूर आहे. त्यांना सोमवशीनीं पूर्वी बोलावलें असतां आले नाहींत याबद्दल त्यांचा जबाब घ्यावयाचा होता. यावरून पूर्वा मोकदम हा पाटील-कुलकर्ण्यांव्यतिरिक्त कोणी गावचा अधिकारी होता असे म्हणतां येईल. वै. द. खं. २, प्रस्तावना पृ. ५ मध्यें याबद्दल ऊहापोह केला आहे. पत्रावर सुभेदारांचा शिक्का व मोर्तब आहे. शिक्कयावरून त्यांची कुलदेवता श्रीभवानी देवी असावी असे दिसते. सुभेदारांचा वाडा सुप्यास असून तेथे त्याचे वंशज राहतात. सुभेदारांचीं अशी आज्ञापत्रे मावडी, सुपे, जळगांव, वगैरे गांवच्या मोकदमांस असलेलीं दफतरांत आहेत. ही पत्रे ज्या माणसाबरोबर पाठवीत त्यास त्याच्या योग्यतेप्रो मसाला म्हणजे पोटगी सुभेदार लिहितील तितकी मोकदमास द्यावी लागे. १ रु. पासून १० रु. पर्यंत मसाला देण्याबद्दल लिहिल्याचे कांही कागदांत आढळून येते. नं. १७ हे पत्र रत्नाकर विठ्ठल यांनीं मोकदम मौजे खोडद, प्रांत कऱ्हाड, यास लिहिले असून या गांवची १/२ चाहूर जमीन विश्वनाथभट वैद्य यांस इनाम दिली आहे, त्याप्रमाणें त्यांस दाखवून ती हवालीं करावी, असा त्यांत मजकूर आहे.. वैद्य व रत्नाकर विठ्ठल यांनी एकत्र देवघेवीचे पुष्कळ व्यवहार केलेले आहेत. हा साताऱ्यास राहत असे. यास खोडद गांवचे देशमुखी वतन असावें. त्यापैकी वैद्याना जमीन दिलेली दिसते ( वै. द. खं. २, पृ. ४ व २१ पहा ). त्याचा शिक्का व मोर्तब यावर आहे, म्हणून पत्राची मुद्दाम निवड केली आहे. नं. ५० व ५१ ही पत्रें फत्तेसिंग भोसले यांनी मौजे भोसे, ता॥ चाकण चा मोकदम व ता॥ चाकणचे देशमूख व देशपांडे यांस अनुक्रमे मौजे भोसे गांवचा मोकासा वैद्य बंधूंस दिल्यामुळे तो त्यांजकडे चालवावा असा त्यांत मजकूर आहे. फत्तेसिंगाचा शिक्का व मोर्तब यावर आहे. शाहू छत्रपतींनीं यास पुत्रवत् मानिला होता.

( इ ) पत्रे :—( वैद्यास आलेलीं )–नं. ३ ची चिटी विश्वनाथ भटांचा मुक्काम जेजुरीस असतांना तुकापा तेल्यानें त्यांस दिवटीकरतां तेल दिल्याचा यांत उल्लेख आहे. या पत्रावरून विश्वनाथभटांचा मुक्काम कळत आहे. नं. ११ चे पत्र श्रीरामदासस्वामींचा पुतण्या शामजीबावा ( गंगाधरबावाचा पुत्र ) याने लिहिले असून त्यांत वैद्य बधूंस त्याने चाफळच्या श्रीरामाचे मदिर बांधण्यास कर्जाऊ रक्कम मागितली आहे. यांच्या पत्रांत श्रीकारापुढें 'रामसमर्थ' हा शब्द असून त्यांच्या नांवापुढे 'नाम्ने' असा शब्द असतो. त्यावरून त्यांचीं पत्रें ओळखतां येतात. नं. १३ हें पत्र मोरो नारायण भाव्ये यांनीं लिहिलें असून त्यांत इनाम गांवचा वसूल यंदां मजुराचा ( सूट ) घालावा असा करार झाल्याचे लिहिले आहे. हे बहुधा कान्हाटी

गावाबद्दल असावें. या कामासाठीं सुऱ्याचे सुभेदार बाजी हरी वैद्याकडे गेले असावे. नं. १६ मध्ये आपाजी जिवाजी सुभेदार प्रांत देवगड हा वैद्यांच्या मामलतीचा तिकडील वसूल करीत असे, त्याने वसुलीची हकीकत लिहिली आहे. यास तिकडील दुसरे कारकून संकराजी कान्हो, केसो हरी सावरकर, व नारोपंत गद्रेही मदत करीत. रघूजीने रु. ४,००० ची चिठी रघुनाथभट पटवर्धन झिपरे यांजवर दिलेली गद्रे याज-बरोबर पाठविली. आपाजीचा बेत रघूजीबरोबर साताऱ्यास यावयाचा होता. पत्राची तारीख निश्चित लागली नाहीं. नं. १९ चे मोरो नारायण भाव्ये यांचे पत्रांत त्याने वैद्यबंधूना, बाडे देशमुख यास वसुलास अडथळा करूं नये म्हणून महाराजांचे हातरोखे पाठवावे म्हणून लिहिले आहे. उदाजीचा मुलगा द्वारकोजी पवार यास अजमाबाद (पट्टण) चा हातरोखा न देतां रायाजी पवारास देण्यास चुकूं नये असेही भाव्यानीं लिहिले आहे. आनंदराव पवाराचा मुलगा रायाजी पवार होता. ही शाखा धार संस्थानची होती. नं. २० चे पत्र बाळाजी दादाजी वैद्याने लिहिलें असून त्यांत देण्याघेण्याची माहिती आहे. चंदाखानाकरतां दिलेले पैसे वसूल करण्याबद्दल सूचना आहे. अंबेरे गांवचा बाळाजी दादाजी असावा असे दिसते. नं. २१ मध्यें आनंद खंडेराव याने, विश्वनाथभटांनी रिधपूर व नांदगांव वगैरे ६ महालांच्या दफ्तरदारीची वहिवाट करण्यास दिल्यास, वसूल होणाऱ्या रकमेतील $\frac{3}{4}$ रक्कम स्वतःची मजुरी घेऊन बाकीची भरणा करण्याचे कबूल केले आहे. महालांची नावे बालापूर, मलकापूर, अकोले, रिधपूर, नांदगांव व खोलापूर असून ते वऱ्हाडांत आहेत. पत्राचा लेखक वाघ असावा. नं. २२ मध्ये नारो अनंत परचुरे लिहितो कीं, वऱ्हाडांतील तुमच्या दफ्तरदारीच्या वहिवाटीबद्दल वसुलीचा $\frac{1}{2}$ भाग तुम्हांस देऊं. हा वैद्याचा नातेवाईक असावा. स्वतःस 'अपत्ये' म्हणतो. पण परचुऱ्याच्या वंशावळींत त्याचे नाव नाहीं. नं. २३ मध्ये रामाजी महादेव विश्वनाथभटांस लिहितो की, मध्यप्रांतांतील देवगड परगण्यातील तुमच्या दफ्तरदारीची मुतालकी केली त्याबद्दल $\frac{1}{3}$ वसूल तुम्हांला देऊं. नं. १८ मध्ये रघूजी भोसले यांनी प्रांत देवगडचा सुभेदार आपाजी जिवाजी यास वैद्यांस नागपूरची दफ्तरदारी दिल्याचें लिहिले असून वैद्यांनीं रामाजी महादेव त्या कामासाठीं पाठविलेला आहे, त्याजकडून काम घेऊन त्यास सालाचे वेतन रु. ३०० द्यावे असे कळविले आहे. नं. २५ हें हरी रघुनाथ जोग याचे पत्र विश्वनाथभटांस असून त्यास रघूजीस कबूल केल्याप्रमाणें कोनेरपंत कोलटकरास घेऊन देऊरास कां आला नाहीं म्हणून विचारले आहे. रघूजीस त्यांचे-बरोबर चंदाखानाच्या पैशाबद्दल व इतर कामाबद्दल विचार करावयाचा होता. पत्रांत श्रीकारापुढे 'कऱ्हाटेश्वरे' लिहिले आहे म्हणून हा जोग नांदिवड्याचा आहे. जयगडजवळील काऱ्हाटेश्वर देव तेथील जोगाचे कुलदैवत आहे. नं २९ मध्ये रघूजी भोसल्याची आई काशीबाई इने वैद्यबंधूंस रु. ५०० श्रावण मासाच्या खर्चवेचासाठीं मागितले आहेत. यावरून वैद्यबंधु भोसले घराण्याशीं किती आपलुकीनें वागत

याची कल्पना होते. या पत्रावर शिक्कामोर्तब रघूजीचें आहे. शिक्क्यांतील मजकूर 'श्रीशंकर चरणी तत्पर रघूजी भोसले निरंतर' असा आहे. असा मजकूर इतर त्याच्या शिक्क्यांत नसतो. नं. ३० चे पत्र रघूजीचा चुलता राणोजी याने वैद्यांस लिहिलें असून त्यांत आपणांस वेळेवर पैसे न मिळाल्यामुळें शागीर्दपेशांतील माणसांस रोजमुरा देतां आला नाहीं म्हणून ती निघून गेली आहेत तरी पैसे पाठवावे, प्रकृति बरोबर नसल्यामुळें सातार्‍यास येतां येत नाहीं असें कळविले आहे. वैद्यांकडून त्यास रोजमुर्‍याचे पैसे देण्याची तजवीज, वैद्यांकडे त्यांचे गांव गहाण टाकून, रघूजीनें केली होती. नं. ४४ मध्यें भोर संस्थानांतील नागोजी ना। जेधे देशमुख यास कर्जाच्या हप्त्याबद्दल सध्यां तगादा करूं नये अशी वैद्याना चिमणाजी नारायण सचीव यांनीं विनंति केली आहे. पत्राचे शेवटी सचिवांचें स्वतःचें अक्षर आहे. नं. ४८ मध्ये महिपतराव तावरे याचे वैद्यांना पत्र आहे. तो वैद्यांच्या कार्‍हाटी इनाम गांवचा राहणारा होता. पण या वेळीं तो सुरज भेलशाच्या लढाईवर पेशव्याबरोबर गेला होता. या वेळीं निजामातर्फे शंभूसिंह जाधव हा सुप्याच्या बाजूस लुटालूट करीत होता; त्याचेपासून आपल्या माणसांचे संरक्षण करण्यासाठी शिवराम तुकदेव करमरकर या कारकुनास लिहावें अशी वैद्यांना त्यानें विनंति केली आहे. सर्व पत्र तावर्‍याच्या हातचे दिसते. नं. ५३ हे त्र्यंबक विश्वनाथाचें पत्र आहे. त्यांत त्यानें विश्वनाथभटांना १,००० रु. वे. रा. सदाशिवभट सोमण यांस देण्याबद्दल लिहिले आहे. नं. ५९ हे मोरो नारायण भाव्याचे पत्र आहे. या पत्रावरून रघूजी या वेळीं सातार्‍यास गेला होता असें समजते. भाव्याने वैद्यांना त्याचेकडून कांहीं कार्य करून घेण्याबद्दल यात लिहिले आहे. नं. ६० हे पत्र नागोजी ना। जेधे याचें असून त्यांत त्याने कर्जाच्या फेडीचा मजकूर लिहिला आहे. तो मुदत मागत आहे. नं. ४४ च्या पत्रांत सचिवानीं वैद्याकडे याबद्दल भीड खर्च केली आहे.

पत्रे :—( वैद्यांनी लिहिलेलीं )—नं. ८ मध्ये बाळंभट औंधाहून विश्वनाथभटांना लिहितात की, रहिमतपुरास आले असता गाठ पडेल. रघूजी भोसल्याकडून आलेलीं ४ पत्रें पाठविलीं आहेत. शंकराजी कान्हो विश्वनाथभटांबरोबर होता व करकरे हा बाळंभटांबरोबर होता. नं. १५ हे पत्र वैद्यबंधूंनीं नारो अनंत गद्रे यांच्या नांवें लिहिले असून रघुनाथजी भोसले यास द्यावयाची एक हजाराची रकम कशी जमा करावयाची हे त्यात लिहिलें आहे. या वेळीं कार्‍हाटीस घोड्यासाठीं पागा बांधण्याचें काम चालले होते. उंट, घोडे, वगैरेंची खाण्यापिण्याची तजवीज करण्याबद्दल वैद्यांनीं सुचविले आहे. रघूजी नागपुराकडे जाण्यासाठीं महाराजांची परवानगी घेऊन जातांना देऊरास मुक्काम करणार, असें त्यास कळविलें आहे. यांत पेठेच्या कौलाचा उल्लेख आहे. पेठ म्हणजे बारामतीचा पेठेचा भाग असावा. पेठ, कसबा व फड हीं नांवें अजूनही गावाचे अगोदर घालतात. पेठ म्हणजे बाजार बसविण्याचा भाग, कसबा म्हणजे मूळ वस्तीचा भाग व फड म्हणजे ज्या भागांत

कचेऱ्या असतात तो भाग असा अर्थ असावा असें वाटतें. नं. २४ चे पत्रांत बाळंभटांना विश्वनाथभट कळवितात कीं, रघूजी व महाराज यांच्या भेटीचा दिवस ठरवून देऊरास बाबुराव मल्हार बर्वे यास घेऊन यावें. रघूजी करंजीहून मांडवगणास येऊन देऊरास येईल. चंदाखानाबद्दल रुपये ठरविण्याच्या वाटाघाटीसाठीं बर्वे यास रघूजीकडे आणण्याची ही खटपट आहे. नं. ३१ च्या पत्रांत बाळंभट गोविंदपंत सुभेदारास लिहितात कीं, विश्वनाथभट देऊरास रघूजीस भेटून पुण्यास जाणार आहेत, तेथे त्यास भेटावे. हा गोविंदपंत गोविंद सामराज मावळच्या प्रांताचा वडगांवकर सुभेदार असावा. नं. २७ मध्यें विश्वनाथभट तिसगांवाहून बाळंभटास लिहितात कीं, आम्ही गोदावरी व नीरा ओलांडून देऊरास येतों. तुम्ही तेथें यावे. असे दिसते कीं, विश्वनाथभट रघूजीस औरंगाबादेस भेटले व त्याचेबरोबर परत सातारा येथे येण्यासाठी निघाले. ते पैठणावरून तिसगांवीं आले. नं. ४० यात विश्वनाथभट बाळंभटास लिहितात कीं, उदाजी पवार व विराप्पा यांचीं पत्रें व हुजरे पाठवा व कान्हाटीच्या पाटलाबरोबर खंडणी ठरवून त्यास वस्त्रे द्यावीं व लवकर परत जाण्यास त्यास मोकळीक द्यावी. न. ४६ मध्ये विश्वनाथभट नारोपत गद्रे यास कान्हाटी कळवितात कीं, आम्ही निरेवरून मोरगांवी आलो. आमच्याकरता भाजी वगैरे जिन्नस पाठवावे. नं. ५५ मध्ये विश्वनाथभट बाळंभटांस तिवसी, ता। मंगळवेढ्याहून लिहितात की, शिवराम तुकदेव करमरकरास रु. १०० कबूल केले आहेत ते बाळाजीपंत फाटकापाशीं द्यावे.

पत्रें:—( इतरांचीं )—नं १५ हे रामचंद्रपंत करकरे यानीं नारोपंत गद्रे यास लिहिलें असून त्यांत कळविले आहे कीं, सावताची धामधूम इकडे होती. कोकणांत नव्हती, तुळोजी आग्रे महाराजांस भेटून परत कोकणांत जाणार. रघूजी देऊरास गेले आहेत. लवकरच नागपुरास येतील. नं. ४७ हें पत्र अक्षरावरून नारोपत गद्रे यांचे दिसते. बहुधा करकरे यास लिहिले असावे. यांत विश्वनाथभट निघूत व श्रीमोरेश्वर येथें गेल्याचा उल्लेख आहे. नं. ५७ हे शिवभट साठे याने हरी रघुनाथ जोग, रघूजीचा कारभारी, यास लिहिलें असून त्यांत त्यास दिलेल्या रु. १०० चे २ वर्षांचें व्याज ७५ घेतले. यावरून व्याजाचा दरसाल दरशेकडा दर रु. ३७॥ होत आहे ! शिवभटाची देवघेव केसो हरी सावरकर व काशीभट खरे यांजपाशीं होती असे दिसतें. पत्राची तारीख बरोबर निघाली नाहीं.

( ई ) हिशोब—नं. २ हा हिशोब कसबे भुगांवच्या वसुलीच्या पैशाचा नमुना म्हणून दिला आहे. वसुलांत कोणाकोणाची वांटणी असते व ती कशी केली आहे हे यावरून समजेल. चाहरम हा कर आहे. ह्या हिशोबाचा संबंध नारो अनंत याच्या सन १७४५ मधील न. ७ च्या पत्राशीं आहे.

( उ ) अमात्य— नं. १ चे पत्रांत भगवंतराव अमात्यास महाराजांकडून जी वतन-सरंजामासाठी राजपत्रें पाहिजे होतीं त्यांची यादी दिली आहे. हें पत्र शके

१७६६ फाल्गुनांतील असल्यामुळें त्याचा सन १७४५ येत आहे. चुकून १७४४ मध्यें लागले आहे. भगवंतरावांचीं पुरातन वतनें ज्यांच्या ताब्यांत होतीं त्यांस हीं राजपत्रें जावयाचीं होतीं. या नांवांपैकीं कांहीं नांवे एकदम समजण्याजोगी नाहीत. येसूदादा हा शाहूच्या रखेलीचा मुलगा असावा. याला कुसाजी म्हणून भाऊ होता. सिवजी थोरात हा सिदोजीचा मुलगा असावा. शामराव रंगनाथ याचें नांव पे. द. २७. ७९ मध्यें चुकून रंगनाथऐवजीं नागनाथ छापले गेले आहे. राणोजी घोरपडे हा कापशीर होता असे पे. द. २६ मधील पत्रावरून निघते. सावंत कोण समजत नाहीं. याच्या धामधुमींचा उल्लेख १७४४ मधील पत्रांत आहे. ती याच सुमारास झाली असावी. नं. ४१ मध्ये भगवंतरावास दिलेल्या कर्जाच्या फेडीबद्दल वैद्यांनीं पत्र लिहिलें त्याचें हे उत्तर आहे. जिन्नस विकून दसऱ्याचे सुमारास पैशाची तजवीज करीन म्हणतो. कुणबिणी पाठविण्याचा उल्लेख यात आहे. वतनाबद्दल खटपट करावी म्हणून वचनाची आठवण दिली आहे. नं. ४५ मध्यें भगवंतरावानें मुलाच्या लग्नाकरतां घेतलेले रु. २०० सव्याज वैद्यांना परत केल्याचा मजकूर आहे रुपयापुढे आणे, पै नसल्यामुळें अळ्यासारखी खूण पूर्वी केली आहे 'सर्वस्व जाऊं परंतु पत व इतबार उरो' ही एक म्हण यांत आहे.

(ऊ) भोसले—नं. ७ मध्यें वैद्यांकडून घेतलेल्या रु. २५,००० ची पावती रघूजीनें दिलेली आहे. हे रुपये विठोबा ना। वाकडे यांनी दोन लक्ष चंदाखानाबद्दल म्हणून द्यावयाचे त्यापैकीं होते. पूर्वी वैद्यानी २०,००० रु. दिले होते त्याचाहि यात त्याने उल्लेख केला आहे. रकमेस व्याज द. म. द. शे. रु. २ कबूल केले आहेत. अखंडित लक्ष्मीच्या पूर्वी लपेटीदार 'द' हे अक्षर बहुतेक ठिकाणीं असतें. पण कधीं 'द' च्या पूर्वी उभ्या दोन रेघाहि असतात. राजवाडे 'दा।' हा हेमाडपंती बहुमानार्थी शब्द म्हणतात. तो '।।द' असाहि पूर्वी लिहीत असतील नं. १२ मध्यें रघूजी महाराजांकडे आल्यास परत नागपुरास लवकर जाण्यास परवानगी मागत होता. ती त्यास मिळाली नाहीं, म्हणून त्याने विश्वनाथभटांस विनंति केली आहे. फत्तेसिंग भोसले या वेळीं महाराजाकडे आला होता. त्यास जाण्यासाठीं परवानगी मिळाली होती. पेशव्यासही ती मिळाली होती. विश्वनाथभटांच्या शब्दाला महाराज मान देतात ही भोसल्याची खात्री दिसते. नं. १८ हे पत्र रघूजीनें आप्पाजी जिवाजी यास नागपूरच्या दफ्तरदारीबद्दल लिहिले आहे. याचा खुलासा पत्रे या (इ.) सदरांत नं. २३ खाली केला आहे. रामाजी महादेव हा माखजनच्या आप्पाजी महादेवाचा भाऊ असावा. आप्पाजी महादेवास कान्हाटीच्या वसुलासाठीं पाठविल्याचे एक पत्र आहे. नं. २६, २८, ३१, ३३ ते ३९ या पत्रांत रघूजी साताऱ्यास येऊन चंदाखानास द्यावयाच्या साडेसात लाखाच्या रकमेच्या वाटाघाटीसाठीं देऊरास जात आहे व तेथे वैद्य, वाकडे व बर्वे यास बोलावीत आहे, असा मजकूर आहे. यांत वैद्यबंधूंची याचसंबंधीं एकमेकांस पत्रें आहेत. या वेळीं उदाजी पवारहि साताऱ्यास

विश्वनाथभटांची गांठ घेण्यास आलेला आहे. यांतील ५–६ पत्रे सबंध रघूजीच्या हस्ताक्षराचीं आहेत. कांहीं पत्रांत जनोबांचा उल्लेख आहे तो रामाजी ऊ. बाबुराव मल्हार बर्वे यांचा परभू गंगथडीचा दरकदार कारकून होता. याचे आडनांव चिटणीस आहे. कांहीं पत्रांत 'रघूजी'च्या ऐवजीं चुकून 'राणोजी" असें लिहिले गेले आहे, ती चूक छापण्यांत सुधारली आहे. हरीपंत हा भोसल्याचा दिमत हरी रघुनाथ जोग होय. 'शामराव' म्हणजे शामराव गोविंद टकले हा मराठ्यांचा औरंगाबादेस वकील होता. त्रिबकराव कोण हे समजत नाही. याच कागदांत होनाजी मोहिते व बहिरजी महाडिक यांची या वेळी रघूजीस काय जरूर होती कळत नाहीं. तसेंच अटोळे व पवार यांस हातरोखे कशाबद्दल पाहिजे होते समजत नाही. अण्णा हें नांव विठोबा नाईक वाकड्यासाठीं आहे. नं. ४२ व ४३ ह्या पत्रांत ७॥ लाखांची तजवीज कशी करावयाची याबद्दल रघूजीबरोबर जो करार झाला त्याची माहिती आहे. रामाजी मल्हार बर्वे हा बाजीराव पेशव्याचा मावसभाऊ होता. नं. ५४ हें पत्र बाबुराव भोसले यांनीं विश्वनाथभटांस लिहिले आहे. हा मराठा नसून ब्राह्मणच आहे. तो जगोबा ना॥ गोडसे यास रु. २,७०० देण्याबद्दल लिहितो. हा ब्राह्मण असल्याचे वै. द., खं. २, पृ. ३४ वर दिले आहे. शिवाय तो एका पत्रांत नमस्कार लिहितो. मराठा असता तर दंडवत लिहिले असते.

(ऋ) जयगडच्या कऱ्हाटेश्वरचे देवालय व गंगेस समुद्रापर्यंत जाण्याच्या पायऱ्या वैद्यांनींच बांधल्या. त्याबद्दल कृष्णभट काळे, रा. नांदिवडे, यांचे पत्र आहे ते छापले नाहीं.

(ए) आंग्रे— नं. ४ मध्ये छत्रपतिमहाराज, येसाजी भोसले (शाहूची रखेली लक्ष्मीबाई इचा मुलगा) यास मजशी लढण्यासाठी पाठविण्याच्या बेतांत आहेत, असे कळल्यावर तुळोजी आंग्रे वैद्यबंधूंना लिहितो की, सौ. सकवारबाईचे वशिल्याने घनबा मंत्री यास पाठवून येसाजीस आणीत आहेत हा बेत रहित करावा. या वेळीं तुळाजी सरखेल झालेला होता. नं. २० मधील मजकुरावरून वैद्यांच्या साहाय्यानें तो महाराजांची मर्जी संपादन करीत आहे. विसाजीपंत व गंगाधर काशी यांसही त्याने साताऱ्यास पत्रे लिहून महाराजांकडून आपणास काय पाहिजे तें कळविले आहे. यासाठीं त्यानें बापूजी महादेव यास मुद्दाम त्यांचेकडे पाठविले होतें. नं. ४९ मध्यें तुळोजीनें आपले काय म्हणणे आहे तें आबाजी रंगनाथ यास पाठवून कळविले आहे. नं. ५२ मध्यें शाहू-महाराजांना खजूर, मासे व बोबील पाठविल्याचे तो वैद्यांना कळवीत आहे. नं ५६ मध्यें तुळोजी वैद्यांना महाराज मजवर रुष्ट कां झाले आहेत ते विचारतो व त्यांचा राग वेळ पाहून घालवावा अशी विनंति करतो.

# १७४५

( अ ) आज्ञापत्रे :—नं. २ मध्ये चिंचवडच्या देवांनी वैद्यांना आज्ञापत्र पाठविले आहे कीं, देवाच्या अन्नछत्राचे खर्चासाठीं मौजे माण व आंबी हे गांव इनाम आहेत, त्यांत मोकदमाच्या पासोडींत आंब्याचीं झाडे आहेत त्यांतील फळे माहादजी खोडकर नेऊं देत नाहीं तरी महाराजांकडून हा हरकत नाहीशी होण्याकरितां हुकूम मिळवावा. भोसरी व थेऊरची व्यवस्था सुरळीत चालेल अशी काळजी घेण्याबद्दल लिहिले त्यावरून त्या गांवाबद्दल कांहीं भानगडी असाव्या. देवांनीं आपला कारकून नानाजी महादेव वैद्यांकडे या कामासाठीं पाठविला होता. पुणे-खेडच्या वाटेवर भोसरी गांव असून तेथे एक मोठे तळे आहे. त्यांतील पक्ष्यांच्या शिकारीसाठी लोक जातात. पासोडी म्हणजे इनाम जमीन. आंबी हे गाव मोरगांवापासून २।३ मैल आहे. तेथे आंबीकर घराण्यांतील माणसे आहेत. न. ४ मध्ये दिल्लीच्या बादशहाने विश्वनाथभट वैद्यास कळविले आहे की, देवगड प्रांताची पोतदारी शेकडा २ प्रमाणे रघोजी बाबांनीं तुम्हांस दिल्याचे पत्र दिले आहे ते आपणही मंजूर केले आहे; त्याप्रमाणे उपभोग घ्यावा. या वेळीं महमदशहा बादशहा तख्तावर होता. त्याची कारकीर्द १७१६ ते १७४८ पर्यंत होती. त्याचा शिक्कामोर्तब या पत्रावर फारशीत आहे. न. ३० मध्ये तुळोजी आंग्र्याचे आज्ञापत्र आहे, दाभोळमधील खडकरांचे सावड्यांचे वतन सुरू केल्याबद्दल जयगडचे अमलदारास ते काढले आहे. हे मध्यंतरी हबशांचे लुटीमुळे बंद होते. त्याबद्दल त्याजकडून हरकी ( दंड ) रु. ३७५ घेतला. तिकडे लारी नाणे होते. ४ लारी म्हणजे १ रुपया. वै. द., खंड १ मध्ये खडकरांचे ७१८ कागद या वतनासंबंधीं छापले आहेत.

( आ ) ताकिदी:— नं. २८ ही ताकीद वैद्यांनीं मौजे वाकी, परगणे सुपे, येथील मोकदमाकडे त्या गावचे पाटील व कुलकर्णी यास देण्याकरतां पाठविली आहे. त्यांना तावडतोब वसुलाचे हिशोब घेऊन बोलावले आहे. हुकूम पाळला नाही तर दामाजी शंकराची जी स्थिति झाली तशी होईल, अशी तंबी दिली आहे. अशा ताकिदी पुष्कळ आहेत. त्यांपैकीं ही घेण्याचा उद्देश इतका कीं, मोकदम हा पाटीलकुलकर्णीव्यतिरिक्त निराळाच बलुतेदार असला पाहिजे. हल्लीं गांवांत मुकादम कोणी बलुतेदार नाहीं. हा गांवकामगार कधीं नाहींसा झाला कळत नाहीं. हा सर्व वतनदारांच्या वरचा अधिकारी असावा.

( इ ) पत्रें ( वैद्यांस आलेलीं ):—नं. ७ चें पत्र नारो अनंत गद्रे, वैद्यांचे इनाम गांव भुगांव येथून लिहीत आहे. रामाजी ना। काळे ह्याची नागपुराकडे मोटी सावकारी होती. त्याचे दुकानची रु. १००० ची हुंडी घेऊन त्याने भुगांवचा वसूल पाठविला. त्यास हुंडणावळ व बटा मिळून १४० रु. खर्च आला. हल्लीं इतके पैसे पोस्टल मनीऑर्डरीने किंवा चेकने पाठविण्यास फारच थोडा खर्च येतो. रघूजीनें

नजरपट्टीबद्दल ७५० रु. घेतले हा हिशोब गद्रे यांनीं १७४४ मधलि नं. २ च्या पत्रांत दिला आहे. या वेळीं रघूजी वणी येथे लढत होते. हें ठाणे चांद्यापासून १ मजल आहे. वणी हे वर्धा नदीच्या कांठीं आहे. रघूजकिडून नाहक घेतलेल्या पैशाबद्दल दाद मागण्यासाठीं गद्रे रघूजीकडे गेला होता, कृष्णाजी वामन खरे निर्मळेस होते तिकडेच शंकराजी कान्होस वसुलीस पाठविलें होते. नं. ९ चे पत्र शंकराजी कान्होने भुगांवाहून लिहिले असून त्यांत झुलाजी जगन्नाथ देशमुखावर विश्वास ठेवल्यामुळे वसुलाचे पैशांत कसे नुकसान झालें याचे वर्णन केले आहे तो स्वतःस देशमुखी व पाटीलकी या वतनांच्या सनदा मागत आहे. 'स्वामी जिकडे वळतील तिकडे हत्ती देतील' ही म्हण यांत आहे. गद्रे यांच्या सांगण्यावरून झुलाजीस वैद्यानीं पाटीलकी दिली. एकाच मालकाचे कारकून एकमेकांचे उणे कसे काढतात याचा नमुना या पत्रांत सांपडतो. नं. ११ मध्ये हरी रघुनाथ जोग दिमत रघूजी भोसले हा वैरागडाहून विश्वनाथभटांस, रघूजी या सालच्या बंगालच्या स्वारींत जात असतां वैद्यांच्या वसुलाबाबतींत झालेले घोटाळे उलगडण्यास त्यांचे कारकून नारोपंत व गोपाळपंत गद्रे व शंकराजी कान्हो, रघूजीला भेटण्यास आल्याचे कळवितो. यात हा विश्वनाथभटांस नागपुरास येण्याबद्दल लिहीत आहे. हा रघूजीबरोबर १७४४ मध्ये देऊर इनाम गांवीं चंदाखानाच्या पैशाच्या ठरावाच्या वेळी हजर होता. नं. १२ चे पत्रांत चाफळचे लक्ष्मणबावा स्वामी ( रामदासांचे भाऊ गंगाधरस्वामी यांचा नातू ) वैद्याना दासनवमीच्या उत्सवाचें अगत्याने निमंत्रण देत आहे. नं. १६ ह्या पत्रांत राघोबा दरवे वैद्यांना रु. १,००० चिपळूणच्या बंदराच्या मक्त्याबद्दल आंग्र्यांस देण्यासाठीं तानशेट तेल्याबरोबर पाठवावे असे लिहीत आहे. हा नांदिवड्याचा राहणारा असून श्रीकारापुढे 'कन्हाटेश्वर' व पत्राच्या शेवटीं विनंतीच्या पुढे 'लक्ष' असे शब्द लिहितो. नं. २० मध्ये विठ्ठल अण्णाजी नागपुराहून तिकडील वसुलासंबंधी हकीगत कळवितो. रघूजी संबळपुराकडे गेला आहे व आवजी कवडे देवगड प्रांतीं येणार ही बातमी त्यात लिहिली आहे. कुणबिणी पाठविण्याबद्दलही मजकूर यांत आहे. नं. २७ हे पत्र सिंहगडचे किल्लेदार खंडो मल्हार याने लिहिले आहे. या पत्रावरून विश्वनाथभट यांस देवी येऊन आतां ते बरे झाले आहेत असे समजतें. किल्लेदार यांस वैद्यांचे देणे होतें ते फेडण्यास मामलत मिळवून घ्यावी असे तो म्हणत आहे. नं. ३७ चे पत्र प्रांत देवगडचा सुभेदार आप्पाजी जिवाजी याने नागपुराहून लिहिले आहे. याने साताऱ्यास रघूजीस २ लक्ष १० हजार देऊन मामलत मिळविली, त्यास १॥ वर्ष झाले. या मुदतीत जो वसूल झाला त्यापैकीं १ लक्ष १० हजार विसाजी गोविंदाचेमार्फत सरकारांत भरले. मल्हारराम घारपुरे यांनीं हमी दिली म्हणून ८५००० रुपये दिले. शिवाय शिबंदीचा रु. ४५००० खर्च जाहला व समाईक खर्च रु. १। लाख झाला. रसदेच्या म्हणजे सैन्याच्या खर्चासाठीं रु. ६०,००० मिळाले होते.

सौ. सकवारबाई, जानोजी भोसले, जिवराव मोहिते, व तुळजोराम यांनीं गेल्याचे-मागील श्रावणांत मामला काढून घेण्याचा विचार केला व ते पैसे सरकारांत घेण्याचे ठरविले होतें. अप्पाजीने त्यांस सांगितलें, मी मामला सोडीत नाहीं, आम्ही १०० ब्राह्मण येथें आहोंत, तुम्ही आमच्या कमाविसदारास मामलत करू दिली नाही तर तुमच्या घरापाशीं बसून प्राणत्याग करूं. तुमची कचेरी रक्तबोंबाळ करू. दोन महिने अप्पाजीने अशा निग्रहानें दिवस काढल्यावर तडजोडीस येऊन त्यांनीं २० हजार देण्याचे कबूल केले व आलेला प्रसंग विल्हेस लावला. कोन्हेरपत कोलटकर, पुरुषोत्तमभट शेवडे यांचेकडील रक्कम मिळाली नाहीं. कोन्हेरपत भोसल्याबरोबर बंगाल्यांत गेले व पुरुषोत्तमभट वारले. विसाजी गोविंद हे राज्यकारभारांत निर्माल्याप्रमाणे आहेत, तेव्हां आप्पाजी जिवाजी वैद्यांस म्हणतो कीं, तुमच्याशिवाय आम्हांस प्रसंगांतून वाचविणारा कोणी नाहीं. त्याने मार्गशीर्ष मासीं जमाबदी झाल्यावर हा प्रयत्न करून वैद्यांस १००० देण्याचे कबूल केले. सौ. सकवारबाईसाहेब, जानोजीबाबा, जिवराव मोहिते व तुळजोराम व विसाजी गोविद यांजला महाराजांकडून ताकीदपत्रे पाठवून पैसे वसूल करावे, असा अप्पाजीपताने वैद्याना सल्ला दिला आहे.

पत्रें ( वैद्यानीं लिहिलेली ) :—नं. ३ हे पत्र वैद्यांनीं भवानजी मांबले यास लिहिलें आहे. त्याला तुळोजी आंग्र्यास लिहिलेले पत्र जयगडास अमलदाराकडे देण्याला लिहिले आहे. अमलदार तेथें आंग्रे नसले तर पत्रे विजयदुर्गास रवाना करतील. नं. ३५ चे पत्र विश्वनाथभटांनीं कोकणांतून बाळंभटांस लिहिले आहे. ते पुळे येथील अनुष्ठान संपवून तुळोजीस भेटण्यासाठीं विजयदुर्गास जाणार होते. बरोबर सौ. उमाबाई व बाबू होता त्यांस माखजनास पाठवून दिले होते. परत जाण्यास साताऱ्याहून पालखी तेथे मागविली होती. आंबरसेट कोयडा बरोबर देऊन तट्टें, खेंचरे व बैल पाठविण्याबद्दल त्याना लिहिले होते. हा सरंजाम माखजनास आल्यावर ते सौ. उमाबाईस घेऊन साताऱ्यास येणार होते. खेचरे ओझें वाहण्यासाठीं पूर्वीं वापरीत असे दिसते. पत्राची तारीख बरोबर नसावी असे वाटते.

पत्रे ( इतरांचीं ) :—यातील तीन पत्रे नारो अनंत गद्रे यांनी लिहिलीं आहेत. नं. १३ चे पत्र वऱ्हाडांत दुष्काळ असल्यामुळें वैरण महाग झाली, त्याचा दर इकडील सध्यांच्या दराशीं ताडून पाहण्यासारखा आहे. कडब्यास शेकडा ३ रु. व हरभऱ्यास दुसेरी पायली दर खंडीस ३० रु. असा भाव होता. वैद्यांचीं जनावरे तिकडे होतीं म्हणून त्याने नं. १९ चे पत्र करकरे यास लिहिले होते. गोवलकोट व अंजनवेल तुळोजींने घेतल्याची बातमी त्यास कळली, पण रत्नागिरी व जयगडची बातमी न लिहिल्यामुळे तो दोष देतो. वरवड्याचे व रीळचें देवालय बांधण्यासाठी शिवभट सांव्यानें वैद्यांना पैसे पाठविले होते, म्हणून तीं देवालये बांधून झालीं किंवा नाही त्याबद्दल साठे चौकशी करीत होते, हा मजकूर त्यांत लिहिला आहे. नं. २१ चे पत्रांत करकरे यास त्याने कळविलें आहे कीं, रघूजी भोसले विश्वनाथभटांवर नाखुष

झाल्यामुळे वसुलास अडथळा येतो, म्हणून त्यांनीं तिकडे जरूर जावें हे बरें. नं. २१ च्या पत्रांत शिवाजी चौधरी कटक येथून लिहितो कीं, मकसुधा (मुर्शिदा) बादेस सटवाजी व रायाजी जासूद गेले होते; पण रायाजी गोळी लागून मेला. डाक्याचा हसनमुलीक सुभेदारही मारला गेला.

(ई) हिशेब:--विश्वनाथभट साताऱ्याहून कोकणांत गणपतीपुळयास गेले, त्या वेळीं त्यानीं केलेल्या खर्चाची ही नं. ४१ ची यादी आहे. यांत कोणत्या दिवशी कोठे मुक्काम केला हे दिले आहे. मुक्कामाचीं नांवें:—पाली, चाफळ, मटोसी, मलाघाट, संगमेश्वर, आबेड खुर्द, कोतवडे व गणपतीपुळे. पुढचे खर्चाचे बंद मिळाले नाहींत.

(उ) नं ४० मध्ये बाबुराव वैद्य यांची जन्मपत्रिका आहे. तिच्या पुढचे पान मिळाले नाही.

(ऊ) अमात्य:— भगवंतराव वैद्यबंधूंस नं. ८ मध्ये लिहितो की, कोल्हापूरचे राजे व राणीसाहेब, अर्जोजी यादवाच्या तंत्राने वागतात. त्यांचा बेत, यमण्णा चिकोडीकर, राणोजी घोरपडे कागलकर याची व आमची कुरापत काढून त्रास देण्याचा आहे. गगाधरपंत प्रतिनिधीस बोलावून त्याबरोबर ठरल्याप्रमाणे न वागल्यामुळे त्याचा उपमर्द झाला. श्रीपतराव महाराजांकडे आले आहेत, त्याच्याबद्दल काय विचार केला तो कळला असेल. अंजनवेल व गोवलकोट तुळोजीने घेतले, हे कळले असेल. भगवंतराव वतनांचीं राजपत्रे मागत आहे. वृद्धापकाळ होईपर्यंत छत्रपतींनीं कांहीं न दिल्यामुळे वैतागून यात्रेस जाण्याचा बेत करणार म्हणत आहे. वैद्यानीं पालखीची दांडी मागितली होती, ती त्याने पाठविल्याचे यात लिहिले आहे; इतर पत्रांप्रमाणे यांत आपल्या हलाखीचेही वर्णन आहे. न. ३८ च्या पत्रांत भगवतराव लिहितो कीं, कोल्हापूरच्या सौ. राणी जिजाबाई यानी अर्जोजी यादवास पुत्र मानून आपाजी शितोळे व यमण्णा चिकोडीकर याबरोबर सख्य करून इंगली घेतली. राणोजी घोरपडे सेनापति व निपाणकर यांना बोलावून आणून कागल, मुरगूढ, टिकपुरली हीं गांवें घेतलीं व नतर आम्हांवर चालून येण्याचा बेत चालला होता. मुरारराव घोरपड्याचा भाऊ दौलतराव यांचे लग्न खासखेलच्या मुलीबरोबर माघ मासीं करण्याचे ठरल्याची बातमी यांत कळविली आहे. वैद्यानी या बातम्या महाराजांच्या कानांवर घालाव्या असा उद्देश अमात्याचा होता. संताजी घोरपड्यास ममलकतमदार हा किताब होता. हिंदुरावही तोच होता. तो लग्न ठरविण्यासाठीं गेला होता.

(ऋ) भोसले:--नं. १० मध्ये रघूजी भोसले, अप्पाजी जिवाजी, सुभेदार प्रांत देवगड यास लिहितात की, विश्वनाथभट वैद्यांस दरबारखर्चाबद्दल रु. दोन हजार पोचले नाहीत ते त्यास बाकी न ठेवता देऊन टाकावे. पत्रावर शिक्कामोर्तब व शेवटीं स्वतःचे 'बहुत काय लिहिणे' हे वाक्य आहे. न. १४ जानोजी भोसल्याचे विश्वनाथभटांस पत्र आहे. यांत महाराजांनीं १७४३ च्या सप्टेंबरांत पतप्रधान व रघूजी

यांच्या हद्दी ठरवून देऊन सख्य केलें तरी त्यांचा सरदार आवजी कवडे व जयप्पा शिंदे यांनी वऱ्हाड प्रांतीं येऊन गांवांची जाळपोळ करून लुटालूट केली व २० हजार रु. नेले या कृत्यांचें वर्णन यांत आहे जानोजीने फौजेसह जळगाव–जामोदकडे खानदेशच्या हद्दीवर पेशव्याच्या मुलुखांत जाऊन त्यास कांहीं उपद्रव दिला नव्हता. ही हकीकत वैद्यांनी महाराजांच्या कानावर घालावी म्हणून जानोजीने लिहिली आहे. पेशवे व रघूजी याचा तंटा मिटविण्याच्या कामीं वैद्य मध्यस्थ असावेत. जानोजी हा रघूजीचा सर्वांत वडील मुलगा सौ. मुलाबाईपासून झालेला होता. रघूजीनंतर जानोजीस गादी मिळूं नये म्हणून त्याच्याबरोबर मुधोजी भांडत होता. हा वडील स्त्री सगुणाबाई इजपासून झालेला होता. पत्रावर जानोजीची मुद्रा व शिक्का आहे. याचे एका पत्राचा फोटो नागपूर प्रांताच्या इतिहासांत आहे व धुळ्याच्या रा. भटांनी 'मुद्रांचे प्रदर्शन' म्हणून लिहिलेल्या लेखांत शिक्क्यांतील मजकूर दिला आहे. दोहोंतील शिक्क्यांत व या पत्रावरील शिक्क्यांत फरक आहे. काळ्यांनी व भटांनी जानोजी रघूजीचा शिक्का वापरीत असे, त्याचा शिक्का निराळा नव्हता असे लिहिले आहे. नं. २२ मध्ये रघूजी वैद्यांना कटक कसे घेतले हे कळवीत आहे. येतांना देवगड प्रांताचा बंदोबस्त करून धरमतरी व रायेपूर संस्थानातून संबळपूर डावे बाजूस टाकून फाल्गुनांत कटकला तो आला. अलीवर्दीच्या लोकांस किल्ल्याबाहेर रघूजी आल्याची बातमी कळताच ते किल्ल्यात शिरले. रघूजीने मोर्चेबंदी करून त्यांस जेरीस आणले व किल्ला हस्तगत केला. पुढे रघूजी मुर्शिदाबादेस गेला. नं. २३ मध्ये रघूजीने त्याच दिवशी कटक किल्ला घेतल्याची हकीकत महाराजांना कळविण्यासाठीं वैद्यबंधूना लिहिली आहे. अलीवर्दीचा दिवाण जानकीराम व त्याचा पुत्र दुलभराम हे दोघे पकडल्याचा मजकूर यांत जास्त आहे व तो पत्रात रघूजीने स्वतः लिहिला आहे. दरबारी कामाबद्दल सर्वस्वी रघूजीने वैद्यावर भरंवसा ठेविला होता.

( ऋ ) सोमवंशी—नं. ५ चे पत्र प्रतापजी सोमवंशीने वैद्यबंधूंस लिहिले आहे. प्रतापजी व आप्पाजी हे संताजीचे मुलगे असून आप्पाजी जरी धाकटा होता तरी त्यास सरलष्करी मिळाली होती. या वेळीं प्रतापजी आजारी होता. यामुळे त्यास अंजनवेल व गोवळकोटच्या मोहिमेवर जाणे शक्य नव्हते. म्हणून तो वैद्यांना, ही मोहीम तूर्त रहित करण्याचे ठरवावे म्हणून लिहीत आहे. सोमवंशीचा दिमत बाबूराव रघुनाथ हा वैद्यांकडे प्रतापजीने पाठविला होता. त्याचे आडनांव देवस्थळी असावे. या वेळी आपाजी भेलशाच्या मोहिमेवर गुंतला होता. नं. २४ मध्ये आपाजी सोमवंशी सरलष्कर बुंदेलखडांत भेलशाचे मोहिमेवर असतां त्यास वैद्यांचे पत्र मिळाले त्याचे उत्तर त्याने माळव्यांत गेल्यावर लिहिले, ते हे आहे. पैशाच्या दृष्टीने आपली ओढाताण झाल्याचे त्याने कळविले आहे. वैद्यांचे कर्ज त्यास फेडावयाचे होतें.

( ऌ ) आंग्रे :—नं. ६ मध्ये तुळाजी आंग्रे सरखेल बाळंभट वैद्यांना अंजनवेल व गोवलकोट सिद्द्यांशीं लढून घेतल्याचे वृत्त कळवीत आहे. पहिला किल्ला बुधवार २३।१।४५ रोजीं व दुसरा किल्ला २५।१।४५ रोजीं २ दिवसांच्या अंतराने घेतला. त्यानें त्यांची नांवे अनुक्रमे गोपाळगड व गोविंदगड अशीं ठेविलीं. नं. १५ मध्ये महाराजांना शिमग्याचें सणासाठी गुलाल, गुलाबाचे शिसे व खजूर देण्याकरतां वैद्यांचेकडे पाठविल्याचे तो लिहीत आहे. नं. १७ मध्ये तुळोजी वैद्यांना लिहितो कीं, हबशी ( शामल ) याजबरोबर लढून बाणकोट हस्तगत करून वसविला, हे वृत्त महाराजास कळवावे, सर्व गड, किल्ले महाराजांचे नांवासाठी रक्षण करीत आहोत, त्याची कृपा संपादन करण्याकडेच लक्ष आहे. हे महाराजाचे मनावर त्यास वैद्यांमार्फत ठसवावयाचें होते. या प्रयत्नांत बकाजी नाईक तुळोजीस मदत करतांना मेला. नं. १८ चे पत्र विश्वनाथभट वैद्याना अजनवेलहून केसो त्र्यंबक लिहीत आहे. शाहू छत्रपति तुळोजीकडे विश्वनाथभट वैद्यांस पाठवीत आहे हें कळताच त्यांस आनंद झाला व त्याने कोणत्या मार्गाने जावे हे कळविले आहे. त्यानें त्याच्याकरता जयगडास गलबत तयार ठेविले होते. नं. ३४. हे पत्र केसो त्र्यंबकानच वैद्यबंधूना लिहिले आहे. यांत महाराज छत्रपति व सौ. राणी सकवारबाईसाहेब याचे, यजमाना (तुळोजी) बद्दल काय मत झाले आहे, ते विचारले आहे; तसेंच श्रीनिवास पंडितांचा पुढें काय बेत आहे याचीही चौकशी केली आहे. केसो त्र्यंबक यास अंजनवेल घेतल्यावर तेथेच हबशाच्या अमलाप्रमाणे कारभार चालविण्यास ठेविले होते. नं. ४२ चे पत्रांत तुळोजी विश्वनाथभटांस पुळे गणपतीहून विजयदुर्गास बोलावीत आहे.

( ए ) हणमंते—नं. १ मध्ये व्यंकटराव गंगाधर हणमते यांचे पत्र विश्वनाथभटांना लिहिलेले आहे. वैद्याच्या कर्जफेडीचा तगादा त्याजकडे लागला होता. आपली हीन, दीन स्थिति लिहून तूर्त सोय होण्यासारखी नाही असे, तो कळवीत आहे. यांत एक म्हण आली आहे : ‘ रिणे, हत्या व वैर कोणास सुटले असे नाही ! ’ श्रीकारापुढे ‘ मूलपीठ निवासिनी प्रा ’ असे लिहिले आहे. ‘ मूलपीठ ’ याचा अर्थ कोशांत ‘ देवता ज्या ठिकाणीं प्रथमतः प्रकट झाली ते स्थान ’ म्हणजे ‘ उगमस्थान ’ असा दिला आहे. ‘ मूलपीठ निवासिनी ’ असा शब्द दिलेला नाही. ‘ महापीठ ’ म्हणजे पार्वतीच्या शरीराचे तुकडे ज्या ठिकाणीं पडले असे मानतात त्या पवित्र स्थानांपैकीं ३½ पवित्र स्थाने ( औटपीठे ) १ तुळजापूर, १ मालापूर व ½ कोल्हापूर, सप्तश्रृंग ही होत. तारीख बरोबर लागली नाहीं.

( ऐ ) कोलटकर :—नं. ३२ हे पत्र कोन्हेरराम कोलटकराने, बंगालच्या स्वारींत रघूजीबरोबर असतांना रामगडाहून वैद्यबंधूस लिहिले आहे. त्यांत स्वारीची बरीच सविस्तर हकीगत आहे. कटक घेऊन मूर्शिदाबादकडे सेनासाहेब गेले. तेथे पर्जन्य फार म्हणून बरद्वानला मुक्काम केला. तेथे अलीवर्दीचा वकील तहाचे बोलणें करावयास आला. त्याचेबरोबर निळो रघुनाथ वैशंपायन पाठविले. बरद्वानला चिखल

फार म्हणून रामगड प्रांतांतील डोंगराच्या आश्रयास राहिले. निळो रघुनाथ यांचे अलीवर्दीजवळ मूर्शिदाबादेस बोलणे २ महिनेपर्यंत झाले तरी तडजोड होईना. म्हणून तो रामगडाजवळ आला. अलीवर्दीशी २ महिन्यांनीं दसऱ्यानंतर सामना देण्याचे ठरले. नं. ३९ चें पत्र कोनेररामाने वैद्यबंधूंस सहस्रावजवळ मुक्काम असतांना लिहिले आहे. यांतही बंगालच्या स्वारीची हकीगत आहे. बंगाल प्रांतांत ५ महिने काढून स्वारी शोणभद्रतीरीं भोजपूर प्रांतांत आली. महिनापंधरा दिवस राहून मकार ग्रामीं ( मूर्शिदाबादेस ) जाणार आहेत. रघूजी वैद्यांच्या भरंवशावर इकडील कार्यभाग उरकीत आहेत. ही स्वारी भास्कररावाच्या खुनानंतर सूड घेण्यसाठीं असावी.

( ओ ) विसाजी गोविंद :— यांचीं २ पत्रें नागपुराहून वैद्यबंधूंना आलीं आहेत. दोहोंत बंगाल्यांतून आलेल्या रघूजीच्या स्वारीची हकीगत आहे. कोनेररामाने रामगड व सहस्राव येथून लिहिलेल्या हकीगतीप्रमाणेच ही आहे (नं. ३ व ३९ पहा ). दुलभरामास पकडून रघूजीनें आपल्याबरोबर मूर्शिदाबादेस नेले होते, असे नं. २९ च्या पत्रांत आहे. नं. ३१ मध्ये श्रीमंत व तीर्थरूप यांची पत्रें आलीं म्हणून लिहिले आहे. तीर्थरूप म्हणजे विसाजीचे वडील असावेत व ते रघूजीबरोबर बंगाल्यात गेले असें होत आहे. विसाजीचे आडनांव समजत नाहीं.

( औ ) बाबूजी नाा बारामतीकर :—नं. ३६ चे पत्र बाबुराव सदाशिव यांचे विश्वनाथभटास आहे. त्याने त्यास दरसालचे वेतन रु. १,००० देण्याचे ठरवून फडनिशी दिल्याचे यांत लिहिलें आहे. पण याचा बोध बरोबर होत नाहीं. या पत्रांतील बाबूराव सदाशिव हा बाबूजी नाा नव्हे की काय ?

( अं ) मनोहर :—यांचे दुसरें आडनांव फके ही आहे. ते कसे व केव्हां पडले समजत नाहीं. नं. २५ चे पत्र रामचंद्र विठ्ठल याने हमेदहून बाळाजी हरी मनोहर यास लिहिलें आहे कीं, विश्वनाथभटांकडून आमची खुशाली कळली असेल, आम्हांस बंगाल्यांत जावें लागणार असे दिसते. नं. २६ चे पत्र दोघांनीं वैद्यांस रतनपुराहून लिहिले आहे. मोहनसिंगाकडून रु. २५,००० येणे ते मिळाले नाहींत रघूजी कटक सर करून बंगाल्यांत गेले, तिकडे आम्ही जावे कीं काय ते कळवावें, असा मजकूर त्यांत आहे.

## १७४६

( अ ) आज्ञापत्रे :—नंबर ११ हे आज्ञापत्र छत्रपतींचे खाजगी कारभारी पत राजाज्ञा यांचे आहे. सौ. राणी सकवारबाईची मुलगी सौ. गजराबाई इजला मल्हारराव बांडे यास दिली. त्या लग्नांत अमात्य गदाधर प्रल्हाद आले होते त्यांच्याबरोबर त्यांचे जे आश्रित ११ जण आले होते त्यांस शिधा देण्याबद्दल लिहिले आहे. हा

शिवा २ दिवसांचा दोन वेळचा २२ असामींचा मंजूर झाला आहे. नं. १९ हें आज्ञापत्र पंतप्रधान नानासाहेब याचें आहे. चिमाजी अप्पाची मुलगी चि. सौ. बयाबाई इचें लग्न गंगाधर ना॥ ओकाराशीं झाले त्यासाठी लागणाऱ्या सामानाबद्दल काऱ्हाटी गांवाकडून रु. २५ यावयाचें ठरले असतां आले नाहींत, म्हणून मोकदमास पैसे घेऊन पुण्यास येण्याबद्दल हा हुकूम आहे. बयाबाई ही अन्नपूर्णाबाईची मुलगी होती. तिचे वडिलांचे नांव मोरो भिकाजी थत्ते होतें. हे माण्याच्या मराठी दफ्तरांत पान ७७ मध्ये दिलें आहे. नं. २० मध्ये कान्होजीराजे शिर्के यांचे कोकणांतील सावर्डें गांवाचे मोकादमास लिहिलेले आज्ञापत्र आहे. छत्रपतिमहाराजांनीं खंडकर घराण्यास या गांवांतील वसुलाबद्दल जे हक्क दिले आहेत, ते चालविण्याचे बाबतीत हरकत आणूं नये, असे त्यांत आहे. लारी हे नाणें कोकणांत चालत असे. यावर शिरक्यांचा शिक्कामोर्तब आहे. त्यातील मजकुरावरून शिरके हे दाभोळ प्रांताचे देशमुख सुभेदार होते. खंडकरांना ३८ गांवचा वसूल रु. १४१ मिळत असे. नं. २५ हें दस्तक पंतप्रधानांचें दिमत आवाजी कवडे यांनीं दिले आहे. वऱ्हाडांतील उमरखेडाहून हरी कृष्ण काणे ह्यांची बायकामंडळी देशी यावयाची होती त्यांचेबरोबर नारो अनंत गद्रे आहेत. त्यांस वाटेच्या सरदार व हवालदार यांनीं सुखरूप पोचविण्याची खबरदारी घ्यावी, म्हणून हा हुकूम आहे. उमरखेड व उमरेड हीं निरनिराळीं गांवें आहेत. नं. ३८ हे शाहूमहाराजांचे आज्ञापत्र अंताजी जाधव दिमत सेनासाहेबसुभे यास आहे कीं, 'प्रतिनिधींना इनाम गावें वऱ्हाडांत दिलेली आहेत, त्यांच्या वसुलास त्यांना हरकत येतां कामा नये. शेवटची ओळ महाराजांच्या हातची आहे. नं. ४० हे दस्तक रघूजी। भोसले यांनीं काढले आहे. रा.विश्वनाथभट वैद्य आपलें कापड व इतर सामान ५० बैलांवरून साताऱ्यास नेत आहेत. वाटेच्या सरदारानी व अमलदारांनी जकातीसंबंधीं त्यास तगादा लावूं नये असा त्याचा आशय आहे.

( आ ) पत्रे ( वैद्यांस आलेली ):—नं. १३ चे पत्र नारो रघुनाथ थोरात याने वैद्यबंधूंना लिहून, त्यांत त्याच्या भावाच्या सामानाची चोरी पावसवरून येत असतां झाली, ती पकडण्यास मदत करावी, अशी विनंति केली आहे. वैद्य हे कोकणांत बावडे घाटाने येणार हे त्यास कळले होते. याच सुमारास त्या घाटांत वाण्याची मुलगी चोरून नेली होती. तेच चोर थोराताच्या लुटींत सामील होते अशी बातमी लागल्यामुळे वैद्यांना हे पत्र त्याने लिहिले आहे. सामानाची किंमत ९०० रु. व रोख ३१८८- एवढ्याचे नुकसान झाले. चोरींत दोघांचे सोवळे गेले, म्हणून त्याने रामचंद्रपंत करकऱ्याकडून जुने अगर नवे सोवळे मागितले आहे. नं. १८ मध्ये पुरवणी पत्र रघूजीनें किंवा बाबूजी नायकाने कर्नाटकच्या मालमत्तीविषयीं विश्वनाथभट वैद्यांस लिहिलें आहे. देवराव लपाटे, जानोजीराव निंबाळकरामार्फत ती साध्य करण्याची खटपट करण्यासाठी साताऱ्यास महाराजांकडे गेले होते. सौ. राणीसाहेबांनींही

त्यासाठीं नबाबाकडे वकील पाठविला होता. अजून निकाल लागला नाहीं, तोपर्यंत फत्तेसिंग भोसल्याकडून कांही मदत मिळाल्यास प्रयत्न करण्याबद्दल पत्रांत सूचना आहे. नं. २५ मध्ये लंबोदर धुंडिराज याने पवनीहून बंगालच्या स्वारीची हकीगत विश्वनाथभटांस कळविलेली लिहिली आहे. त्यास असे कळले की, आपाजी सोमवंशीस ३ जखमा झाल्या, त्याजबरोबर रायाजी पांढरे, येसाजी अटोळे, आबाजी शिंदे व हरजी शिंदे आहेत, ते मुस्ताफाखानाच्या डेऱ्यांत असून त्यांच्यासाठी रोज १०० रु. खर्चास मिळतात, तुळजोपंतांनी बैरागी पाठवून खरी बातमी मागविली आहे. नं. २९ हे पत्र आनंदराव सखदेव सेनाकर्ते यांनीं विश्वनाथभटांस लिहिले आहे. सखदेवाचे मामा कृष्णाजी भास्कर होते. ते रघूजीचे नोकर होते. ते गेल्या श्रावणांत वारल्याचे त्याच्या जांवयानीं लिहिलें आहे. भोसल्यांनी त्याच्या भिडेमाडेने त्यास कर्ज दिले होते, हे सौ. राणीसाहेबांस कळतांच त्यांनी त्याच्याकडे हुजरे व राघो अनंत कारकून पाठविले आहेत. म्हणून सखदेव विश्वनाथभटांस लिहितात कीं, तुम्ही आमचे नातलग आहात, या संकटातून सोडवावे. सखदेव वैद्यांना मामा म्हणतात तेव्हां सखदेव यांचे नाते असले पाहिजे.

पत्रे ( वैद्यांनी लिहिलेलीं ):—नं. ५ मध्यें बाळंभटांनी नारो अनंत गद्रे यास, महाराजांचे घरचे लग्न म्हणजे सौ. सकवारबाईची मुलगी सौ. गजराबाइचे लग्न मल्हारराव बांडे याबरोबर होते, त्यासाठी त्याचेकडून काऱ्हाटीहून कांही सामान आणविण्यासाठीं हुजरे गेले होते त्यांस सामान देण्याबद्दल लिहिले आहे. काऱ्हाटीचा पाटील त्यासाठींच साताऱ्यास गेला होता. नं. २५ च्या पत्रांत बाळभटांनीं विश्वनाथभटांस लिहेलेला दरबारचा मजकूर फार महत्त्वाचा आहे. रघूजी व फत्तेसिंग भोसले यांची तेढ त्रिचनापल्लीहून चंदासाहेबास आणला तेव्हांपासून होती. विश्वनाथभट या वेळीं रघूजीकडे नागपुराकडे गेलेले होते. तेथे या दोघांची तेढ मिटविण्याबद्दल रघूजीचे पत्र त्यास आले होते. फत्तेसिंगास चादे राहावयास द्यावयाचे, वऱ्हाडपैकीं ५ महाल फत्तेसिंगाने रघूजीस द्यावयाचे व बाकीच्या त्याच्या महालांपैकीं निम्मे रघूजीस द्यावयाचे व निमे रायाजीस द्यावयाचे व बाकीच्या महालांची कमावीस फत्तेसिंगाने करावी, असा पूर्वीच ठराव झाला होता तमाच आतां होत असेल तर ठराव करावा, असे बाळंभटांनी त्यात लिहिलें आहे. कोनेरपंत कोलटकर यास घेऊन साताऱ्यास आले असतां महाराजाचे विचारे निकाल होईल, असे ते लिहितात, रघूनाथभट झिपरे ( पटवर्धन ) व बऱ्हाणजी मोहिते भाऊबीज करून नागपुराकडे जाणार आहेत, त्यांच्याबरोबर रघूजीची बहीण सौ. ठकाबाई ( नवलोजी गुजराची स्त्री ) जाणार आहे, बाबूजी नाईक बारामतीस आहेत, पुढे काय करणार कळलें नाहीं. राणोजी भोसल्याकडील १९ हजारांची हुंडी विश्वनाभटांनी पाठविली ती मिळाली नाहीं, पेशवे दिपवाळीनंतर बाहेर जाणार, या वेळी अवर्षणामुळें वाईसाताऱ्याकडे दुष्काळ होता. या बातम्याही त्यात आहेत. नं. ३६ चे पत्र बाळंभटांनीं साताऱ्याहून

विश्वनाथभटांना लिहिले आहे. या वेळीं रघूजी व त्याचा चुलतभाऊ ( कान्होजीचा मुलगा ) रायाजी यांच्या वांटणीचा तंटा चालू होता, तो महाराजांनी विश्वनाथभटाकडूनच मिटविला. शाहूची प्रकृति अशक्त असतांना देखील ही कामें करण्यांत ते गुंतत असत. नं. ३५ मध्ये लिहिल्याप्रमाणे बऱ्हाणजी मोहिते, सौ. ठकाबाई, रघुनाथभट पटवर्धन व कृष्णाजी केशव साताऱ्यास आले होते. 'कोणाचा पायपोस कोणाचे पायीं नाहीं' ही म्हण नागपूरच्या दरबाराबद्दल विश्वनाथभटांनीं वापरली आहे. बाळभट लिहितात कीं, रघूजीस साताऱ्यास येण्याबद्दल आग्रह करूं नये; या वेळीं सताजी ऊ. राणोजी व रायाजी एक होऊन वऱ्हाडांत रघूजीविरुद्ध धामधूम करण्याच्या तयारीत होते, ही बातमी साताऱ्यास नव्हती. त्या तिघांची एकी करण्यासाठीं महाराजांनी तिघाना साताऱ्यास घेऊन येण्याबद्दल विश्वनाथभटास लिहिले होते. छत्रपति व राणीसाहेब बाळंभटाजवळ विश्वनाथभटांबद्दल विचारपूस करीत. नं. ४६ मध्ये विश्वनाथभटांनीं बाळंभटांस उदरीनजीक वैरागडाहून लिहिलेले पत्र आहे. यात घरगुती मजकूर बराच असून रायाजी व रघूजी याची समजावीस केल्याची महत्त्वाची बातमी आहे. नारोपंत गद्रे व विश्वनाथभट ८।१५ दिवसांनीं देशीं जाणार, असेही यांत आहे.

( इ ) यादी : -न. १ मध्ये विश्वनाथभटानी महाराजांकडून ज्यांस ताकीद पत्रे घ्यावयाची त्यांची यादी आहे. यात ३ माणसें आहेत. १. महादजी शिंदे-यानीं जालनापूर परगण्यांत जी नासधूस केली ती त्या परगण्याच्या होणाऱ्या वसुलांतून भरून द्यावी अशा हुकुमाचे त्यांचा मुखत्यार नरहर लक्ष्मण यास पत्र. २. हणमंतराव अटोळे-सफेतजंग बहादूर यांजकडून परगण्याचा वसूल करतांना लोकांस त्रास होतो तो होतां कामा नये असे त्यास पत्र. ३. बाजी हरी सुभेदार, परगणे सुपे-हे वैद्यांच्या कान्हाटी इनाम गांवच्या लोकांस त्रास देतात म्हणून तसा त्रास न देण्याबद्दल त्यांस पत्र. नं. २१ ही बाळंभट वैद्यांनीं भिकभटांच्या मुंजींत देहेनगी म्हणून कापडचोपड ज्यांस दिले त्यांची यादी असून कापडाचे प्रकार कोणते व नग किती दिले याचा तपशील यांत आहे. यांतील स्त्रिया व पुरुष ह्याचा शाहूमहाराजांशीं नात्याचा किंवा घरोब्याचा संबंध असला पाहिजे. नुसती स्त्री-पुरुषाचीं नावे छापलीं आहेत. कापडाची यादी दिली. ही यादी सौ. सकवारबाईनीं सौ. गजराबाई (मुलगी) इच्या लग्नात नातेवाइकांना दिलेल्या देहेनगीबद्दलची असण्याचा संभव आहे. नं. २२ मधील यादी बाळभट वैद्यांच्या भिकोबाच्या मुंजींत ज्यांनीं वैद्याना अहेर दिले त्यांची आहे. यांतही वैद्यांच्या विशेष घरोब्याच्या माणसांची नावे आहेत. त्यावरून त्यांचा कोणाशीं परिचय विशेष होता हे कळून येते. अहेरांत कोणतीं सणगे आलीं याचा यांत तपशील आहे, तो छापला नाहीं. न. २७ मध्ये विश्वनाथभटांना आषाढांत कोणाकडून कोणते पोषाख आले त्याची यादी आहे. काय कारणाने हे मिळाले समजत नाहीं. यांत मोठमोठ्या सरदारांचीं नांवे आहेत. नं. ४२ मध्ये विश्वनाथभटांची रहाटगांव परगणे नांदगांव

पेठ यांत वऱ्हाडच्या मोकादमास लिहिले कीं, यंदांचा वसूल करण्यास गोपाळ अनंत गद्रे येतील त्यास मदत करून त्यास गांवखर्चातून पोटास द्यावे.

(ई) हिशोब— नं. १५ मध्ये विश्वनाथभट गोवलकोटास गेले असत झालेला खर्च दिला आहे त्यावरून ते तिकडे गेल्याचे निश्चित ठरते. नं. २४ मध्ये वैद्यांनीं पंतप्रधान नानासाहेब यास दिलेल्या रु. १५,००० चा उल्लेख आहे.

(उ) आमात्य— नं. ९ चें पुरवणी पत्र भगवंतरावाने शाहूमहाराजांस लिहिलें आहे. पत्रांतील सर्व मजकूर त्याच्या हातचा आहे. यांत कोल्हापूरची राणी सौ. जिजाबाई इच्या कारभाराची हकीगत आहे. दौलतराव घोरपड्याचे लग्न कोल्हापुरास झालें. बराच खर्चवेच महाराज व राणीसाहेब यानींच केला, पण बोलल्या बोलाप्रमाणेच न वागल्यामुळे लग्नांत रुसवारुसवी झाली. सर्व कारभार अर्जोजी यादवाच्या सल्ल्याने चालला होता. वतनी खेडीं दिलीं नाहीत, गंगाधरपंत प्रतिनिधि यास नेऊन पेशवाई देतो म्हणून सांगितले होते, दोन महिने राहून कांहीं मिळाले नाहीं म्हणून विशालगडास गेले, हा मजकूर यांत आहे. आणखी अशी बातमी महाराजांस कळविण्यासाठीं वैद्यांना लिहिली आहे की, सोंधेकर, वाडीकर सावंत व गोविंद ठाकूर यांनीं एकत्र होऊन अण्णाजी परभूस दगा केला, त्यास गोवेकराकडून पकडून नेले. न. १० च्या पत्रांत भगवंतराव मुलाच्या लग्नासाठीं वैद्यांना पैसे मागत आहे. तो म्हणतो, तुमचे वडिलांनीं आमचा सांभाळ केला, इमान शफत दिली, तुम्हींही दिली, पण आमचे ऊर्जित झाले नाहीं. भास्करभटांनीहि या घराण्यास पूर्वी मदत केली होती असे दिसून येते. वैद्यांच्या घरीं भिकंभटांची मुंज व अनुबाईचें लग्न होते. गरिबीमुळे भगवंतरावास त्यांच्या कार्यास हजर राहतां आले नाही. महाराज आमचे हित न करतां कोल्हापूरच्या राजावर सोपवितात याबद्दल तो त्यांना दोष देत आहे. पत्र वाचनीय आहे.

(ऊ) भोसले :— नं.२८ हे पत्र महाराजाचा हवालदार, महालभांडारगृह खंडोजी गोगवले यानें रघूजीस लिहिलें असून वैद्यांना रु. ८५० देण्याबद्दल त्यांत मजकूर आहे. रघूजीकडून दरसाल रुपये २ लाख यावयाचे त्यांत हे वजा पडावयाचे आहेत. हे रुपये बंगालच्या वसुलांतून असावे. पत्रावर गोगवल्याचा चौकोनी 'श्रीमोर्तबसुद' असा मोर्तब आहे व 'हे विनंति' हे शेवटचे शब्द त्याच्या हातचे आहेत. याचीं पैशासंबंधींचीं पुष्कळ पत्रे आहेत व लिहिणारा एकच कारकून असावा. त्याच्या वळणावरून याचीं पत्रे ठरवितां येतात. श्रीकारापुढे स्वतः 'रामोजयत' हा शब्द लिहिला आहे. नं. ३० मध्ये विश्वनाथभटांनी छत्तीसगडाच्या दरबारखर्चाबद्दल रघूजींनीं देवविलेल्या रु. २,००० ची वरात रघूजीचा लेकावळा मोहनसिंग याजकडे देऊन पत्र घेऊन येणारास रु. १०० मुजरा देण्याबद्दल लिहिले आहे. अशा चिठ्या किंवा वराती ज्याबरोबर पाठविल्या असतील त्यांचीं नांवे न लिहितां नांवाची जागा मोकळीच यांत आहे. असें कां असावें समजत नाहीं. कदाचित् पत्र लिहितांना कोण

पाठवावयाच, हे ठरलेले नसावे. नं. ३१ मध्ये श्रीपतराव प्रतिनिधि यांची स्त्री सौ. राधाबाई वारल्याची तारीख रघूजी भोसल्यांना कळविली आहे. श्रीपतराव २५।११।४६ रोजी सातान्यास वारले नं. ३२ मध्ये कान्होजी भोसल्याचा मुलगा रायाजी याने रघूजीस बंगालच्या स्वारीतून परत आल्यावर भामहून पाठविलेले पत्र आहे. रघूजी बंगाल्यांतून विजयी होऊन आल्याबद्दल त्याचें यानें अभिनंदन केले आहे. त्यानें पावसाळा संपल्यावर भेटण्यास येतो असे कळविलें आहे. त्या भेटीत तो आपल्या देण्याघेण्यासंबंधी पुढें काय करावयाचे हे ठरविणार आहे. गोपाळराव व राघो सुरो यांस रघूजीनें बोलावले होते. पे. द. २० १५ मध्ये यांचीं नांवे कान्होजीस पकडण्यासंबंधाने आली आहेत. गोपाळराव प्रकृति नीट नसल्यामुळे सातान्यास राहिले आहेत, दसरा करून येणार आहेत, राघो सुरो यास पाऊस थांबला म्हणजे पाठवूं व आम्हीही भेटण्यास येऊं असे त्याने लिहिलें आहे. नं. ३३ मध्ये विश्वनाथभटास रघूजी लिहितो की, साबाजी भोसल्याचा मुखत्यार व कमाविसदार विसाजी गोविंद यास कर्जफेडीसाठीं रु. ३७०० द्यावे. त्याने हे रुपये प्रांत देवगडच्या मोकदमास द्यावयाचे होते. विसाजी हा बाळाजी गोविंद खेरांचा कमाविसदार होता. (काळे यांचा नागपूर प्रांताचा इतिहास, पान १३२ पहा.) पत्राच्या शेवटीं रघूजीचे स्वतःचे अक्षर आहे. नं. ३४ मध्ये रघूजी प्रांत चांदे याचा सुभेदार महादजी केशव यास लिहितो की, वसुलापैकीं रु. २००० दरबारखर्चासाठीं विश्वनाथभटांस द्यावे. नं. ३९ च्या पत्रास पुरवणी आहे, त्यात रघूजी वैद्यास कळवितो की, आपला चुलता राणोजी यांच्या महालाच्या सनदा महाराजांकडून पाठवाव्या व कान्होजीचा मुलगा रायाजी याने मुलुखांत धामधूम करूं नये म्हणून महाराजांकडून ताकीद पाठवावी. हे कार्य उरकून वैद्यांस नागपुराकडे बोलावले आहे.

(ऋ) आंग्रे:—नं. २ मध्यें तुळाजी वैद्यबंधूंना लिहितो कीं, विसाजीपंत महाराजांस व तुम्हांस मला काय पाहिजे ते सविस्तर सांगतील. त्यानंतर त्यास तेथे ठेवून घेऊं नये. त्याने या पत्रांत वैद्यबंधु राजकीय बाबतींत महाराजांपुढे आपली बाजू चांगली मांडतील असा त्यांवर पूर्ण विश्वास असल्याचे प्रदर्शित केले आहे. नं. ३ चें पत्र तुळाजीनें महाराजाच्या नांवें लिहिलें असून विसाजी पंतास परत पाठविण्याबद्दल विनंति केली आहे. हें पत्र त्यानें स्वतः सर्व बालबोधींत लिहिलें आहे. नं ६ मध्यें तुळोजीने वाड्यांतील सौ. गजराबाईच्या लग्नासाठीं कांहीं सामान व तिळगुळाच्या २ पिशव्या विसाजीपंताबरोबर पाठविल्याचे वैद्यांना कळविले आहे. नं. ८ मध्यें तुळोजीने विश्वनाथभटांस कळविले आहे की, तुम्हास जयगडी भेटेन व या पत्राच्या पुरवणींत लिहितो कीं, रत्नागिरीस वाटाघाट जाहल्याप्रमाणे कार्य सिद्धीस न्यावे. नं. १८ मध्ये तुळोजी विश्वनाथभटांस कळवितो कीं, माझी गांठ जयगडी पडेल.

(ऋ) सोमवंशी:—नं. १२ हे पत्र वैद्यबंधूंना लिहून प्रतापजी कळवितो कीं, भालजी शिंद्याचें व त्यांचे सख्य नसल्यामुळे बीडच्या आसपास त्यांच्याशीं चकमक

उडाली. सुलतानजी निंबाळकर व त्याचा मुलगा लढाई देण्यास तयार आहेत. पत्र पूर्ण नाहीं. पत्रावरील शिक्का इतर त्याच्या शिक्क्यांहून मोठा आहे. नं. १६ मध्ये प्रतापजी वैद्यबंधूंना कळवितो कीं, मेहेकर प्रांतांत सिरपूर येथे वंजारी यांनीं बंडाळी चालविली आहे, त्यांनीं कांहीं पाटलांना ठार मारल्याचें कळल्यावर, आपाजी सरलष्कर त्या गांवी गेला व त्याने जवळच्या गांवच्या वंजाऱ्यांवर हल्ला करून त्यांचा नाश केला, इतक्यांत रघूजी भोसल्याचे सरदार ५-६ हजार सैन्य घेऊन तेथे आले व त्यांनी वंजाऱ्यास त्रास देऊ नये असे त्यास सांगितले, पण अप्पाजीने न ऐकल्याकारणाने त्यास सरदारापासून त्रास होऊं लागला, म्हणून वैद्यांनीं त्यास या पेचातून सोडवावे असे त्यात लिहिले आहे. नं. १७ हे पत्र सोमवंशीचा मुखत्यार बाबुराव रघुनाथ याने लिहिले असून त्यांत नं. १६ मधीलच मजकूर आहे. नं. ४५ हे पत्र अप्पाजी सोमवंशीने शाहूमहाराजांस लिहिले आहे. तो म्हणतो कीं, परगणे सुपेमधील खेडीं कर्जाचे पोटीं वैद्यास देऊन टाकलीं नाहीत. त्यांची आपल्याकडे आलेली तक्रार खोटी आहे. त्याचे देणे रु. ७०० पर्यंत होते, त्यापैकी रु. ४०० दिले व बाकीची तजवीज होत आहे.

(ऌ) पंतसचिव :— नं. ३७ मध्ये चिमणाजी नारायण सचीव, पंतप्रधान नानासाहेब यास लिहितात कीं, साहोत्र्याच्या येणाऱ्या ऐवजापैकी वैद्यबंधूंना रु. २५०० द्यावे. हे सचिवांनी वैद्यास देणे होते.

(ॡ) नारो अनंत गद्रे :—न ४ मध्ये काऱ्हाटी गांवाहून वैद्यबधूस गद्रे लिहितो कीं, ४ वेठे व १ कुंभार पाठविले आहेत, शिवराम तुकदेवानीं पाठविलेल्या गुरवाचा बाप आजारी असल्यामुळे त्यास लवकर परत पाठवावा, कुंभार व ४ वेठे यासही आठ-पंधरा दिवसापेक्षा जास्त ठेवून घेऊं नये, शेतामाताचा हंगाम आहे. वाड्यांतील हुजरे दामाजी शंकराकडे गावचा वसूल नेण्यासाठीं आले, त्यांनीं त्यास दिलेला कागद मानला नाहीं म्हणून ते ४ गावच्या पाटलांस घेऊन साताऱ्यास येतील, रामाजीपंतही येईल व नीट बोलला तर ठीक, नाही तर ते गांव परत करावे, काऱ्हाटीस साता तुळयांचे घर बांधणे तर ३०० रु. लागतील, पंतप्रधानांची पागा सुप्यास आहे, त्यावरील अमलदार इंद्रोजी कदम गवतासाठीं काऱ्हाटीचे लोकांस उपद्रव देतात, तो देऊं नये म्हणून कदमाकडे कागद पाठवावा, असेही त्यांने त्यांत लिहिले आहे. नं १४ वरून नारो अनंत वऱ्हाडांत गेला असावा. रहाट गांवाहून तो या पत्रांत लिहितो की, रघूजी माहुरास असून, तहात निजाम १०।२० हजार रुपये घेत आहे. हसपुरी गोसावी, शिवाजी दादाजी, रायाजी गिरिधर व कृष्णाजी गोविंद गोरे यांजकडील पैशाच्या वसुलाबद्दलही खुलासा यांत केला आहे. वऱ्हाडांत विश्वनाथभट कधीं येतील याबद्दलही त्याला माहिती पाहिजे होती. ते आल्या-खेरीज पैसा वसूल होत नाही. नं. ४१ मध्ये नागपुराहून तो वैद्यबंधूस रघूजीच्या अव्यवस्थित कारभाराची हकीकत लिहित आहे. रघूजीने चांदे येथे

मोर्चेबंदी केल्यामुळें तेथील लोक त्यावर चालून गेले आहेत. दोन महिने झाले किल्ला हस्तगत होत नाहीं. नागपूरचा सुभा नरहरपंत रिसबुडाकडून काढून शामजी रायाजीकडे दिला आहे. देवगड प्रांतावर स्वारीपट्टी शेकडा रु. ३६ बसविली आहे. कर्यांत मुगांवाकडून ८५८ रु. घेणार. कमाविसदारास गद्रे यांनी सांगितले की, रघूजीस चांद्यास भेटल्याखेरीज रुपये मिळणार नाहींत. मुगांवचा निम्मा वसूल पाटलांनीं वसूल करून नेला. या अव्यवस्थित कारभाराच्या गोष्टी आहेत. केसो हरी सावरकर व शंकराजी कान्हो या वेळी आजारी होते. चांद्यास काशी भास्कर कोलटकर आहेत. पण त्याचे कोणी ऐकत नाहीं.

( ए ) उदतसिंग शिर्के:—नं. ४३ व ४४ चीं पत्रे उदतसिंग शिर्के यानेच लिहिलीं आहेत. पहिले पत्र सौ. मातुश्री बायासाहेब ( राणी सकवारबाई असावी ) यांस लिहिले असून त्यांतील मजकूर असा कीं, ' रघूजी भोसले व रायाजी यांच्या गांठीभेटी झाल्यावर रायाजी भोसल्यांनीं रतनसिंग शिर्के यास ५० स्वारांनिशीं आपल्याजवळ ठेविले व रघूजीनें मला आपल्या पदरीं ठेवून परगणे पातुरच्या सेखबहाडीची नजर व घासदाणा व मोकासा त्यास दिला. या कामीं बऱ्हाणजी मोहिते व विश्वनाथभट वैद्य यांनीं फार खटपट केली. ' हे दोघे शिर्के बंधु असावे. पत्रांत तीर्थरूप बायासाहेब जरी लिहिले असले तरी खालीं अपत्येसमान स्वतःस संबोधलें आहे. तेव्हां ही आई नसावी. दुसरे पत्र याच मजकुराचे असून, ते तीर्थरूप राजश्री बाबासाहेब व राजश्री बापू यांस आहे. यांतही तो अपत्येसमान लिहितो. तेव्हां हें बापासही नसावे. बायासाहेब व बाबासाहेब कोण कळत नाही. कदाचित् शाहूमहाराजांनाही दुसरे पत्र लिहिले असेल.

( ऐ ) महादाजी कृष्ण काणे:—नं. ४७ मध्ये हा विश्वनाथभटांस पवनीहून लिहितो कीं, सुरंजीस बायाजीपंत आहे त्यास तुमची मदत पाहिजे, त्याचे चाकर लोक तेथे आहेत, तो जानोजीबरोबर बंगाल्यांत गेला आहे, त्याला कर्ज होंते ते फेडण्यासाठीं सुरंजी परगणा गोसावी व शिर्के याजकडे गहाण ठेवून तो गेला आहे, गोसाव्यापासून पैशाबद्दल फार त्रास होत आहे, गायही विकण्याचा प्रसंग आला आहे, जर त्याची कांहीं सोय न कराल तर भास्करभटाची शपथ आहे.

( ओ ) केसो हरी सावरकरः—नं. २ मध्ये हा वैद्यांचा कारकून वैद्यांना नागपूरहून विस्तृत हकीगत लिहीत आहे. यांत खालील माहिती आहे—( १ ) रघूजी बंगाल्यांतून नागपुरास तारीख २।६।१७४६ रोजीं आले. त्यांचेबरोबर कोन्हेरपंत कोल्हटकर व विसाजी गोविंद आहेत. ( २ ) नागपुराहून देशांत जाण्यापूर्वी विठ्ठल अण्णाजी याने पैशाच्या वसुलीचा हिशोब दिला नाहीं. मुगांवचा वसूल व असाम्याचा पैका त्याच्याकडे आला होता. ( ३ ) बंगाल्यांतून आलेला घोडा फार खराब होऊन आला आहे. ( ४ ) मुगांवास घोड्यासाठीं पागा बांधून झाली आहे.

## १७४७

( अ ) आज्ञापत्रे—नं. ८ मध्ये कसबे भोर, ता. रोहिडे खोरेच्या मोकदमास आज्ञा आहे की, या गांवचा मोकासा व्यंकटराव गंगाधर हणमते यास मिळावयाचा असतो. पण त्यांनी वैद्यबंधूकडून घेतलेल्या कर्जाच्या फेडीसाठी तो मोकासा कर्ज फिटेपर्यंत त्यांस दिला असल्यामुळे या गांवचा मोकासा वैद्याच्या मोकादमाखेरीज कोणास देऊ नये. हणमंत्याचा सचिवांच्या हद्दींत हा मोकासा कसा व केव्हां आला समजत नाहीं. हा हुकूम महाराजांचा असावा असे वाटते. नं. १३ मध्ये शाहू-महाराजानी विश्वनाथभटांस केलेली आज्ञा आहे. कान्होजीचा मुलगा रायाजी व रघूजीचा चुलता राघोजी ऊ. सवाई सताजी यांचे रघूजीबरोबर वांटणीसबंधीं भांडण होते, म्हणून या दोघांनीं वऱ्हाडांत रघूजीविरुद्ध बंडाळी सुरू केली होती, हें शाहू-महाराजास कळल्यावर त्यांचा तंटा मिटविण्यासाठी या दोघांना व रघूजीला साताऱ्यास आणण्यासाठी विश्वनाथभटांस महाराजांनीं लिहिले होते. हे पत्र महाराजानी लिहिले असल्याचे पत्राच्या शेवटच्या अक्षरावरून स्पष्ट होते. रा. यशवंत-राव गुते यानीं छत्रपतींची तंटे मिटविण्याची वृत्ति स्पष्ट करण्यासाठीं या पत्राचा फोटो ता. ४।३।१९४३ रोजीं घेतला आहे. न. १९ मध्ये पंतप्रधानांनीं, विश्वनाथ-भटाना रघूजीला आणण्यासाठी पाठविले असताना भोरचे कमाविसदार, ठाणेदार, वगैरे अमलदारानों अडथळा न करता सुरक्षित पोचवावे म्हणून हा परवाना दिला आहे. म्हणजे एक प्रकारची ही आज्ञाच आहे. न. २३ व २५ ची पत्रे सौ. राणी सकवारबाईने विश्वनाथभटाना नागपुरास पाठविलेली आज्ञापत्रेच आहेत. नं. २३ मध्ये सुलतानजी देखमुखाकडील व दुसऱ्यात आबाजी सखदेवाकडोल पैसे वसूल करण्यासंबंधीं विश्वनाथभटांस आज्ञा केली आहे. पैसे रघूजीच्या वशिल्याने कसे वसूल होतील, ते त्यात लिहिले आहे. राणीसाहेबास लिहिता येत असावे. पत्राच्या शेवटी ' सही ' हा शब्द तिचे हातचा एकाच वळणाचा आहे. नं. २४ हे कर्जखत विश्वनाथभटांना प्रांत देवगडचे पूर्वीचे गोंड राजे बुराणशहा यांनीं त्यांचा मुखत्यार धर्मा बगूजी नेगी याजकडून लिहून दिले आहे. रु. २,००० एक महिन्याच्या मुदतीनें नेले होते. देवगड प्रांत गोंडाचा होता. तो बुराणशहाचा भाऊ अकबरशहा याचे विरुद्ध मदत करून रघूजीने त्याजकडून घेतला व त्यास तेथून नागपुरास आणले. त्यास भोसले वर्षास ३ लाख रुपये देत. गादीवर बसतांना भोसले यांच्याकडून तिलक लावून घेत. शिवाय शाहूकडूनही वस्त्रे आणीत. पेशवे गादीवर बसतांना छत्रपतीकडून जशी वस्त्रे आणीत त्या तऱ्हेचाच हा गोंड राजाचा मान होता. देवगड प्रांत मिळाल्यावरच भोसले वऱ्हाडांतून नागपुरास आपली राजधानी करून रघूजीपासून राहूं लागले.

( आ ) पत्रें ( वैद्यांस लिहिलेलीं ):—नं. १० हें पत्र केसो बहिरवानें वैद्यबंधूंस व बापूभटांस लिहिले आहे. दोघेही लावगनकर. केसोबा वैद्यबंधूंचा चुलता होतो व बापूभट हा शिदंभटांच्या वंशांतला छत्रपतींच्या राजवैद्यांपैकी होता. याचे वंशज अजूनही कोरेगांव तालुक्यांतील तांदुळवाडीस आहेत. लावगनकर वैद्यांना तरवण येथें वतनी जमिनी होत्या त्या गुहागर प्रांत सिद्द्यांकडे गेल्यावर बंद पडल्या होत्या. तो प्रांत आतां तुळोजी आंग्र्याकडे आल्यामुळें व वैद्यबंधूंचे त्याच्याशीं सख्य असल्यामुळें त्या जमिनी परत मिळाव्या अशी या पत्रांत केसोबांनीं विनंति केली आहे. केसोबा वैद्यबंधूंपेक्षां वयाने मोठें असल्यामुळें त्यांस चिरंजीव म्हणतात. नं. २२ चें पत्र रघूजीचा सरदार तुळजोरामपंताने नागपुराहून विश्वनाथभटांस लिहिलें आहे. साताऱ्याहून वऱ्हाडांत जातांना रघूजीबरोबर जीं माणसे गेली त्यांपैकीं हा होता. या वेळीं रघूजीने साबाजीस नागपुरास ठेवून. तेथील कामें त्याच्या गळयांत घातलीं व त्याचे कारभारीपणाचे काम त्यास सांगितलें रघूजीजवळ देणेदाराचे तगादे फार होते. म्हणून त्यानें नागपूर सोडले. या पत्रांत पोतदारीच्या वसुलाची हकीगतही कळविली आहे.

पत्रें (वैद्यांनी लिहिलेलीं)—नं. ९ चें पत्र विश्वनाथभटांनीं सबंध स्वतः नारोपंत गद्रे व केसोपंत सावरकर यांस लिहून भुगांवीं पाठविले. या वेळीं शाहूंनीं विश्वनाथभटांस रघूजीकडे जाण्यास सांगितलें होते, पण त्यांना तिकडील कारकुनांनीं लिहिले कीं, रघूजीच तिकडे जाण्याच्या तयारींत आहेत. तेव्हां विश्वनाथभटांची व त्याची वाटेतच गांठ पडेल. त्यांना त्याच्या मुक्कामाची माहिती पाहिजे होती ती यांत विचारली आहे. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें तिकडे जाणे टाळावयाचें होते. अलीवर्दीखानाचा दिवाण जानकीराम, याचा मुलगा दुलभराम, यास रघूजीनें पकडून आणला होता त्यास सोडण्याबद्दल ३ लाख रु. रघूजीनें घेतले. त्यांपैकीं विश्वनाथभटांस जी रक्कम मिळावयाची त्यांपैकीं ३५,००० रु. चा हवाला रघुनाथभट पटवर्धनांनीं घेतला होता. या रकमेचा व पोतदारीचा वसूल करण्याचा उल्लेख यांत आहे.

( इ ) हिशोब– नं. ६ हें पत्र केवळ नानासाहेब पेशव्यांस वैद्य कर्ज देत हे दर्शविण्यासाठीं घेतलें आहे. रु. १५,००० दिले होते. त्याचा तपशील यांत दिला आहे. शेवटीं व्याज रु. ५५४||- बाकी राहिली आहे. मुद्दल तेवढे आले.

( ई ) पावती—रघूजीची सोन्याची १२ कडीं वैद्यांकडे होतीं तीं बहुधा गहाण असावीं. तीं परत मिळाल्याची त्याच्या महालजामदारखान्याच्या अमलदाराने चिठी–रूपानें दिलेली नं. ३२ मध्ये पावती आहे.

( उ ) अमात्य:—नं. १७ मध्ये भगवंतराव, थोरले सातारकर महाराज व कोलापूरकर महाराज आपणांस कसें वागवितात याचें वर्णन करतो. त्यांतील आशय असा कीं, "४।५ पिढ्या वाडवडील छत्रपतींची सेवा करीत आले. वतन जोडले, ते

आम्हांस मिळण्यासाठीं अर्ज केले, स्वतः भेटलों तरी दाद नाहीं, तुम्ही दरबारीं आमचे मध्यस्त आहांत, पण कांहीं उपयोग होत नाहीं. यंदां थोरले महाराजांच्या सांगण्यावरून कोलापूरचे राजे रामनवमीच्या उत्सवासाठीं बावड्यास आले. त्यांचा योग्य पाहुणचार केला. परत जातांना आम्हांस बरोबर कोलापुरास नेले. त्यांचेजवळ १॥ महिना राहिलो. धनी व राणीसाहेब यांस दोन घोडे व वस्त्रेभूषणें दिलीं. वाडिलार्जित सरंजाम व वतनी खेडीं देण्याबद्दल गोष्ट काढली होती. सेवा करण्यास तयारी दाखविली, तेव्हां गंगाधरपंत विशालगडकर प्रतिनिधीस बोलावून आणले व ठरविले की, आम्ही कागल व चिकोडी घ्यावी व घोरपड्यास घालवून द्यावे. त्यास उत्तर दिले की, वाडवडिलांप्रमाणे अखत्यारी द्या म्हणजे सर्व कांहीं घडवून आणूं. पण ही गोष्ट राणी सौ. जिजाबाईस रुचली नाहीं. अप्पा प्रतिनिधि (गंगाधरपंताचे भाऊ) आजारी असल्याचे कळले. म्हणून गंगाधरपंत ८।१५ दिवस राहून परत गेले. आम्हीही रिक्तहस्तें परत आलों. सर्व राज्य अर्जोजीच्या तंत्रानें चालले आहे. आम्हा ब्राह्मणांचा व धर्माचा सौ. बाईसाहेबांस कंटाळा आला आहे. साताऱ्च्या महाराजांनीं गंगाधरपंताशीं श्रीपतराव याचे सल्ल्यानें बोलाचाली केली. पण शेवटीं निराश होण्याची वेळ आली, तीच आमची स्थिति आहे. अप्पा प्रतिनिधि वारल्याचे कळले म्हणून त्याची क्रिया करण्यासाठीं वारणेपर्यंत येऊन ते परत गेले. कागलकर घाटग्यांनीं हल्ला करून अर्जोजीचे रुई गाव घेतले. कोल्हापूरच्या प्रजेस फार त्रास दिला. किरकोळ वतनदारांचा उच्छेद झाला आहे. सौ. बाईसाहेब आम्हांस राजहंस किल्ला मागत आहेत." कोलापूरच्या या चेष्टा महाराजांच्या कानीं वैद्यानीं घालाव्या, असे अमात्य म्हणत आहेत. नं. १८ मध्ये कोलापूरच्या दरबारचीच हकीकत लिहिली आहे. भगवंतरावानें आपला मुलगा सोनोपंत यास संभाजी पडवळ, थोरले महाराज, बाबूजी नाईक व रघूजी भोसले यांजकडे नालबंदीच्या रकमेसाठीं पाठविले होते, पण कांहीं मिळालें नाहीं. वैद्यांचाही उपयोग होत नाहीं, कोलापूरचे महाराजही कांहीं देत नाहींत. अशी त्याची दैन्यावस्था यांत वर्णन केलेली आहे. (यासंबंधीं पे. द. २६ मधील पत्रे वाचावी.)

(ऊ) पंतसचीवः—नं. १२ हा चिमणाजी नारायण सचिवांचा हुकूम सुपे परगण्याचे देशमुख व देशपांडे यांस आहे कीं, कान्हाटी गाव महाराजांनीं वैद्यांना इनाम दिला आहे त्याप्रमाणे चालवावा. कान्हाटीच्या मुकदमासही असाच हुकूम आहे. या पत्रावर शंकराजी नारायण यांचा शिक्का व मोर्तब आहे.

(ऋ) भोसलेः—नं. १५ मध्यें फत्तेसिंग भोसले व रघूजी भोसले यांमधील तहनामा आहे. हा शाहूमहाराजांनीं दोघांचा तंटा मिटविण्यासाठीं केला होता. या वेळींच कान्होजीचा मुलगा रायाजी व राणोजी ऊर्फ संताजी यांचा रघूजीबरोबर बराच वाद होता तो मिटविला. वऱ्हाड व नागपुराकडे कोणता भाग कोणास दिला हें ठरविण्यांत आले. नं. २१ चे पत्र रघूजीचा पागेवरील अमलदार शाबाजी

भोसले हा विश्वनाथभट वैद्यांना नागपुराहून लिहितो की, अलजपूर ( इलिचपूर )च्या मुसलमान सुभेदाराने नरखेडचें ठाणे घेऊन तेथील जमीनदार जगदेवराव दलेलभोर यास घालवून दिलें. त्याची मिळकत बापूजी भोरच्या ताब्यांत आहे तीबद्दल येत्या सुगीच्या हंगामांत दलेलभोर याचेकडून येणारे पैसे वसूल करून देतो. नं. २८ मध्ये रघूजी आपला मुलगा साबाजी ऊर्फ नाना यास लिहितो कीं, रामटेकची फडनविसी गतवर्षाप्रमाणे विश्वनाथभट वैद्य यांजकडेच आहे. त्यांचा कमाविसदार राघो बल्लाळ भोगले वसुलीस येईल, त्यास अडथळा करू नये, यास वेतन पूर्वीप्रमाणेच वसुलांतून द्यावे. नं. ३० मध्ये रघूजीनें विश्वनाथभटांस लिहिले कीं, महाराजांनीं घोडेस्वारांसाठीं जिवराव मोहिते यांचे घरीं जे पहारे बसविले आहेत ते परत बोलवावे, स्वार १-२ दिवसांत येतील. यजमानापुढे काठी घेऊन चालतात ते चोपदार व स्वार हे घोडयावर बसून जाणारे शिपाई असा फरक दोहोत असावा. मानसिंग मोहिते यास रघूजीची मुलगी बाकाबाई दिली. रघूजीबरोबर वऱ्हाडांत जीं कुटुंबे आलीं त्यांपैकीं मोहिते कुटुंब होते. जिवराव हा त्याचाच नातलग असावा. नं. ३१ हें पत्र रघूजीचा मुलगा साबाजी याने वैद्यांचा कर्यात भूगांवचा कमाविसदार नारोपंत गद्रे यास लिहिले आहे की, पाटलास रसद घेऊन पाठवावे. पे. द. २० मध्ये साबाजीच्या हस्ताक्षराचा व मुद्रेचा फोटो आहे. तसाच या पत्रावरील आहे. नं. ३३ मध्ये रघूजीने विश्वनाथभट वैद्यांकडून कर्ज रु. १३,०५९॥ घेतले त्याचें कर्जखत आहे. व्याज दरमाहे दुहोत्रा आहे !

( ऋ ) जाचक—याच्या पहिल्या ३ पत्रांच्या तारखा लावतां आल्या नाहींत. शेवटच्या तारखेवरून याचे साल दिले आहे. नं. १ हे पदमोजी जाचकाचे कोनेरपंत कोलटकरास पत्र आहे. तो म्हणतो की, रघूजी पूर्वीचा सरंजाम व नालवदीची रक्कम देत असेल व पुण्याच्या सावकारांच्या कर्जाची फेड करून पूर्वीचा मानमरातब ठेवीत असेल तर त्याजपाजी जाण्यास तयार आहे. तो याचे उत्तराची विश्वनाथभटाच्या व शिवराम तुकदेवाच्या पत्रांत येण्याची वाट पहात आहे. नं. ३ हें त्याचेच पत्र विश्वनाथभटांस असून त्यांत नं. १ मधीलच सरंजामाचा वगैरे मजकूर आहे. यात तो जास्त असे लिहितो कीं, रघूजीने मानाजीच्या मुलाच्या नांवे सरंजाम करावा. लक्ष्मणजी खंडागळा याने आमच्या कुटुंबाबद्दल रघूजीचें मत कलुषित केले व त्याचा परिणाम मानाजीच्या खुनांत झाला. माझे म्हणणे कबूल झाले तर तो पेशव्यांची नोकरी सोडून रघूजीस मिळण्यास तयार आहे. मानाजी हा पदमोजीचा धाकटा भाऊ होता. नं. ४ हे पत्र मानाजी जाचकाचे मरणापूर्वीचें विश्वनाथभटांस आहे. त्याच्याकडे विश्वनाथभटानीं रामाजीपंतास पाठविलें होतें. त्यांनीं जे पदमोजीबावाला सांगितले, त्यामुळे त्यांचे समाधान होत नाहीं, म्हणून तुम्ही रघूजीबावास घेऊन या, असे तो लिहितो. त्यानें पदमोजीच्या पूर्वी ' तीर्थरूप ' शब्द योजिल्यामुळें हा त्याचा मुलगा कीं भाऊ हें समजत नाहीं. नं. १६ मध्ये पदमोजी वैद्यबंधूंस लिहितो

कीं, तूतें रघुनाथजी भोसल्यास रु. २००० नालबंदीसाठीं द्यावे व रघूजीस सागावें कीं, पदमोजीस नालबंदीचे रुपये कापडाच्या रूपानें द्यावे. या वेळीं रघूजी साताऱ्यास गेला होता. महाराजांनीं परत जाण्यास परवानगी दिली होती. जाचक व शेलके कुटुंबांचा काय संबंध आहे हें कळत नाहीं. काळ्यांच्या नागपूर प्रांताच्या इतिहासांत जाचकांची वंशावळ दिली आहे. त्यांत पदमोजी किंवा मानाचीचें नांव नाहीं.

( ऌ ) बुवाजी ना। कदम :—नं. २९ मध्यें वैद्यबंधूंकडे गोवलकोट ऊर्फ गोपाळ-दुर्गचा तुळाजीचा किल्लेदार बबाजी आपला नोकर तानजी नलावडा पाठवून साताऱ्या दरबारची माहिती मागतो. वैद्यांकडून आलेलीं पत्रे तो तुळोजीस जेथें असेल तेथे पोचवितो.

( ॡ ) कोलटकर—न. २ मध्ये रामचंद्र उर्फ बाबूराव कोनेर कोलटकर विश्वनाथभटांस लिहितो कीं, तुम्हांस व वडिलांस अशीं दोन पत्रे पदमोजी जाचकाकडून आलीं आहेत. तुम्हीं दोघांनीं साताऱ्यास रघूजीस घेऊन लवकर यावे. नं. २६ चे पत्र साताऱ्याहून लिहिलेले दिसते. मुधोजीला छत्रपतिमहाराजांकडे नेला होता. हा सौ. राणी सगुणाबाईच्या चुलत बहिणीचा मुलगा होता. रघूजीची बायको इच्या मनांतील महाराजांनीं ह्यास दत्तक घ्यावे अशा खटपटीचा पुरावा हें पत्र आहे. त्यास पक्षासाठीं देऊरास जावयाचें होते, पण महाराजांची परवानगी मिळेना. ते म्हणाले, दोन दिवस थांबा. नंतर निकालच सांगतो. रघूजी या वेळीं देऊरास असावा. तो वैद्य, वाकडे व बर्वे यांजकडून कर्ज मागत होता. पत्र कोणी लिहिलें कळत नाहीं.

( ए ) नं. २० हें पत्र खंडोजी गोगवळ, हवालदार, महाल भांडारगृह, याचे रघूजी भोसले यास आहे कीं, बाळंभट वैद्यांना आचरे येथील अनुष्ठानाबद्दल रु. ३,६०० द्यावे. हे रु. रघूजी भोसले महाराजास बंगालच्या चौथाईपैकीं दरसाल रु. ३ लक्ष देत त्यांपैकीं त्याने देण्याबद्दल लिहिले आहे. हे अनुष्ठान सौ. सगुणाबाईचे दुखण्यास आराम पडावा म्हणून केले असावे. भोसल्याच्या वैद्यांशीं झालेल्या करारांत ही रक्कम आहे. २।७।१७४७ चे हिशेब पहा.

( ऐ ) बाबूजी नाईक बारामतीकर :—हें पत्र अपुरें व आरंभीचा मजकूर फाटून गेलेले आहे. बाबूजी नाईक कर्नाटकांत ज्या भानगडी करीत आहेत त्याचें यात वर्णन आहे. स्वामी फत्तेसिंग नरगुंदाकडेच आहेत. मुरारजी घोरपडे व बाबूजी नाईक याची लढालढी चालली आहे. सावनूरकर मोगल व मुरारजी ५,००० फौजेनिशीं १०।१२ कोसांवर आहेत. ८-१५ दिवस त्यांच्याशीं नाइकांचे तंटे चाललेच होते. नाईक खंडणी वसूल करीत चालले आहेत. कोलापूरकर स्वामींनीं नाइकाचा त्रास पाहून एक दिवस उपोषण केले. स्वामींना नाईक आपल्या ताब्यांत मागत आहेत. (पे. द. २६, पृ. ३०१ पहा.)

( ओ ) गोविंद सामराजा वडगांवकर—नं ५ हें पत्र या मावळ प्रांताच्या सुभेदाराचें आहे. अंदूरची मामलत मिळविण्याकरिता द्यावयाची रक्कम याने व

त्याचा भाऊ रामचंद्र यानें वैद्यबंधूकडून कर्जाऊ घेतली होती. त्यापैकीं रु. ५००० कुसाजी लेकावळयाबरोबर पाठविल्याचे यांत लिहिलें आहे. यांस वडगांवकर म्हटल्याचे वैद्यांच्या खतावणींत आहे. पे. द. २२,१४० मध्यें अंदूरचा परगणा भिल्लाचा होता तो त्यास दिल्याचें लिहिले आहे. पत्राची ता. २६-१-१७४० आहे. गोविंद व रामचंद्र सख्खे भाऊ असल्याचें या पत्रावरून स्पष्ट होत आहे.

( औ ) केसो हरी सावरकर:-- नं. ११ मध्यें हा सावरकर कारकून वैद्यबंधूंस कळवितो कीं, रघूजीबावा भोसले नागपुरास असून चैत्र व. ५ रोजीं सातान्यास जाण्यास निघणार आहेत व जानोजी भोसले बंगाल्यांत गेले आहेत. याच पत्रांत टेकाडीचा व भुगांवचा वसूल व पोतदारी अमल कसा वसूल करतां येईल, हें लिहिलें आहे. यासंबंधानें नारोपंत गद्रे यांनींही निराळे पत्र लिहिले आहे.

( अं ) शंकराजी कान्हो :—नं. १४ मध्ये हा नागपुराहून वैद्यबंधूंस लिहितो कीं, श्रीरघूजीबावा वैशाख शु. ५ स वऱ्हाडांत गेले आहेत, तेथून ते साताऱ्यास जाणार आहेत. पोतदारी व दुलभरामाच्या पैशाबद्दल श्रीमंतांकडे नारोपंतास घेऊन पुष्कळ खेटे घातले. शेवटीं येथून निघून व्याहाडीस मुक्काम केला होता. तेथें श्रीमंतांस भेटून पैशाची गोष्ट काढतां बगोजीपंत व तुळजोराम यांस बोलावून त्यांचे हातांत हात घालून सांगितले कीं, पोतदारी शेकडा १ रु. यास द्या. सनदेत शेकडा २ रु. आहेत असे दोघांनी सांगितले. तेव्हां सनद दाखवा म्हणाले, पण सनद केसोपंताजवळ भुगांवास होती. ती त्यास मिळत नव्हती म्हणून ते पुनः श्रीमंतापाशी गेले व तसे सांगित्यावर ते म्हणाले, आम्ही साताऱ्यास विसोबाची गांठ घेऊन सनद रु. २ ची असेल तर लिहून पाठवूं. तसेंच तुमची गांठ घेऊन तुलजोरामाच्या पैशाचा निकाल करणार आहेत. तूर्त पोतदारी रु. १ प्रमाणे घ्या असें म्हणाले. पुढें भुगांवास केसोपंतांनीं केलेल्या बैलगाडीच्या व्यवहाराची हकीगत दिली आहे. ते गाडींत बसून जात असता गाडी उलटली. ती मोडली व त्याचा हात मोडला. असे बाजाराला आलेले लोक सांगत होते. झुलाजीपंताचा एकुलता एक मुलगा देवी येऊन मेला ही बातमी यांतच आहे. पत्र फार लांबलचक, सविस्तर हकीगतीचें आहे, नागपूरची व चाद्याची सनद फिरली, तसेंच मोहनसिंगाकडील व नेगीकडील पैशाचाही घोळ पडला आहे, हे यात कळविले आहे. याशिवाय आणखी खाजगी मजकूर बराच आहे.

( अः ) काणे— नं. ७ च्या पत्रांत महादजी व हरी कृष्ण काणे यांनीं श्री. रघूजीकडून त्यास खर्चास न मिळाल्यामुळे जी दुःस्थिति झाली त्याचे वर्णन दिले असून आतां परत देशी येतो, असें लिहिले आहे. शे-पन्नास स्वार घेऊन ते बंगालच्या स्वारीबरोबर गेले. पण पोटास योग्य पैसा न मिळाल्यानें पुढे जाण्याचे त्यांनीं रहीत केलें. त्यांस कोलटकराचें कर्ज होते त्याची निरवानिरव करण्यासाठीं त्यांनी वैद्यांस लिहिले आहे.

## १७४८

(अ) आज्ञापत्रे : - वऱ्हाडातील नादगांव पेठ परगण्यातील बोरगांव व रहाटगांव या गांवच्या शिवा एकास एक लागून आहेत. तेथील शेतकऱ्यांचा हद्दीसंबंधीं वाद उत्पन्न झाला होता. हा वाद मिटविण्यासाठी रघूजी भोसल्यांनी दोहो-गांवच्या मोकदमांस व तक्रारी शेतकऱ्यांस जमवून पंचायतीने वाद मिटवा, असा हुकूम नं. ११ च्या कागदांत दिला आहे. यावरून भोसल्याची तडजोडीची वृत्ति दिसून येते. नं. २४ मध्ये सौ. राणी सगुणाबाईने रघूजीस निजामाशीं काय बोलणे झाले व जानोजीची बंगालमधून कांही बातमी आली आहे कीं काय, हे लिहिण्या-बद्दल पाठविलेले आज्ञापत्र आहे. तिने बऱ्हाणजी मोहिते यास खटावचे पारसी परवान्यासह घेऊन यावे, नं ३६ मध्ये पंतसचिवांनीं वैद्यबंधूंचे जांभळी गांवाहून साताऱ्यास बैलावरून तांदूळ यावयाचे होते त्यास वाटेने अडथळा होऊं नये म्हणून दिलेला परवाना (दस्तक) आहे. वैद्य या वेळीं साताऱ्यास राहत असावे. १७५३ सालच्या एका दस्तकांत त्यांनीं वांईस जाण्याचे दस्तक घेतले होते. त्यांस छत्रपतीं-कडून वांईस राहण्यासाठी १७५० मध्ये जागा दिल्याचे त्यांचे पत्र आहे.

(आ) पत्रे (वैद्यांस आलेली):—नं. १६ चे पत्र त्यांस सदाशिव दीक्षित ठकारांनी लिहिले आहे. त्यांनीं सोमयाग केला त्यास येण्याबद्दल त्यांत वैद्याना विनंति केली आहे. ठकारांचे विद्वान् घराणे असून त्यांचा वाडा साताऱ्यास सोमवारांत आहे. नं. ३२ हे पत्र करकरे याने वैद्यांस साताऱ्याहून लिहिले आहे. राणी सौ. सगुणाबाई आजारी असतांना शाहूमहाराज तिला तुळजापुरास घेऊन जात आहेत. त्यांचबरोबर कोण कोण जातात, कोठे मुक्काम करणार, याची हकीगत देऊन करकरे याने कोकणांतून अनुष्ठान संपवून लवकर यावें व महाराजांबरोबर जावें, असें सुचविले आहे. रघूजी भोसल्याच्या कागदातील त्यांचे मुक्काम यांत कळविले आहेत. नं. ३५ हे पत्र जिवराव शिंदे हिमतबहाद्दर यांचे असून त्यांत लखमोजी खोजे यास ३,००० रु. देण्याबद्दल वैद्यांना लिहिले आहे. नं. ४६ चे पत्र धोमचे लक्ष्मणबावा ब्रह्मचारी यांचे आहे. धोमास धूमनृसिंहाचार्य बेळगांवकर दीड वर्ष सेवेसाठीं राहिले होते त्यांस कर्ज झालेले फेडावे अशी वैद्यांना त्यांत विनंति केली आहे.

पत्रे (वैद्यांनीं लिहिलेली):—नं. २९ व ३० हीं पत्रे बाळंभटांनीं विश्वनाथ-भटांस शाहूमहाराजाच्या मुक्कामाबद्दल लिहिली आहेत. ते सौ. सगुणाबाईस तुळजा-पुरास घेऊन जात होते. नं. ३० मध्ये त्र्यंबकभट वैद्यांची महाराजांनीं आठवण काढली होती त्यांस पाठवावें असें लिहिले आहे. हेही लावगनकर नामांकित वैद्य होते. नं. ३१ चे पत्र चि. भास्करभटांस बाळंभटांनीं लिहिले आहे. हे भास्करभट राजवैद्य तांदुळवाडीकर वैद्यांपैकी लावगनकरच होत.

पत्रें ( इतरांचीं ):—नं. २५ ही पत्रवजा यादी पंतसचिवांस खाजगीकडून गेली असून त्यांत रु. १५६।- राणी सौ. सगुणाबाईचे दुखण्यास उतार पडण्यासाठी जे अनुष्ठान बाळंभटांनीं केले त्याबद्दल द्यावे असे लिहिले आहे. राणी २५।८।४८ रोजीं निधन पावली.

( इ ) यादी :—नं. २६ मध्यें ही यादी परटास धुण्यासाठी जे कपडे दिले त्याची आहे. यावरून वैद्य व कारकून कोण कोणते कपडे वापरीत याची कल्पना होते. यांतील रामचंद्रपंत हा वैद्यांचा करकरे कारकून जोगळेकर उपाध्या असावा. लक्ष्मण कोण कळत नाहीं. यांतील कपड्यांचीं नावें ही अर्थ लावण्याजोगीं आहेत. नं. ३३ ही यादी यमाजीपंतांस जो ऐवज नेमणूक म्हणून पोचावयाचा त्याची आहे. या यमाजी शिवदेव मुतालिकास एवढी रक्कम भोंसल्यांनीं द्यावयाची होती असे वाटतें. यास शाहूमहाराजांनीं रघूजीचा दिवाण नेमला होता ( पे. द. २० ११ पहा ). त्याची तारीख बरोबर लावलेली नाही. याच सालातील नं. २१ चे जून १३ चे पत्र रघूजीने विश्वनाथभटांस लिहिलें आहे. त्यात यमाजीपंत व रघुनाथभटांच्या पैशाचा उल्लेख आहे. एकंदर रक्कम १ लक्ष ४० हजार आहे. याशिवाय सुकानंदबावास रु. १० हजार आहेत. या यादींतील सर्व माणसे प्रसिद्ध सावकार, सरदार व सल्ला-गार आहेत. रघुनाथभट हा शिंपरे पटवर्धन कान्होजी व रघूजी यांस पैशासाठी जामीन राहणारा होता. बन्हाणजी मोहिते हा राणी सगुणाबाईचा भाऊ होता. वाकडे बांईचा मोठा सावकार भोसल्यास चंदाखानासाठीं पैसे देणारा होता. सिद-भटाचे आडनांव पुरोहित होते ( पे. द २०, ३० पहा ). विष्णुपंत याचे सबंध नाव विष्णु विश्वनाथ पंडित. हा राणी सगुणाबाईचा खाजगी कारभारी होता ( रियासत बाळाजीराव, पृ. २०७ पहा ). याचें आडनांव गद्रे असावे ( पे. द. १८, ८८ पहा ).

( ई ) हिशोब :—नं. १ ची यादी मागाहून सापडली. ती देण्याचे कारण बीड आंबडचा कारकून यास वार्षिक मुशाहिरा फक्त २०० रु. होता व अधिक श्रावण महिन्यावरून वैद्य द. पु. खं. १ मधील अधिक महिन्याच्या कोष्टकावरून पत्राची तारीख मुक्रर करतां आली. नं. ९ ची हिशोबाची यादी रामभट यांची मुंज व भिकंभटाचे लग्न याची आहे. यांत पवित्रकासाठीं सोनें व फणीकरंडा व राखडी यांसाठीं खर्च दिला आहे. पवित्रक मुंजीसाठीं व दुसरे जिन्नस लग्नमुलीसाठी घेतले; हें उघड आहे. नं. १४ मध्ये नारो अनंत गद्रे या मुगांव इनामाची कमाविशी करण्याऱ्या कारकुनास दरमहा नेमणूक किती होती याचा तपशील आहे. हा विश्वासूक नोकरांपैकीं होता. दरमहा पगार फक्त रु. २५ होता. नं. ४१ मधील हिशोब विश्वनाथभटांनीं गायत्री पुरश्चरण केले त्या वेळीं धान्य खर्च किती झाले त्याबद्दल आहे. यांतील कुडव हे माप महाराष्ट्रांत अलीकडे नाहीं. कोकणी भागांत ते चालू होतें.

(उ) बाळाजी बाजीराव ऊ. नानासाहेब पेशवे :— नं. २ चें पत्र नानासाो पेशव्यांनीं वैद्यबंधूंस संक्रमणाचा हलवा पाठविल्याबद्दल आहे. यावरून पेशवे व वैद्य यांचा निकटसंबंध दिसून येतो. पत्राच्या शेवटचे शब्द पेशव्यांच्या हातचे आहेत.

(ऊ) प्रतिनिधिः— नं. ३४ चे पत्रावर श्रीकारापुढें 'आई आदिपुरुष' शब्द आहे. यावरून प्रतिनिधीचें पत्र ओळखतां येते. हें वैद्यांना जगजीवन परशराम यांनीं लिहिले आहे. बहुधा यांचा वऱ्हाड–नागपुराकडील गांवच्या मामल्याचा संबंध वैद्यांकडे असावा. त्याजकडून वैद्यांचें कर्ज व मामल्याचा पैका येणें होता. त्यासाठीं वैद्यांचा तिकडील कारकून शंकराजी कान्हो त्याजकडे तगाद्यास गेला होता. त्याच्या फेडीबद्दल त्यांनीं हे पत्र लिहिले आहे. तूर्त सोय नाहीं. हें उत्तर आहे. एक म्हण 'या लोकीं न दिले तरी पुढले जनी देणे लागेल सुटतें ऐसे नाहीं' यांत आहे यावरून प्रतिनिधींच्या कर्जफेडीच्या कल्पना कळून येतील. जगजीवनराव १७४५ मध्यें वारले. नं. ४५ मध्यें जगजीवनराव यांनीं रंभाजी घोरपडा यास खोडद गांवीं सुभेदारी दिलेली काढून घेतल्याचा मजकूर आहे. प्रतिनिधींना कर्ज दिल्याच्या हिशोबाचे बरेच कागद दप्तरांत आहेत.

(ऋ) पंतसचिव :— नं. ३९ च्या पत्रांत सचिव विश्वनाथभटांस लिहितात कीं, कर्जाच्या फेडीसाठीं तुम्हांस सावोऱ्याचा या सालचा ऐवज देण्यासाठीं नानासाहेब पेशव्यांस लिहिले आहे. नं. ४० मध्ये नानासाहेबास पत्र सचिवाचे आहे कीं, पुढील सालचा सावोऱ्याचा ऐवज १५०० रु. व मोगलाईचा नाणेमावळचा ऐवज ५०० रु. व सिंहगडच्याऐवजीं रु. ५००, एकूण २५०० रु. बाळंभट वैद्यांस कर्जफेडीसाठीं द्यावे. तसेच पुढील सालचा प्रात कडेवळितचा ऐवज रसदेबद्दल येणारा रु. ३००० तुम्हांस देविला आहे असे नं. ४२ मध्ये लिहिले आहे.

(ॠ) भोसले :—नं. ३ मध्यें रघूजी भोसले यांनीं विश्वनाथभट वैद्यांचा दिमत कृष्णाजी रामचंद्र याची हुशारी पाहून मुधोजीचा सिकेनवीस म्हणून नेमणूक केल्याचा हुकूम आहे. याबद्दल त्यांस वेतन सालिना रु. १००० ठरविले होते. याचे काम पत्रावर राजमुद्रा मारण्याचें असे. नं. ४ मध्ये रघूजी विश्वनाथभटांना लिहितो कीं, तुमच्या शिफारशीवरून शामजी फुलाजी यांस मकडाई प्रांताची वसुली करण्यासाठीं नेमिले. त्यांनीं महालाचा अमल ठरविला. पण हा प्रांत राणोजी ऊ. संताजीचा असल्यामुळे याची रसद त्यास देण्याचें कारण नाहीं; ती शिवभट साठे यांनीं आपल्याकडे भरली आहे, असें शामजीस लिहून पाठवावे म्हणजे त्याचा खोळंबा होणार नाहीं. त्यास मामलतीच्या सनदाही द्याव्या (वै. द. १७४२, नं. ३० चे पत्र पहा). नं. १० मध्ये रघूजी भोसल्यांनीं वैद्यांकडून घेतलेल्या पैशाचा रु. ८५०० चा कर्जरोखा आहे. व्याज द. म. दुहोत्रा आहे. सन १७४१ ते १७४८ च्या हिशोबांत याचा उल्लेख आहे. नं. १५ मध्ये रघूजीनें बाळंभट वैद्यांस लिहिलें आहे कीं, महाराजांच्या परवानगीने त्यांचा परराज्यमंत्री महिपतराव आमच्याकडे जरूर पाठवावा. त्याला निजामा-

कडे फद्दापूर येथें कांहीं राजकीय कामासाठीं पाठवावयाचा आहे. काम होतांच त्यास साताऱ्यास पाठवून देऊं. निजामचा मृत्यु २१।५।४८ रोजीं झाला ( पे. द. २०. ४७,७१ व २५.७४ पहा ). महिपतराव हा महाराजांकडील चिटणीस आडनांवाचा सुमंत असावा. नं. १७ मध्ये राणोजी भोसले याने महंत मुलूखगीर यांस विश्वनाथ-भटांकडून रु. ५० देवविले आहेत, असा मजकूर आहे. या पत्रांत दोन नवीन गोसाव्यांचीं नांवें आहेत म्हणून निवडलें आहे. गोसावी लोक श्रीमंत असून पूर्वी राजे लोकांस कर्जाऊ पैसे देत असत. नं. २१ मध्ये रघूजीने विश्वनाथभटांस लिहिलें कीं, महाराजांनीं पैशाच्या तगाद्यासाठी हुजरे पाठविले आहेत. तुम्हांस येथून जातांना यमाजीपंताच्या ऐवजाबद्दल व परगणे अकोल्याच्या पैशाबद्दल तजवीज करण्यास सांगितले होते त्याप्रमाणें कांहीं केलेले दिसत नाहीं. माझी ओढ, बंगालच्या स्वारीचे खर्चामुळे व रघुनाथभट झिपरे याजकडील कर्जामुळे झाली आहे, ही गोष्ट आपण महाराजांस समजून सांगावी, व वरचेवर राजपत्रे न येतील अशी तजवीज केल्या-बद्दल सत्वर पत्र पाठवावें. रघूजीने शेवटचा मजकूर स्वहस्ते लिहिला आहे. यमाजी-पंताच्या ऐवजाचा संबंध नं. ३३ च्या यादीशीं असावा असें वाटतें. नं. ३७ मध्यें रघूजीनें विसाजी विष्णु यास लिहिले आहे कीं, विश्वनाथभटास हत्तीवरील गाशा-साठीं बनात व झालरीस कापड घेऊन त्यास गाशा तयार करून द्यावा व तो हत्तीवर बांधण्यासाठी ४० ताणे द्यावे.

( ल ) प्रसिद्ध व्यक्तींचीं पत्रे :— ( १ ) काणे :—नं. ८ मध्यें महादाजी व हरी कृष्ण काणे यांनीं रामचंद्रपंत करकरे यास लिहिले आहे कीं, रघूजीकडे बंगालची कामगिरी असल्यामुळे त्याचेबरोबर आम्ही गेलो, पण आम्हास गेल्या सालीं पैशाचा पुरवठा त्याजकडून बरोबर न झाल्यामुळे आम्हीं परत फिरण्याचे ठरविले आहे. या वेळीं विश्वनाथभट तिकडे येऊन भेटतील व रघूजीबाबाकडून पैसे देववितील असें वाटत होतें. ते येत होते तेव्हां रघूजी बंगाल्याकडे चालते झाले होते. यामुळे परत फिरल्यावांचून गत्यंतरच नव्हते. ज्याने ठिकाणास आरंभी नालबंदी दिली तो राम चंद्र कोनेर कोलटकर होता. नालबंदी म्हणजे घोडेस्वारांना मोहिमेवर जातांना आगाऊ दिलेली रक्कम.

( २ ) शिवभट साठे :—नं. ३८ मध्यें विश्वनाथभटांना लिहितो कीं, राणोजी भोसल्याच्या मकडाईची कमाविस आम्ही रघूजीकडून घेतली. रु. ५,००० दोन हप्त्यांनीं द्यावयाचे ठरले. राणोजीची सनद आम्हांकडे तुमचेकडून न आली तर आमचे रसदेचे पैसे परत द्यावे लागतील. शिवाय राणोजीच्या कमाविसदारांनीं कांहीं वसूल नेला तर तो मजुरा द्यावा लागेल. नं. ४४ मध्यें साठे लिहितो कीं, रामाजी-गीर गोसाव्याकडून रु. १० हजार देवविले ते माघी पौर्णिमेस हुंडी करून पाठवूं. दोन्ही पत्रे शिवभटाच्या हातचीं आहेत.

( ३ ) खंडोजी गोगवले :—हा महाल भांडारगृहावरील हवालदार नं. २७ मध्यें रघूजीस लिहितो कीं, तुमच्याकडून खाजगीचे येण्यापैकीं, बाळंभट वैद्य यांनीं आचरें येथें अनुष्ठान केले त्याबद्दल रु २४४१ त्यांस द्यावे. रक्कम येण्यांत वजा केली जाईल. हें अनुष्ठान सौ. सगुणाबाईच्या दुःखण्यात केले होते. महाराजांची धार्मिक कृत्यें बाळंभटांमार्फत होत असत.

( ४ ) बुवाजी नाा कदम :—गोपाळदुर्ग म्हणजे अंजनवेलवरील तुळोजीचा हा गडकरी होता. यानें नं. ६ मध्ये वैद्यबंधूंना लिहिलें आहे कीं, सातारच्या दरबारचीं राजकीय खलबते यजमानास कळविण्याजोगीं असतील तीं कळवा, व मानाजी वरातमाव साताऱ्यास आले किंवा नाहीं व पेशवे कोठे आहेत, हें कळवा. दरसाल वैद्य कोकणातून तांदूळ आणीत ते रवाना केल्याचे यांत लिहिले आहे. नं. ७ च्या पत्रांत तो वैद्यांना शिरक्याचा कोकणांत फौज घेऊन येण्याचा काय उद्देश आहे, हे विचारतो व ही बातमी कळवण्यासाठीं गणेश महादेव यास पाठविल्याचे कळवितो. ह्याच कदम किल्लेदार यानें तानजी नलवडे यास वैद्यांकडे पत्र देऊन शिर्के वगैरेंच्या हालचालींची बातमी मागविली होती. त्याचे उत्तर वैद्य लिहितात कीं, शिरके यांनीं आपला फौजफांटा घेऊन निजामपाडळीवर मुक्काम केला आहे, भगवंतराव पोतनीस व धाटगे एक हजार फौज तयार करून महाड प्रांतीं जाणार आहेत. हे पत्र आल्यावर नं. १२ च्या पत्रांत तो लिहितो कीं, शिरके येऊन उपसर्ग दिल्यास यजमान त्याचा समाचार घेण्यास तयार आहेत. भगवंतराव पोतनीस महाड प्रांतीं गेले किंवा नाहीं व मानाजी आंग्रे येथे येऊन काय वाटाघाट झाली व किती दिवस तेथें राहणार हें वृत्त कळवावे. हाच बुवाजी नं. १८ मध्ये वैद्याना लिहितो कीं, महाराजांस देण्यासाठीं १०० शहाळी आंग्रे यानीं कळविल्याप्रमाणे पाठविलीं आहेत, तीं त्यांस द्यावीं व तिकडील दरबारची बातमी कळवावी. नं. १९ मध्ये बुवाजी वैद्यांना दरबारची, प्रतिनिधीची व यमाजीपंताची बातमी विचारीत आहे. त्याला तुळाजीला या हकिकती कळवाव्या लागत. नं. ४३ मध्ये यानें तानजी नलवडा यास वैद्यांकडे पाठवून वरील पत्राप्रमाणे दरबारची माहिती मागितल्याची हकीगत आहे.

( ५ ) महादाजी अनंत गोडबोले :—हा गोविंदगड म्हणजे गोवळकोटवरील तुळाजीचा अमलदार होता. यानें नं. १३ मध्ये वैद्यांना लिहिले आहे कीं, शिरके यांचें लष्कर तारळ्यास आल्याचें कळल्यावरून येसजी गाडे यास पाठविला आहे. त्याजबरोबर त्यांच्या हालचालीची हकीकत सविस्तर कळवावी. नं. २३ मध्ये वरील पत्राचें उत्तर आल्यावर पुनः त्यास लिहिले कीं, शिरके बहिरवगडीं येऊन कोकणांत येणार व भगवतराव पोतनीस फौज घेऊन महाडकडे जाणार, तसेंच मानाजी तेथे येऊन सन्मान बरा जाहला हे लिहिले तें कळले. यजमान सरखेल यास महाडास लेहून बंदोबस्ताने राहण्याबद्दल सुचविले हें बरे केले. असेच वरचेवर लिहीत जावें व सावध करावें.

( ६ ) राघोबल्लाळ भोगले :—हा वैद्याचा प्रात देवगडमधील रामटेक येथील कमाविसदार नं. ५ च्या पत्रांत वैद्यांना लिहितो कीं, श्रीरघूजींनीं चांदा सर केले, तेथील गोंड राजे नीलकंठशाहा यांस बल्लाळपुरी ठेविले व चांद्याचा सुभा बिचाजी वंजाळचे देवगडचे कारकून कृष्णाजी नारायण यांच्या ताब्यात दिला. जानोजी भोसले यांस बंगाल्यांत पाठविलें. श्रीमंतांकडे चांद्यास पुष्कळ मंडळी आली होती. मुधोजी भोसले, रघुनाथभट पटवर्धन, मुराराव येलभ्या निर्मळकर, बुऱ्हाणशा राजे, रामाजी नाईक, जानीभाई, यादोजीपंत देशमुख, वगैरे मंडळी भेटल्यावर त्यांच्या कामाचे निकाल लावून त्यांची पाठवणी केली. आमच्या कामाबद्दल यादोजीपंत देशमुखकडून विचारले त्याला उत्तर मिळाले की, 'वैद्य भेटल्यावर काय ते ठरवूं.' याशिवाय यांत वसुलाची हकीगत लिहून त्यास नागपुरास बोलावलं आहे. 'अवघ्या कोकणस्थां श्रीमंत भाषण करतात' याचा अर्थ त्यांचा ते तिटकारा करतात. वैद्यांवर मात्र ते विश्वास दाखवितात ( पे. द. २०-३८-४१-७२ पहा ).

( ७ ) नारो अनंत गद्रे :—हा कर्यात भुगांवचा वैद्यांचा कारकून होता. त्यानें न. २० मध्ये रघूजीने चालविलेल्या अनिष्ट कृत्याची वैद्यांना हकीगत कळविली आहे. त्यांतील मुख्य कृत्यें :—रघूजी नागपुरास आल्यावर कन्येचे व स्वतःचें लग्न करणार आहेत; भुगांव, मवाड व राहाटगांव हीं गांवें आपल्याकडून काढून खानगीकडे घेतलीं, कर्यात भुगांवचा ऐवज देवडीकडे घेतला. आम्हीं ४ हजार वसूल केले त्यांतून पट्टी व पेशकशी घेतली, नारोजी नेगी, वेंकाजी नाा गडकरी, वगैरेकडील पैसे येत नाहीत. भुगांव व राहाटगांवचा जो पैका आला तो हुंडी करून पाठविला. आपण पंतप्रधान व महाराजांकडील कांहीं काम काढून आलां तर श्रीमंत आपणांशीं नीट बोलतील व कामाचे निकाल लागतील. श्रीमंतांकडे अशा स्वभावामुळे कोणी भेटण्यासही जात नाहींत. नं. २२ मध्ये नारोपंत तिकडील गांवच्या वसुलास येणाऱ्या हरकती व त्या दूर करण्यास उपाय वैद्यांना लिहीत आहे. जानोजी बंगाल्यांतून परत आल्याची बाजारगप्प यात दिली आहे. दोन्ही पत्रें फार लांबलचक व तिकडील रघूजीच्या भानगडीबद्दल आहेत.

( ८ ) शंकराजी कान्हो :—हा वैद्यांचा नागपुराकडील कारकून नं. २८ च्या पत्रांत त्याना लिहितो कीं, चांद्याकडील वसूल जानोजी बंगाल्यांतून परत येणार हें ऐकून अधिकारी पैसे देत नाहींत. तो आल्यावर त्यास पैसे द्यावे लागतील असे त्यांचें म्हणणें आहे. साबाजीचा सुभा गंगाजीपंताकडून काढून बहिरोपंतास दिला होता. पण जानोजीची बातमी आल्यावर तो पुनः गंगाजीकडे दिला. आम्ही आपले पैसे मागूं लागलो तेव्हां हुंडी देतो म्हणूं लागले. आम्हीं म्हटलें, रोख पैसे पाहिजेत. गंगाजीपंत नागपुरास चला तेथें देतो म्हणाला. या त्याच्या थापा होत्या. त्यास शेवटीं घरांत कोंडून ठेवलें. पैसे न द्याल तर दारांत प्राण सोडीन असें म्हटलें. पत्र अपूर्ण आहे. या पत्रावरून त्या काळीं तगाद्याची कडक पद्धति कशी होती याची कल्पना होणार आहे.

## १७४९

(अ) आज्ञापत्रें:—नं. ३५ मध्ये यशवंतराव महादेव खासनिवीस ऊर्फ पोतनीस यांचें बावधनच्या मोकदमास आज्ञापत्र आहे कीं, बाळंभट वैद्यांकडून स्वारी पट्टी रु. १० पेक्षां जास्त घेऊं नये हा यजमानांचा हुकूम मोडल्यास पैसे परत द्यावे लागतील. हा गांव छत्रपतींना अजून इनाम चालत आहे. नं. ४० मध्ये रघूजी भोसले यांनीं रामटेक प्रांत देवगडच्या देशमुख व देशपांडे यांस केलेली आज्ञा आहे ती अशी की, डुमरी चिखल्या गांवचा दरोबस्त मोकासा वे. मू. सदाशिवभट चिपळुणकर व परशुरामभट भावे, विश्वनाथभट वैद्य यांचे मुखत्यार, यांस दिला असल्यामुळें त्यांच्या वसुलास अडथळा करूं नये. मोकाशांत माल व सायेर जकाती, कुलबाब कुलकानू यांचा समावेश केलेला आहे. नं. ४२ मध्ये शाहू महाराजांनी रघूजीस केलेली आज्ञा आहे कीं, दिवाणच्या ऐवजाच्या वसुलीसाठीं तुमचेकडे विश्वनाथभट यांस पाठवून बरेच दिवस झाले, खर्चाची निकड फार आहे, तरी ऐवज त्यास देऊन लवकर पाठवावें. दहा हजार रु. पावल्याचे यांत नमूद केले आहे. शेवटचे वाक्य महाराजांच्या हातचें आहे. नं. ४३ व ४४ यांत विश्वनाथभटांना आज्ञावजा एकाच दिवशीं महाराजांनीं रघूजीकडील पैसे वसूल करून लवकर पाठवावे अशीं पत्रे लिहिलीं आहेत. दुसऱ्या पत्रांत महाराज जरी आजारी होते तरी त्यांच्यामागे असलेल्या देण्याची विल्हेवाट लावण्यासाठीं जामदारखान्याकडील जमादार व देवराव लपाटे, राणी सगुणाबाईचे कारभारी, यांजपाशी पैसे देऊन त्यांस पाठवावें असा जास्त मजकूर आहे. देवराव लपाटे हा राजाज्ञाचा मुतालीक महाराजांचा विश्वासूक नोकर असून याचा जामदारखान्याशीं संबंध होता. दोन्ही पत्राच्या शेवटचे वाक्य महाराजाच्या हातचें आहे. नं. ५१ मध्ये बावधन, ता. वाई, जिल्हा सातारा, येथील ३० बिघे जमीन वैद्यबंधूस स्वामींनीं इनाम दिल्याबद्दल यशवंतराव महादेव पोतनीस ऊर्फ खासनिवीस यानीं गांवच्या मोकदमास आज्ञा देऊन ती बिनहरकत चालवावी असे लिहिलें आहे. हें इनाम अजून वैद्य घराण्यांत चालत आहे. खासनिवीस हा खाजगी कारभारी असे. या पत्रांतील 'श्री' कारापुढे 'रामो जयति' हा शब्द आहे. खंडोजी गोगवले याच्या पत्रावरही असाच 'श्री' कार असतो. दोघांचा जामदारखान्याशीं संबंध होता, यामुळें तेथील पत्रावर एकच श्रीकार घालीत असावेत.

(आ) ताकिदी:—नं. १४ ही ताकीद शिवाजी सालोखे ऊर्फ डूबल यानें मौजे खोडद तर्फ तारगांव, प्रांत कऱ्हाड येथील मोकदमास दिली असून त्यांत साताऱ्यास राणीसाहेबांकडे गाई व म्हशींसाठीं कडबा १,००० पाठवावा असा मजकूर आहे. सालोखे हे धुळगांवचे राहणारे सकवारबाईचे आप्त होते. १७३९ सालीं मिरजेचे ठाणें मोंगलाकडून घेऊन यांच्या ताब्यांत महाराजांनीं दिलें होते. या पत्रावर शिवाजी सालोख्याचा शिक्का व मोर्तब आहे. म्हणून छापले आहे. नं. १५ मध्ये याशिवाय

सरकार द०।।नीं महालकडून ( बाईसाहेबांकडून ) ही मोकदमास याबद्दल आज्ञापत्र गेलेलें दिलें आहे. त्यावर बाईसाहेबांनीं शेवटी 'लेखनसीमासही' असें स्वतः लिहिलें आहे.

( इ ) पत्रे ( वैद्यांस आलेलीं ):—नं ३ मध्यें कान्हाटी इनाम गांवचा पाटील म्हसाजी चांदगुडे वैद्यबंधूंना कळवितो कीं, जयापा शिंदे यांनीं कान्हाटीस फौजेचा तळ दिला असल्यामुळे त्यांचा लोकांना फार त्रास होत आहे; नानासाहेब पेशवे यांनीं मुंज पट्टीबद्दल गांवावर रु. ७५ बसविले आहेत. ही मुंज विश्वासरावाची बहुधा असावी, पण तो ९।३।१७४९ रोजीं झाली. कान्हाटी गांवास अजूनही चांदगुडे व वाबळे अशा पाटिलांच्या दोन तक्षिमा आहेत. नं. १६ हें पत्र तिमाजी नरसिंह दिवाण यांनीं वऱ्हाडांतून विश्वनाथभटांस साताऱ्यास लिहिले आहे. रघूजीला महाराजांनीं लवकर येण्याबद्दल लिहिले. तो येतो म्हणतो व जाण्याचे लांबणीवर टाकीत आहे. तिमाजीपंत दिवाण हा भोसल्यांचा एक सरदार होता. नं. १८ व १९ चीं पत्रें तुकोराम डिगणकर व गोपाळ रघुनाथ यांनीं अनुक्रमे रामचंद्रपंत करकरे व वैद्यबंधु यांस लिहिलीं आहेत. दोन्ही पत्रांत रघूजी साताऱ्यास जाण्याची कांहीं तरी सबब काढून टाळाटाळ करीत आहे असे आहे. शाहू थकत चालल्यामुळें त्यास मराठी राज्याची पुढें काय व्यवस्था करावी हा ध्यास लागला होता. त्यासाठीच त्यानें रघूजीस बोलावले होते. त्याच्याकडे पैसे येणें होते. त्याचाही तो लवकर निकाल करीत नसल्यामुळे कंटाळून साताऱ्यास आणण्याचे तयारींत आहेत. नं. २६ च्या पत्रांत आबाजी राजे महाडिक विश्वनाथभटांस रघूजीबावांनी रु. ४ हजार देवविले ते पोंचल्याची पावती देतात. पत्राच्या शेवटीं 'सही' हा शब्द स्वतः लिहिलेला आहे. नं. ५० मध्ये केसो बहिर वैद्य यांनीं वैद्यबंधूंस कळविले आहे कीं, बाबूराव मल्हार बर्वे हे १८।११।१७४९ रोजीं वारले. हे लिहिण्याचे कारण गोविंद सामराज, दाजी बाबाजी व केसो बहिर व वैद्यबंधु यांचा जो पैशाचा देवघेवीचा व्यवहार होता तो बाबुराव यांच्यामार्फत होता व ते धरून २० हजार रु. कर्ज फेडण्यासाठीं घेऊन गेले होते. पण पैसे न देतांच वारले. तथापि रामाजी मल्हारांनीं सांगितले कीं, २-४ महिन्यांत पैशाची तजवीज करतो.

पत्रें ( वैद्यांनी लिहिलेलीं ): -नं. ३४ चे पत्र विश्वनाथभटांनीं नागपुरास जातांना जालनापूरनजीक काजळेश्वर येथून बाळंभटांस लिहिले आहे. त्यांनीं बाळंभटांस दरबारची, परभूची, पंत सचिवांची व नव्या राजयाची बातमी विचारली आहे. परभू म्हणजे यशवंतराव पोतनीस असावे. महाराजांच्या मागून गादीवर कोण बसणार याबद्दल विश्वनाथभटांस सातारा सोडतांना माहिती नव्हती, पण राजारामाबद्दल वाटाघाट चालल्याचे ठाऊक होतें हे या पत्रावरून स्पष्ट होत आहे. नं. ३७ चें पत्र बाळंभटांनीं विश्वनाथभटास लिहिलें आहे. ते म्हणतात, सातारा दरबारचा कारभार अनिश्चित आहे. ५० हजार रुपये महाराजांसाठीं पाठविले होते ते दिले.

आतां ऐवज व कापड आले ते महाराजांस बरें वाटल्यावर देतां येईल. अजमनासरजंगाशीं वाकूडपणा येऊं देऊं नये. त्याच्या मदतीस पंतप्रधानांनीं बाजी हरीबरोबर ५० हजार फौज पाठविली आहे. फत्तेसिंगाकडील आपाजी भावजीही ४।५ हजार सैन्यानिशीं तिकडेच आहेत. येथे कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं. पानगांवच्या राजियांचे ( रामराजाचे ) अनुसंधान राखण्याचा यत्न केला पाहिजे. यावरून रामराजे गादीवर येण्याचे अर्धवट ठरल्याचे दिसते महाराजांच्या अनिश्चित प्रकृतीमुळें व अव्यवस्थित कारभारामुळे वऱ्हाड नागपुराकडील आपले पैशाचे व्यवहारही तूर्त स्थगित करावे अशी सूचना त्यास यात देण्यात आली आहे. पत्र फार महत्त्वाचे आहे. नं. ४१ मध्यें विश्वनाथभटांनीं वऱ्हाडांतून राजाचे देऊळगांवाजवळ रघूजीच्या लष्करांत मुक्काम असतांना हें पत्र बाळभटास लिहिले आहे. न. ३७ चे पत्र त्यास या वेळीं मिळाले नसावे. तो साताऱ्च्या दरबारच्या माहितीची वाट पहात आहे. नारो शिवदेव भाव्ये हा विश्वनाथभटाबरोबर होता असे दिसतें. न. ४५ हें पत्र विश्वनाथभटांनीं नागपुराहून बाळभटास लिहिले आहे. या पत्रातील आशयावरून महाराजांच्या प्रकृतीबद्दल रघूजीस असे वाटत असावे कीं, ते अत्यवस्थ, बेशुद्ध स्थितींत आहेत. हें निश्चित होण्यासाठीं तो त्याच्या हातचे पत्र व राण्यांकडील पत्र आणवावें असे विश्वनाथभटांस सांगत आहे. त्यानें राणियाकडीलही कुशलवृत्त मागविले आहे.

पत्रे ( इतराची ):—नं १२ मध्ये मनमोहनगडचा हवालदार कारकून शेख नसरुल्ला यानें वैद्यचंधूंस लिहिलेले पत्र आहे. हा गड रोहिडेश्वरासमोर भोरच्या दक्षिणेस आहे. यास केळंजाही म्हणतात. वैद्यांना कळवितो कीं, पंतांनीं ठरविल्याप्रमाणे किल्ल्यांतील दास्तानापैकीं गल्ला अर्धा खंडी तुम्हांस व वेलंगपैकीं जमीन २५ चिघे मला देण्याची तजवीज होत आहे. न. २३ मध्यें जे पत्र आहे त्यांतील माणसे विशेष महत्त्वाची नाहींत. तें देण्याचा उद्देश इतकाच कीं, त्या वेळी बंगालच्या स्वारींत रघूजीने निरनिराळया स्थितींतील महाराष्ट्रीय माणसें नेलीं होतीं हें कळावे. भास्कररामाचा खून झाल्याचें कळल्यावरही बंगाल्यांत लढाईवर माणसे गेलीं हे केवळ धाडसी वृत्तीचेच द्योतक आहे. नं. ४८ मध्यें केवळ कोकणांतील बुरंबाड गांवची माहिती देणारें पत्र म्हणून छापण्यास घेतलें आहे. त्याची तारीख बरोबर लागलेली नाहीं. लक्ष्मण बल्लाळ जोशी हे वैद्यांचे कारकून बुरंबाडचे होते. त्यास बुरंबाडाहून बापूभट साठ्यांनी हें लिहिलें आहे. हा प्राचीन गाव केसोचा नाईक सरदेसाईचा वतनी होता. त्यांनीं बुरंबाडास लोकांना राहण्यास जागा दिली होती. सोमनाथभट भिडे यास एक ठिकाण दिले होतें. ते निपुत्रिक होते. तेव्हां त्यांचे ठिकाण सरदेसाई यांनीं त्याचे जांवई कृष्णंभट साठे यांस दिले. हे कृष्णंभट पत्रलेखकाचे आजे होते. आतां राघो पनदेव साठे व त्यांचे भाऊ हें ठिकाण आमचे म्हणून वाद सांगत आहेत. लक्ष्मण बल्लाळ हे वैद्यांबरोबर

पेशवे दरबारीं महत्त्वाचे पुरुष मानले जातात म्हणून बापूभट त्यास राघो पनदेवास वाद न करण्याबद्दल ताकीदपत्र पाठवावे म्हणून लिहीत आहेत. साठे कुलवृत्तांतांत याबद्दल माहिती नाहीं. बुरंबाड गांवाबद्दल माहिती सरदेसाई–मावळणकर घराण्याच्या इतिहासात उत्तरार्ध, खंड १, पान ३६०, ३६६ व ३७० मध्ये दिली आहे. साठे यांना महाजनकी दिली होती असे त्यांत आहे. दुसरे महाजन भागवत व नामजोशीही होते. महाजनकी म्हणजे पाटिलकीच असे. या पुस्तकांत वंशावळी व पिढ्या दिलेल्या आहेत. ही माहिती वाचून सरदेसाईंचे वतन कसे नाहींसे होत गेले हे कळतें. लक्ष्मण बल्लाळ हे नाना फडणीस याच्या कारकीर्दींत महत्त्वास आले, तेव्हां हे पत्र १७४८ मधील इतके जुने नसावें. हे पत्र भा. इ. सं. मंडळात एका पाक्षिक सभेत वाचलें होते. जास्त माहिती मिळाली नाही.

( ई ) हिशोब :—नं. ६ मध्ये वैद्यानीं खंडेराव काशी न्यायाधीश यांच्या खात्याचा हिशोब दिला. न्यायधीशाची फारशीं पत्रे नाहींत. त्यांचा वैद्याबरोबर देवघेवीचा व्यवहार होता, हे या हिशोबावरून कळून येईल. नं. २० यात विश्वनाथभटांचा घोम येथील अनुष्ठानांत जो खर्च झाला त्याचा तपशील दतरात आहे. ह मुखवस्त्र हिशोबाचे पान आहे. मोडक जंत्रींत मिति चुकल्या आहेतच. पण मुसलमानी महिन्याच्या तारखाही बरोबर नाहींत. जंत्रींत जमादिलाखरची शेवटची तारीख २९ च आहे. पण या पानांत जमादिलाखरची तारीख ३० आहे. हें लक्षात यावे म्हणून हा कागद दिला आहे. घोमास खर्च रु. ३८३८—झालेला आहे. विश्वनाथभटांस भोसल्यानीं ज्या गांवची पोतदारी दिली होती त्याची नावें रक्कम व कमाविसदार यांचा तपशील नं. २२ मध्ये दिला आहे. हीं सर्व गावे देवगड प्रातातील आहेत. या पत्राचे महत्त्व असे आहे की, पत्राचे अक्षर हा एक नागपूरकडील अक्षराचा नमुना आहे. वैद्याचे दोन हुशार कमाविसदार केसो हरी सावकार व नारो अनंत गद्रे यांनीं केलेल्या वसुलाचा व बाकीचा आकडा यांत आहे. अस्सल पत्र वाचून मजकूर लावण्यास काहीं वेळच घालविला पाहिजे. वगळलेले शब्द, आणे, पैसे व रुपये कसे लिहितात हे पाहण्याजोगे आहे. र, ल, को, ह्या अक्षरांचे वळणही लक्षांत घेण्यासारखे आहे.

( उ ) याद्या :—नं. ३२ हे कागदाचे फेरिस्त असून त्यांत नागपुराकडील लोकाकडून येणाऱ्या रकमेसंबंधीं लिहून घेतलेला कागदांचा तपशील आहे. ही यादी नागपुरास साताऱ्याहून त्यांजकडे वसुलीसाठीं पाठविण्यांत आली होती. यांतील बरीच नांवे पूर्वीच्या कागदांत येऊन गेलीं आहेत. बाळंभटानीं आऱ्यास केलेल्या अनुष्ठानाबद्दल महाराजानीं भोसल्याकडून रु. ३६०० देवविले. ते वैद्यांना रोख मिळाले नाहींत. त्याबद्दल वैद्यांनीं त्याचेकडून कर्जरोखाच लिहून घेतलेला होता. ही रक्कम वसुली रकमेंत दाखविली आहे. दोस्त महमदखान दिमत नादरखान याचा रु. ३००० चा एक कागद आहे. हा दोस्त महमद भोपाळकर नबाब असावा. नादरखानाचें

M 4013

नांवहि पत्रांतून आलेलें आहे, पण दोघांची बरोबर माहिती लागत नाहीं. अलीकडे ३-५-१९४९ च्या 'केसरी' पत्राच्या पृ. ३ वर ग्वाल्हेरचे भा. रा. भालेराव यांनीं भोपाळसंबंधीं पाठविलेली माहिती छापली आहे ती पहावी. नं. ४७ मध्यें नांदेड सरकारने साताऱ्याच्या राजकीय माणसास देण्याकरितां जीं वस्त्रें महाराजांकडे पाठविलीं त्यांची तपशीलवार यादी आहे. कदाचित् पत्रांतील 'नांदेडी' हा शब्द सनगाचें विशेषण असेल तर हीं सनगें भोसल्यांनींही पाठविलीं असतील. कारण यांतील माणसांचा संबंध भोसल्यांच्या व्यवहारांत आला आहे.

(ऊ) पावत्या :—यापैकीं न. २७ ची पावती विसाजी गोविंदांनीं रुपये २,००० ची विश्वनाथभटांस दिली आहे. हे पैसे हुजूर पोतनिसांनीं रघूजीस नागपुराहून आणण्यास झालेल्या त्याच्या खर्चाबद्दल विश्वनाथभटाकडे दिले होते ते त्यांनीं त्यास दिले म्हणून ती त्यांना दिली आहे. बाकीच्या नं. २८, २९, ३० व ३१ च्या पावत्या विश्वनाथभटांचा कारकून लक्ष्मण बल्लाळ याच्या अक्षराच्या लिहून आहेत. या पावत्यांतील मजकुरावरून रघूजीस रु. ५० हजार विश्वनाथभटांकडून मिळाले होते, असे निघत आहे

(ऋ) नानासाहेब पेशवे :—नं. ३८ हे नानासाहेबांचे पत्र विश्वनाथभटांना नागपुराकडे पाठविलेलें आहे. त्यांस रघूजीला साताऱ्यास आणण्यासाठीं पाठविले होतें. ते कधीं येतात म्हणून त्यांत विचारले आहे. विश्वनाथभटांचे भोसले दरबारच्या कामाचे महत्त्व पेशवे जाणून होते, हें स्पष्ट होत आहे.

(ॠ) भोसले :—या सालीं शाहूमहाराज आजारीच होते. त्यांस आपण लोकांकडून येणारे पैसे कसे वसूल करूं व कर्जदारांची फेड कशी करूं, तसेच आपल्या मागें गादीस मालक कोण करावा, ह्या विवंचना लागल्या होत्या. राणी सौ. सकवारबाई कांहीं उलाढाली करी त्या आवरण्याचाहि त्रास त्यांना होत होता. महाराज व राण्यांस मुख्यत्वे रघूजी भोसल्याकडूनच पुष्कळ पैसे यावयाचे होते. त्याची वसुली करण्याची मुख्य विवंचना लागली होती. महाराजांनीं त्यास साताऱ्यास येण्याबद्दल माणसें पाठविलीं, तरी तो कांहीं तरी सबब सांगून टाळाटाळी करीत होता. त्याचा मुलगा मुधोजी दत्तक घेऊन गादी मिळेल अशी आशा त्यास वाटत होती, तीहि राहिली नाही. यामुळे तोहि वैतागून गेला होता. अशा अर्थाचीं शाहूमहाराजांचीं व रघूजीचीं व त्यांच्या मुत्सद्यांचीं या सालांत पत्रे आहेत. त्यांचा खुलासा पुढे करण्यांत येत आहे. नं. ९ चें रघूजीचें पत्र विश्वनाथभटांस साताऱ्यास पाठविलें आहे. वैद्यांनीं दत्तविधानासंबंधानें त्रिंबकजी राजे बावीकर यांजकडील मुलगा दत्तक घेण्यासंबंधीं व मुधोजीस दत्तक घेण्यास नकार मिळाल्याबद्दल माहिती पूर्वीच्या पत्रांत दिली होती. त्याचा उच्चार रघूजीनें यांत केला आहे. बन्सीपुरी गोसावी यास १ लक्ष रु. द्यावयाचे ते लवकर कोनेरपंत कोलटकर व बऱ्हाणजी मोहिते यांच्या मार्फतीनें द्यावे म्हणून त्यानें वैद्यांस लिहिलें आहे. कारण त्याचा उपयोग रघूजीस

वरचेवर होत असे. यांतील शिवाजीबावा हा मोहिते किंवा टाळकुटे असावा. सदाशिव दीक्षित हा पाटणकर नसून ठकार होता. त्याचें एक पत्र रघूजीच्या नांवचें आहे. नं. १० मध्ये साबाजीनें नारोपंत गद्रे यास लिहिलेल्या पत्राची नक्कल आहे. याचे वळण अस्सल नागपुरी आहे. पत्रांतील आशय असा आहे कीं, भुगांवच्या पांढरीचे रयतेकडून गेल्या सालाप्रमाणें मेजमानी पट्टी वसूल करावी. पांढरीची रयत म्हणजे गांवठाणांत राहणारी. पांढरीच्या उलट काळी असाही शब्द लागवडींत आलेल्या जमिनीच्या वसुलास लावतात. 'मेजमानी पट्टी' ही सैन्याच्या खर्चाबद्दल असते. नं. १७ हें रघूजीने वैद्यबंधूंस लिहिलेलें पत्र आहे. त्यांतील मुख्य मजकूर असा कीं, साताऱ्यास जाण्यासाठीं आम्ही उंदरी व नांदेडवरून बोधनपर्यंत आलों व तुम्ही फत्तेसिंगबोवा तुळजापुरास भेटतील म्हणून लिहिले होते व आत कळते कीं, ते निघालेच नाहींत. तूर्त साताऱ्याकडे जाण्याचे रघूजीने या सबबीवर थांबविले. नबाब नासरजंग साखरखेडल्यावरून देवगड प्रांतीं जाणार म्हणून त्यानें तेथून कळंबावर येऊन मुक्काम केला, व बंगाल्यांत फौज देऊन चि. साबाजीस पाठविण्याचे ठरविले. नं. २५ मध्ये रु. ५०० पर्यंत किरकोळ देणे होतें त्याची तजवीज रघुनाथभटांनीं करण्याबद्दलचा मजकूर रघूजीने लिहिले आहे. हे पैसे बन्सीपुरी महन्ताकडे मागितले होते ते त्याने वैद्याकडून देवविले. नं. ३९ हे पत्र सदाशिव दीक्षित ठकार यांनी रघूजीस लिहिले आहे; त्यावरून शाहूमहाराजांनीं रघूजीकडील कर्जाच्या पैशाची वसुली तगादा लावून करण्यासाठीं विश्वनाथभट व विसाजी गोविंद यांस मुद्दाम पाठविलें होते. बंगाल्यांतील लढाईत त्यास बराच पैसा मिळाला असावा असा महाराजांचा कयास होता. नं. ४६ मध्यें रघूजीने पैशाचा तगादा आल्यामुळे विश्वनाथभटास तांतडीने परत साताऱ्यास जाऊन महाराजांची समजूत घालण्यास सांगितले व तेथील सविस्तर वृत्त मागविलें आणि आपला तिकडे जाण्याचा बेत रहीत केला. त्याला महाराजांची सध्यां प्रकृति कशी होती हीच निश्चित माहिती पाहिजे होती. नं. ५२ च्या रघूजीच्या पत्रावरून तो जरी साताऱ्यास जाण्याच्या तयारीने नागपुराहून निघाला तरी तो जाण्याची टाळाटाळी करीत आहे असें दिसत आहे. आतां तो निर्मळेस येऊन पोंचला आहे. त्याने शाहूच्या प्रकृतीबद्दल आणखी साताऱ्यास पत्रे लिहून माहिती मागविली होती. नं. ५४ मध्ये साबाजी भोसल्यानें नारोपंत गद्रे यास मौजे भागदूरच्या मीरखानाचे बैल जप्त केलेले परत देऊन जरूर भेटण्यास बोलावले आहे, असें आहे. यांतील शिक्कामोर्तब नेहमींपेक्षां निराळा दिसतो. ( पे. द. २०–१६७ मधील फोटो पहा. ) नं. ५५ व ५६ हीं पत्रे रघूजीनें अनुक्रमें विष्णुपंत यास व बाळंभट वैद्यांस लिहिलीं आहेत. नं. ५५ मध्यें कर्जफेडीचा मजकूर आहे व नं. ५६ मध्यें आम्ही तुळजापूर प्रांतीं येत आहो म्हणून कळविलें आहे. यांतील अंबाजीराम हा मोहिते असावा. अशाच आशयाचीं पत्रें त्याने कोनाप्पा पुरंदरे, भिकाजीपंत व भास्करराव पंडितराव यांस लिहिलीं आहेत. सर्वांची तारीख

२५।१२।१७४९ एकच आहे. या व्यक्ति कोण व त्याचा भोसल्याशीं काय संबंध कळत नाहीं. ही पत्रें छापलीं नाहींत. शाहूमहाराज १५।१२।१७४९ रोजीं वारल्यानंतर पत्रें पोंचलीं आहेत. विश्वनाथभटही तेथे पोचले नव्हते म्हणून फक्त बाळंभटांनाच पत्र पाठविले आहे. तुळजापुरास फत्तेसिंगास लवकर पाठविण्याबद्दल पत्रांत लिहिलें आहे. त्याची गांठ पडल्यावर साताऱ्यास जाण्याचा विचार ठरावयाचा होता.

(ऌ) पंतसचिव :—नं. ११ मध्ये सचिव मोहनगडचा किल्लेदार सेखनस कल्ला यास लिहितात कीं, विश्वनाथभट मंडळीसह चौमास सेवेसाठीं राहिले आहेत. त्यांना तेथे मांडव घालून द्यावा व तेथें आहेत तोंपर्यंत २ गडकरी तेथें राहतील अशी तजवीज करावी. मनमोहनगड शिवाजीनें १६७४ सालीं घेतला होता. ७५ वर्षा-नंतरही किल्लेदार मुसलमान आहे. नं. १३ मध्ये सचिव विश्वनाथभटांस लिहितात कीं, चिमणाबाईचा मुखत्यार सेटी भोई यास १४९॥ रु. द्यावे. ही बाई सचिवांची संबंधी असावी.

(ए) सोमवंशी :—नं. ४ मध्ये मदनसिंग भोसले यांनी तर्फ गेवराई, परगणे बीड आम्हांस दिल्याचा कागद सुलतानजी निंबाळकर यांनी दिल्याबद्दल सोमवंशी सरलस्कर यास कळविलें आहे. मदनसिंग हा छत्रपति संभाजीचा दासीपुत्र होता. नं. ५ मध्ये सुलतानजी निंबाळकर यास नं. ४ मध्ये लिहिल्याप्रमाणे नेवराईचा वसूल मदनसिंगास मिळण्यासाठी आमीलदारास व जमीनदारास ताकीद देण्याबद्दल लिहिले आहे. नं. ३३ मध्यें सोमवंशी सरलस्कर यांनीं बाळंभट वैद्य यांस कळविले आहे की, तुमच्या कर्जाची फेड दसऱ्याच्या सुमारास होईल. सोमवंशाच्या पत्रावर श्रीभवानीशंकर असा श्रीकार असतो.

(ऐ) मानाजी पवार :—शाहूमहाराजांनी गोवलकोट (गोविंदगड) घेण्या-साठी कोकणांत जीं माणसे पाठविलीं होतीं त्यांपैकी हा पवार होता. हा काळोजीचा मुलगा. वैद्यांनीं करकरे यास येणें रक्कम मोठी असल्यामुळे त्याजकडील कर्जाची मागणी करण्यासाठीं पाठविले होते. पण त्यानीं तूर्त सवड नाहीं म्हणून उत्तर दिले होते तें नं. १ मध्यें दिलें आहे. नं. २ मध्ये त्याने वैद्यबंधूंना शाहूमहाराजांकडून अकोडच्या सनदा मिळवाव्या अशी विनंति केली आहे. त्या सनदांसाठीं बाळोजी भोसल्याचा प्रयत्न होता. वैद्य हे त्याचें कांहीं चालूं देणार नाहींत व आपलें काम करतील असा भरंवसा होता.

(ओ) खंडोजी गोगवले :—नं. २४ मध्ये पंतप्रधानास लिहितो कीं, स्वामींनीं खर्चास २५ हजार रु. मागितले त्यांपैकीं वैद्यांना ३७९॥। द्यावे. नं. ५३ मध्यें तो वैद्यबंधूंना लिहितो कीं, रघूजी भोसल्याकडील रकमेतून राणी सौ. सकवारबाईस खर्चास लागणारे १०,००० रु. लिंबाळया नाईक तांबेकर यास द्यावे. हा गोगवले हवालदार, महाल भांडारगृह, खासगीस खर्चासाठीं लागणारे पैसे अशा तऱ्हेने वसूल करीत असे. याचा मोर्तब चौकोनी आहे.

( औ ) बुवाजी नाईक कदम :—यानें नं. ७ मध्यें वैद्यबंधूंना लिहिले आहे कीं, पुढील गोष्टींबद्दल खुलासा करा—( १ ) शिरके याच्या महाडाकडील हालचाली, ( २ ) महाराजांपाशीं मानाजी वजारतमाव यांची झालेली वाटाघाट. हा कदम अंजनवेलचा तुळोजीतर्फे अधिकारी होता.

( अं ) महादाजी अनंत गोडबाले व सखोजी ना साटम :—हे दोघे तुळोजी-तर्फे गोविलगडास अमलदार होते. त्यांनीं नं. ८ मध्ये वैद्यबंधूकडून सातारच्या दरबारची राजकीय बातमी मागितल्याचे पत्र आहे.

( अ ) काशी भास्कर कोलटकरः—नं. ५७ मध्यें या कोलटकरानें वैद्यांकडून २३,००० रु. घेतले त्याची पोच दिली आहे. कोलटकराकडे सुरंजी, कुरुंदखेडी, म्हसांग व लाखनवाडा या परगण्यांची मामलत होती. त्याचे पैसे वसूल होण्यापूर्वी भरण्याकरतां वैद्यांना मागावे लागले. यांचा जन्म १७४४ मध्ये असणे शक्य दिसत नाही. या पत्राचें साल १७४९ आहे.

( क ) नारो अनंत गद्रेः—नं. २१ हें पत्र गद्रे याने वैद्यांना उमरखेडाहून नागपुरास आल्यावर लिहिले आहे. त्यांत मुख्य दोन गोष्टी आहेत: ( १ ) रु. ११७८ हुंडी करून पाठविले आहेत. ( २ ) रघूजी साताऱ्यास जाण्यासाठीं नाग नदीवर डेरे देऊन राहिला असून वऱ्हाडांत जाऊन तेथील कामें उरकून तिकडे येणार आहे. यावरून त्याची साताऱ्यास जाण्याची दिरंगाई दिसून येते. नं. ३६ मध्यें तो वैद्यांना वसुलाची हकीगत लिहितो ती अशी:— ( १ ) जानोजी लोकांकडून खर्च-पट्टी जुलुमाने वसूल करीत आहे. ( २ ) पोतदारीवसूल होणें कठिण आहे. ( ३ ) संस्थानिकांकडील वसूल मिळत नाहीं. ( ४ ) शंकराजी कान्होने गंगाजीपंत दिवाणा-कडील रु. ५ हजार वसूल करून पाठविले आहेत. ( ५ ) चाद्याकडील वसुलास जानोजीनें हरकत दिली आहे. ( ६ ) मुगांव व टेकाडीचे रु. हजार वसूल होतील. ( ७ ) चितोपंत तुळजोपंताबरोबर परत आला व कर्ज केले आहे. त्यास केळवदच्या पैशासाठीं सेनासाहेबाकडे पाठविले आहे. शेवटीं वैद्यांना लवकर या म्हणून लिहिले आहे. नं. ४९ हे विश्वनाथभटांचें गद्रे यास पत्र आहे. यांत ते त्यास वसूल कसा करावा हे लिहीत आहेत. या पत्रांत वैद्य रघूजीस कोणत्या दिवशी भेटले हे दिले आहे. तीच या पत्राची तारीख लावली आहे. घोडेस्वारास बारगीर म्हणतात व व निरोप ( लबा ) घेऊन जाणारास जासूद म्हणतात.

# ढोबळ चुकांचें शुद्धिपत्र



१७४२ पृ. १३ इंग्रजी वाक्य गाळणे

१७४३ पृ. १५ व २३ इंग्रजींत अशुद्ध

१७४४ पृ. १ नं. २ चें साल बदलणे. श. १६६५ ऐवजीं १६६६. सन १७४४ ऐवजी १७४५.

पृ. ९ ओळ ६ कारखाना

पृ. १२ संभाजीऐवजीं सक्काजी

पृ. १३ Cheque for Check

पृ. १५ इं. No. 19—activities for achivities

पृ. १६ Cheque for Check

पृ. २० Cheque for Check

पृ. ३९ ' Who ' after ' Kolapurkars '

पृ. ३९ Hari for ' how '

पृ. ४० ' time ' after ' him '

१७४५ पृ. ३७ Kolhatkar for Kulkarni

१७४६ पृ. ७ ' कलंतर ' for ' केलेतर '

पृ. १० इंग्रजी ' पावस ' for ' Pawar '

पृ. १५ शेवटची ओळ ' थांचले ' for चले

१७४७ पृ. २४ इंग्रजी ' बाबूजी ' for बहादुरजी

१७४८ पृ. ५ इं. ' Surarao ' for ' Tarsurerao '

पृ. ७ इं. Erase the portion after last year and insert ' When Vishwanathbhat was going to come Raghuji had started for Bengal expedition hence Kane brothers did not try to see him.'

१७४९ पृ. ६ For Patankar read Thakar.

---

No 1

श्री

पौष शुा १२।१६६३
जानेवारी ७।१७४२

**बालंभट** व **विश्वनाथ भट** बिन रघुनाथ भट वैद्य गोत्र गार्ग्य, सूत्र आस्वलायन हे स्वामीचे सेवा निष्ठेने करितात याचे चालविणे आवश्यक जाणोन यासी नूतन मोकदमीचे वतन करून दिल्हे महालानिहाय बीा।

| | |
|---|---|
| १ हवेली **दाभोल** | १ ताा **जालगांव** |
| १ ताा **चिपळूण** | १ ताा **पंचनदी** |
| १ ताा **सावर्डे** | १ ताा **वेसवी** |
| १ ताा **वेलंब** | १ ताा **नातूपालवण** |
| १ ताा **गोहागर** | १ ताा **केलसी** |
| १ ताा **खेडनळवटी** | ५ |
| ६ | |

येकून महाल आकरा सुभा **दाभोल** येकंदर आकरा अकरा महालची सरमोकदमीचे वतन यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करून दिल्हे असे या वतनास हक ×लाजिमा रयत निसबतीने देत जाणे.

गावगना महालानिहाय आकार होईल त्यास रयत निसबतीने

नकती आकारास दरसदे रुा १ | येर्नाजिनसी आकारास वास्ते खंडीस गला तीन पायली ८।

किराणा जिनसास आकार दर खंडीस आदा ८।

याा कलमेने तीन जकायतीस दर येलास हक एक रुका ८१

सालिना दर म्हैसीस लोणी आदसेर ८८॥

जलमार्गे गलबतावरून जिनस येईल त्यास केली मापे खंडीस वजनी खंडीस हक हक तीन पायली ८। दाहा सेर ८।

भीट बंदरी मीठ पिकेल तेथे दर खंडीस हक तीन पायली ८।

तेलीयाचे घाण्यास तेल सालीना, वजन कचे आदासेर ८८॥·

गावगना हक सालीना दर गावास लोणी येकसेर ८८१ इरले १

गावगना चाभाराकडील +जुते दरसाल येक १

येणेप्रमाणें हक करून दिल्हा असे तरी यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणें पत्रे मार्गशीर्ष बहुल त्रितिया इंदुवासर सन इहिदे ओबैन मया आलफ. येविसीची पत्रे छ १० जिल्हेजची केली

१२ कित्ता

१ वतनपत्र

११ देशमुख व देशपांडे महालानिहाय महाल आकरा येकूण पत्रे

१२

२

१ देशाधिकारी कदीम, वर्तमान, भावी सुभेदार

१ **संभाजी आंगरे** सरखेल यास

२

१४

(1) Balambhat and Vishvanathbhat aregranted Sar-Mokadami Vatan in the 11 Mahals mentioned for the loyal services that the two brothers were rendering

× पिढीजाद वतनदराचे अधिकार. + वहाण, पायताण

---

No. 2 **श्री**

पौष ब ३।१६६३
जानेवारी १२।१७४२

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६८ दुर्मतिनाम संवछरे पौष बहुल त्रितीया भौमवासर क्षेत्रीय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणी

राजश्री **बाळंभट व विश्वनाथभट वैद्य** गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन यासि दिल्हें इनामपत्र यैसजें, तुम्ही शाहूनगरनजिक किले **सातारा** येथील मुकामी स्वामी सनिध विनंती केली की, आपण स्वामीची सेवा निष्ठेने करितों आहों, आपणास येक गांव इनाम देऊन वंशपरंपरेनें चालविले पाहिजे म्हणवून त्यावरून मनास आणून तुमचें चालवणें आवश्यक जाणून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन मौजे **जांवली** ता।

**गुंजणमावळ** हा गाव पेशजीच्या मुकासिया करून दूर करून हालीं तुम्हास स्वराज्य व मोगलाई येकून दुतर्फे, देखील इनाम तिजाई, कुलबाब कुलकान्हू हालीपटी व पेस्तरपटी, खेरीज हकदार व इनामदार करून दरोबस्त इनाम दिल्हा आसे तरी तुम्ही मौजे मार चतु:सीमा पूर्वमर्यादे प्रमाणे आपले दुमाल करून घेऊन सदरहू प्रमाणे तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वौंशपरंपरेने इनाम अनभऊन सुखरूप राहणें. जाणीजे लेखनालंकार मोर्तब.

तेरीख छ १५ जिलकाद सुहुर सन इसने आर्बैन मया आलफ

डावे बाजूस महाराजाचा शिक्का आहे.

**टीप**—ही मुख्य सनद शाहूमहाराजानी दिलेली तेवढी छापिली आहे याखेरीज आणखी त्यांची आज्ञापत्रे मोकदम, देशमुख, देशपांडे, देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी व पंतसचीव याच्या नावचीही आहेत त्यातील हमील हाच आहे म्हणून आज्ञापत्रे छापिली नाहीत मात्र यात जेथे 'तुम्हास' शब्द आहे त्याऐवजी 'यास' शब्द व शेवटी 'इनाम अनुभवून वगैरे' वाक्य गाळून त्याऐवजी 'इनाम चालविणे, प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे, या पत्राची प्रत लिहून घेऊन हें असल पत्र भोगवटियास याजवळ परतोन देणे जाणीजे लेखनालंकार' असा मजकूर आज्ञापत्रात वाचावा शेवटी राजमुद्रा असते

(2) This is a Sanad of Inam village of Jambhali, Bhor State, grantad by Sahu Chhatrapati to Vaidya To execute this, orders were issued by the next day by Chhatrapati to Mokadam, Deshmukh and Deshpande, Deshadhikari, Lekhak, Vartaman ( present ) and Bhavi ( future ) and Pant Sachiv Those orders being of the same contents are not printed

---

No 3

श्री

शिक्का व मोर्तब वाटोळे
पुष्पदलसम दुहेरी

फा शुध १०।१३६३
मार्च ५, १७४२

राजश्री **बालंभट वैद्य व विश्वनाथभट वैद्य** गोसावी यांस छा सकलगुणालंकरण अखंडित अलंकृत राजमान्य श्रो॥ **तुलाजी आंगरे** रामराम विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे विशेष पत्र पाठविले प्रा॥ होऊन लेखनार्थ अवगत जाहाला पत्री लेख केला की, **संभाजी** भोंसले सरकारांत चाकर आहे त्यास पाठवावयाविसी राजश्री स्वामीचे आज्ञापत्र सादर आहे त्याप्रमाणे रवाना करावे, म्हणून लिहिले, त्यावरून **महाराजांचे** आज्ञेप्रमाणे त्यास ताकीदपत्र सादर केले आहे. जातील.

No. 1 ]                श्री

शिक्का व मोर्तब वर्तुळाकार दुहेरी

१९ जिलकाद
पौष वा। ६। १६६४
जानेवारी ५, १७४३

राजश्री **बाळंभट** व राजश्री
**विश्वनाथ भट** वैद्य गोसावी यांसी.

छ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य **आपाजी सोमवंशी सरलस्कर** दंडवत

| | |
|---|---|
| ॰ ◡ | विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये |
| श्रीराजा शा | कुशल लिहित जाणें विशेष. राजश्री **स्वामींनीं** |
| हु चरणि तत्पर | राजश्री **द्वारकोजी सोमवंशी** आम्हांकडे पाठविले. |
| आपाजी सोमवं | हुजूर यावयासी आज्ञा आली. येसीयास तूर्त येथें |
| सि सरलस्क | कर्जदाराचे काजिये अतिशयेसी पडले आहेत. यांच्या |
| र नीरंतर. | समजाविसी आठा चौदिवसा निकाल काढून |

तिकडे येत असो. येथील कितेक अर्थ राजश्री **द्वारकोजी सोमवंशी** सांगतील. त्याजवरून दरबारीं साहित्य करून पत्राचें उत्तर पाठवणें. जाणिजे छ १९ जिलकाद बहुत काये लिहिणें हे विनंती.*

( 1 ) Appaji Somavanshi writes to Vishwanathbhat that Maharaja Shahu sent Dwarkoji Somavanshi in order that he should be present before him soon. Owing to some disputes amongst the creditors he was detained and hence requested Vishwanathbhat to inform Chhatrapati accordingly.

No 2. ]                श्री

२२ जिल्काद

शंभूचा शिक्का व मोर्तब                पौष व. ९।१६६४
पद्मदल सम दुरेघी                जाने. ८, १७४३

राजश्री **बालाजी रघुनाथ** व **विसाजी रघुनाथ** गो। यांसी.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो। **तुलाजी आंगरे** रामराम

पर्याल कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. तुम्हां उभयतास शंक्रमणयुक्त तिलशर्करा खलेत्या दोन पाठविल्या आहेत. स्वीकार करून प्रविष्ट जहालेयाचें प्रत्योत्तर पाठविलें पाहिजे. वरकड अर्थ कितेक सांगोन राजश्री विसाजीपंत व राजश्री केसो त्र्यंबक उभयता पाठविले आहेत, ते जागा पावलेच असतील. तुमचे दर्शनार्ती सविस्तर सांगतील, तो अर्थ चित्तांत आणून कार्य प्रयोजनिक प्रसंग बहुमानयुक्त उरकून देऊन उभयता मशारनुलेची रवानगी सत्वर केली पाहिजे. बहुत काय लिहिणें. रा छ २२ माहे जिलकाद लोभ असो दीजे. ( लेखन सिमा )

खलेती = पिशवी

( 2 ) Tulaji Angre sends the customary sweetmeats ( Halava ) of Sankrant season to the Vaidya brothers. Keso Trimbak and Visajipant were sent to Vaidya to state what was wanted They were to go back early.

No. 3 ] श्री

माघ शु. ८।१६६४
जानेवारी २२, १७४१

यादी सणगें मिा माघ सुा ८ सुहूर सन सलास.

| | तिवटें | सेले | खसखसी | | कंदी ( सेले ) |
|---|---|---|---|---|---|
| येशवंतराव पोतनीस | ० | १ | ० | | १ |
| गणेशपंत दामले | १ | ० | ० | | ० |
| निलो विठ्ठल देशपांडे पुणेकर कंदी सेला | ० | १ | ० | | १ |
| पंचाक्षरी जामदार | १ | ० | ० | | ० |
| | | | | आंगरखा | |
| आंगरे | ० | २ | १ | १ | ० |
| वाडा फत्तेसिंग | ० | १ | १ | ० | ० |
| राजवाडाबाई सणगें | ० | १ | १ | ० | ० |
| येमाजीपंत | १ | १ | १ | ० | ० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| कोनेरपंत | ० | १ | १ | ० | ० | |
| वेंकटराव | १ | ० | ० | ० | ० | |
| बाबुराव हरी | १ | ० | ० | ० | ० | |
| पुरुषोत्तम भट | २ | ० | ० | ० | ० | |
| | ७ | ८ | ५ | १ | २ | |
| महादाजी कमलाकर | १ | ० | ० | ० | ० | |
| भगवंतराव माहादेव देशपांडे | १ | ० | ० | ० | ० | |
| राजश्री स्वामीकडील सेला १ | ० | १ | १ | ० | ० | |
| सौ बाई धाकटी पागोटें | १ | ० | ० | ० | ० | |
| | | | | | | साधा |
| ताराबाई | ० | १ | ० | ० | ० | ० |
| केसो हरी | १ | ० | ० | ० | ० | ० |
| आपाजी बाबुराव | १ | ० | ० | ० | ० | ० |
| कृष्णसेट चिवटे | २ | ० | ० | ० | ० | ० |
| राघोराम | १ | ० | ० | ० | ० | ० |
| | १५ | १० | ६ | १ | २ | १ |
| मोरोपंत दामले | १ | ० | ० | ० | ० | ० |
| नारो केशव फडनीस करकरे | १ | ० | ० | ० | ० | ० |
| देव चिंचवडचे | १ | ० | ० | ० | ० | ० |
| बाबुराव रघुनाथ दि॥ सरलस्कर | १ | ० | ० | ० | ० | ० |
| कि॥ गोसावी परलीकर | १ | ० | ० | ० | ० | ० |
| राणोजी भोसले | १ | ० | ० | ० | ० | ० |
| कि॥ फडनिसीचें सिरपाव | १ | ० | १ | ० | ० | ० |

| | |
|---|---|
| जामदार खाना बा॥ | वाटेंत खर्च |
| पंचाक्षरी | १ सेला १ विश्वनाथ भटास झग्यास |
| ४ तिवटें ४ | २ सिवाजी नाईं ( क ) यास वस्त्र |
| २ सेले खसखसी | १ सेला |
| २ सार्वे | १ तिवट |
| ४ साड्या | २ |

४ दुपटे ४ — १ गुणमहाजनी देसाई माघ वद्य १०
१ खण तांबडा — पागोटें
येकूण दागिना — २ धोंडजी कडू नि। आंगरे माघ ९
१७ — सेले पागोटें

| | | |
|---|---|---|
| कि। सणगें नि। आंगरे गु। विश्वनाथभट सणगें | | |
| १ सेला जरीचा | १ | १ |
| १ पागोटें | | |
| २ | | |
| गु। बाळंभट सेला लाल अष्टगोली १ व पागोटें १, | १ | १ |
| येकून | २ | २ |
| उमाबाई पौ साडिया बा। सचीव | १ | ० |

This is a list of persons who sent on the 13 th day of the death of Vaidya brother's father, Raghunath bhat, which took place on 10-1-1743, condolatary clothes, to them. All of them were very intimate with the Vaidya brothers and many of them had money dealings with them and took advice also from them in intricate matters

No 4 ] श्री+रामचंद्र

पौष १६६४

जानेवारी १७४३

सकलगुणपरिपूर्ण राजश्री बाळंभट व राजश्री

विश्वनाथ भट वैद्य स्वामी गोसावी यांसी.

पोष्य भगवंतराऊ रामचंद्र कृतानेक नमस्कार. विनंति उपरी. येथील कुश जाणोन स्वकीय क्षेम लेखन केलें पाहिजे. विशेष. महाराजांनीं परसोजी मो व आबजी सिंदे याबराबर आज्ञा पत्र सादर केलें. तेथें बागेंत फुलझा लावावयासी पाहिजे तरी पाठऊन देणें, म्हणोन आज्ञा केली. त्या वरून खंडोज कदम व हुजरे याबा फुलझाडें जिनसाच पाठविला आहे. व महाराजा

विनंतिपत्र पाठविलें आहे, तरी तुम्ही जिनस व पत्र रुजू करून प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठविलें पाहिजे, * **हुजरे या बा। तुमचें पत्र आलें नाहीं. यामुळें संशय वाटला होता.** आम्ही उदंड **महाराजाचे** सेवेशी व तुम्हास पत्रें आर्जी लिहिल्या, परंतु **दाद नाहीं.** येसी बेदाद राज्यांत दरबारीं जाली. अंधकार पडला. डोळे झाकिले. आमचा इलाज काय आहे. ब्राह्मण लोक निर्बली. आधार पाहातां **महाराजांचा** किंवा निदानी परमेश्वराचा आहे. येक बेळ **महाराजा** सनिध येतों. **महाराजांचे** पायावर मुलें घालून श्री यात्रे जाऊं. आई वाटीना, बा (प) भीक न घाली, काये करावें ? कर्जदार जालों. दुष्ट सेर जाले. **तुळाजी आंगरे** यांनीं बेकैदी केली. पारपत्य नाही. धनलोभास अवघे गुंतले. येशकीर्तीचें आगत्य नाही. **नागोजी आंगरे** व लोक **वीस आसामी** यांचा आपाये जाला. हालीं **विसाजीपंत** व **राव ठाकूर देसाई** यांजवर तुफान आले. **राव ठाकूर** पळाले. कबिला धरून **विजेदुर्गास** नेला. पुढें काये होईल तें पाहावें. दया करणें. हे विनंतिपर **हुजूर***

* मधील अक्षर भगवंतरावाचें स्वतःचें.

( 4 ) This is a letter written by Bhagwantrao Amatya to Vaidya brothers in reply to the order sent by Shahu with More and Shinde for supplying garden plants. He sent the plants with Khandoji Kadam and Hujare. The writer complains about the indifferent treatment given to his requests by Maharaja and informs that Tuloji Angre is troubling Visajipant and Rao Thakur Desai. They fled away and their women were captured and taken to Vijayadurga.

No 5 ] श्री

फा. शु. ७।१६६४ दुदुभी
फेब्रुवारी १९, १७४३

हिशेब सरकारांत गु॥ **येसवंतराव पोतनिस.**

सु॥ खमस अर्बैन मया व आलफ.

| | | |
|---|---|---|
| ७ | यैन | व्याज दर २ |
| शके १६६४ दुंदभी संवत्छरे फालगु | ११६० | ५४३ |

न सुा ७ पैकीं जमा पोते सुद ११.

ताा रक्ताक्षी जेष्ट सुा १५ मुाा १५८४.

येाा रुपये ५१३ वजा बारोत्रा ५० बाकी.

| | | |
|---|---|---|
| चौकडा व सोर्ने. | १३५० | ० |
| १३२५ मोर्त्ये वाडा दुसरा. | | |
| २५ सोर्ने. | | |
| १३५० | | |
| कडी बक्षीस | ६५० | ० |
| १ तुळाजी आंगरे | | |
| १ विश्वनाथ भट वैद्य बक्षीस. | | |
| २ | ३९६० | ५४३ |
| | √४५०३ | |

वजा सोड रुाा ३७॥ बाकी. रुपये ४४६५॥.

खर्च √ रुपये

१८६० रक्ताक्षी जेष्ठ सुा १५ पुतळी

१८५८ ।॥· यैन वजन ८८४।॥५।॥·

√दर १५॥·

१।· तोटा.

१८६०

बाकी रुपये २६०५॥·

चिठी लिंगापा माहादेव नाा तांबवेकर.

छ १३ जावल उर्फ अधिक आषाढ वद्य १

रुपये २६०५॥·

बाकी ०

( 5 ) This is an account of money spent for the king through Yeshwantrao Potnis.

No 6] श्री

१२ मोहरम

फा. शु. १४।१६६४

फेब्रुआरी २६, १७४३

श्री सकलगुणालंकरण राजमान्य राजश्री

विश्वनाथभटबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक नारो हरी मौ फड माखजन कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुषल लिहित गेलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. सौभाग्यादिसंपन अनुबाईची रवानगी केली आसे. वोझली[1] वेठे सा दिले आसेत. शिपाई पावावयासि[2] द्यांव, त्यास सिरके यांचें आमचें लागलें[3] आसे. याजकरितां सिपाई दिले नाहीं. कळलें पाहिजे. यानंतर आम्हांकारणें मोत्यांची जोडी पधरा रुपयांत पाठविली पाहिजे. रुपये रा राघोबा नाईकाजवळ देऊन जोडी पाठवावयासी अनमान न करावा. रुपयांविसीं चिंता न करावी. जोडी आम्हाजवळ पावतांच रुपये देऊन. कळलें पाहिजे. कदाचित् सिरके धराधर करितील याजकरिता लिहिलें आसे, बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे रा छ १२ मोहरम हे विनंती.

१ ओझें वाहणारा. २ पोचवावयास ३ जुंपलें.

( 6 ) Naro Hari of Phada Makhajan writes to Vishwanathbhat that S. Anubai is sent with six labourers to carry her baggage. He wanted a pair of pearls which he wished Raghoba Naik to bring with him. Naro Hari feared that Shirke with whomhe was not on good terms, might capture him.

No 7 ] श्री

फा. व. ६।१६६४

मार्च ५, १७४३

[1]रवासुदगी कामगारी रुये सु॥ सलास आर्बैन मया व आलफ, छ १९ मोहरम ऊर्फ फालगुन वद्य ६ संकराजी गोविंद परांजपे वराता रुये.

२० त्रिंबक विश्वनाथ केतकर सुभेदार प्रां वराड

४० कृष्णाजी नारायण पालेकर का॥ निर्मल

४२ महादाजी कृष्ण व हरी कृष्ण काणे सु॥ प्रां वराड

मु॥ उंबरखेड

३० संकराजी गोविंद यासि देणें म्हणून

१२ जासूद नि॥ सरलस्कर

६ रखमाजी सिंदे जासूद

६ पिलाजी कलसकर जासूद

१२

———

४२

१०२

१ नक्कीचा जमाखर्च.

---

( 7 ) Cash account of the money paid by Shankaraji Govind Paranjape to the subordinates of well known persons. Here Trimbak Vishwanath Ketkar is mentioned as Subhedar of Varad.

फा. व. ११।१६६४

मार्च १०, १७४३

No. 8 ] श्री

राजश्री विश्वनाथभट वैद्य

गोसावी यासी.

[illegible] अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो गोपाळराव शिंदे राम

माद प्रांत मजिरे सुवर्णदुर्ग कृतानेक रामराम विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. गोसावी यांहीं पत्र पाठविलें तें पावोन बहुत समाधान जालें. या प्रकारें सर्व आपणाकडील कुशलोतर लेखन करून स्नेहाभिवृधि केली पाहिजे. यानंतर राजकी वर्तमान लिा प्रमाणें साकल्य कलों आलें. खबरदारीविशीं लेहून पाठविलें, त्यास खबरदारी करणें तें करीतच असो. दरबारचें वर्तमान वरचेवर कलावें, याकरितां आपणास पत्र पाठविलें आहे. तर दरबारचें वर्तमान काय व बाणकोट बसवावयाचा मजकूर व घाटगे याची उभारणी कैसी होणार, याचा साद्यंत अर्थ लेहून पाठविला पाहिजे. इकडील मामलियाचा अगत्यबाद यामार्गे धरित आलेस, त्याप्रमाणें पुढें ही धरून वर्तमान लेहून पाठवीत गेलें पाहिजे, येविसींचा आगत्यबाद गोसावी यांस पूर्वीपासून आहे. तेथें विस्तारें ल्याहावें ऐसें नाहीं. राजश्री नाना पायचा[१] जमाव करून कोणे मुदेयावर कोणीकडेस जाणार याचा मजकूर लिहिला पाहिजे. बहुत काय लिहिणें. कृपा लोभ असो दीजे. रा छ २५ माहे मोहरम हे विनंति

१ पायदळाचा

( 8 ) Motyajirao Vichare of Suvarnadurg makes inquiries with Vishwanathbhat about the new settlement of Banakot and Krishnaji Ghatge's future plans. He also wants to know the plan of invasion of Nanasaheb in the near future.

No 9 ] श्री+रामचंद्र

चैत्र. । १६६५

एप्रिल, १७४१

सकळगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री

बाळंभट व राजश्री विस्वनाथ भट वैद्य

स्वामी गोसावी यासी.

पोष्य भगवंतराऊ रामचंद्र कृतानेक नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन करीत गेलें पाहिजे विशेष तुम्हीं रा संभाजी

पळवळ याची पत्र पा तें पावलें, लिहिलें वर्तमान कळों आलें. माहाराज राजश्री छत्रपति साहेबांचे सेवेसी वारंवार अर्ज केला, विनंतीपत्रें पा, परंतु दाद मनसुभी नाहीं. अवघीं निमित्यें आम्हा चाकर लोकांवर समर्थपणें घणी ठेवीत आहेत.[१] परीक्षा वज पासून दरबारीं नाहीं, कैलासवासी राजश्री भास्करबावा यांणीं अभिमान धरून आमचें सारथ्य केलें, त्याज मागें तुमचा भरवसा धरिला, आशा धरली; परंतु कांहीं सार्थक नाहीं. कागदपत्रीं बोलींचालींत गोड यैकावें. दोनच्यार वेळा राजदर्शन जालें, मुलेंमाणसें आदिकरून पाठविलीं; परंतु माहाराजांनीं सुखदुख काहीं पुसिलें नाहीं. तुम्हीं शफतपूर्वक आम्हांस वचन दिलें. त्याचाही परिणाम नाहीं. माहाराज राजे समर्थ, अनदाते, याजस्तव आम्ही चाकर लोक आशा धरून सनिध धावोन जात आहों. तीनच्यार पिढ्या या राज्यांत सेवा करून आमची दाद नव्हे. तेव्हां आम्ही ब्राम्हण, लोकीं इलाज काय करावे ? श्रीकृष्णास्नान व येक वेळ दर्शनाचा हेत आहे. हा मनोदय सिधीस आपण नेला पाहिजे. +दया करावी. बाणकोट पाडिला होता, माहाराजांची दुराई[२] घातली असतां आंगरे यानें दुराई[२] मोडून मा(बां)धिला हे विनंति पर हुजुर+

१ पादपूर्णार्थी अव्यय. २शपथ, हरकत. + मधील अक्षर भगवंतरावाचें.

( 9 ) Bhagwantrao Amatya describes his woeful condition to Vaidya brothers and expresses his desire to see them at Wai. At this time Tuloji Angre had taken Bankot. He dismantled and rebuilt it against the wishes of the King. He praised Bhaskarbhat Vaidya for having taken interest in his well-being. This shows that Vaidya family had been long in intimate relations with the Amatya family.

No 10 ] श्री

चैत्र । १६६५
एप्रिल, १७४३

वेदशास्त्र संपन राजश्री विश्वनाथ भट
स्वामी गोसावी यांसी.

सेवक मोत्याजीराव विचारे दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत गेलें पाहिजे. यानंतर कृष्णाजी घाटगे ते स्थलीं गेलेयावर काये मनसबा योजिली व बाणकोट वसवणार म्हो[1] बाजार आवना[2] खबर होती, याचें तथ्य वर्तमान कलत नाहीं. यास्तव रामजी सिगवण पाठविला असे. तर काये वर्तमान तें सविस्तर लेहून पाठविलें पाहिजे. बहुत काये लि॥. लोभास अंतर न करावें. हे विनंती. अनाजी साटम विजेदुर्ग प्रांतीं मुलकांत अवाडाव[3] करावी म्हो जाणार होता, त्याचें वृत्त मनास आणून लेहून पाठविलें पाहिजे. हे विनंती.

---

१ म्हणून. २ अफवा. ३ लुटारूपणा.

( 10 ) Motyajirao Vichare writes to Vishwanath bhat, requesting to send any news about the Settlement of Bankot and the troublesome movements of Anaji Satam in the province of Vijayadurga and Krishnaji Ghadge's further plans

No 11 ] श्री ५ रावल

तुळाजीचा शिक्का व मोर्तब — वैशाख शुद्ध ७ । १६६५

पद्मदलसम दुहेरी — एप्रिल १९, १७४३

राजश्री बाळंभट व विश्वनाथभट वैद्य गोसावी यांसी

दा॥ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो तुळाजी आंगरे

श्री शाहू नृप हर्षेण कानोजी त नुजन्मनः तुळ सिंहस्य मुद्रेयं सर्वो त्कर्षेण राजते.

रामराम. विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखणार्थ अवगत जाहाला. बाणकोट जागा वसविला म्हणोन राजश्री स्वामींनीं फौजा रवाना करावयाची आज्ञा केली आहे, तरी तेथील बंदोबस्त करावा म्हणोन लिहिलें, त्यावरून कळों आलें. येशास बाणकोट जागा वसविल्याचा अर्थ सविस्तर मिराखान या बराबरीं लेहून पाठविला आहे, त्यावरून साद्यंत अर्थ कळलाच असेल. बाणकोट जागा धरावयास

प्रयोजन हेंच कीं, याभागें येकदोन वेळ शामलानें जागा वसविला, तेव्हां आम्हांकडील जमाव जाऊन जागा हस्तगत करावा लागला. आलीकडे पेशवेयांकडील ते जागा जाऊन राहिले होते. परंतु शामलानें लगट करून जागा घेतला, आणि पेशवे यांचा जमाव खाडीभरवण केला. यावरी शामल जागा टाकून गेला. पांच च्यार वर्षें जागा वोस होता. प्रस्तुत शामलानें अरमार व जमाव तयार करून घाटगा जागा वसविणार, हें वर्तमान राजपुरीस बातमी नेऊन तेथून जमावसुद्धां यावें येैसा शामलान करार केला. हें वर्तमान जंजिरे विजयदुर्गास कलतांच विचारें करून पाहातां शामलानें जागा वसविल्यास पुढें भारी होईल हा अर्थ चित्तांत आणून आरमार सुधां जमावानिसी खासा स्वारी जंजिरे सुवर्णदुर्गी होऊन तेथून बाणकोटास जाऊन जागा अवलोकन करून इमारत चालीस लाविली. येणें करून शामलही आपले जागा बलखुद राहिला. प्रस्तुत तुम्ही लिहिलें कीं, राजश्री स्वामीं(नीं) जागा घाटगे याचे स्वाधीन केला, यावरून अपूर्व भासलें. सुवर्णदुर्ग मामिला स्वामींचा. त्या मामलियांत बाणकोटासारिखा जागा नाजूक. तेथें घाटगे राहोन परिणाम लागेल, हा विचार कलतच आहे. शामला-

सारिखा श (त्रु) हातघेौडयावरी[१] खाडी पलीकडे जमाव असतां घाटगे त्यांत जागा टिकाव धरून राहोत. हा अर्थ तुम्हांस समजलाच असेल. आज बारा वर्षें अंजनवेल गोवलकोट येथील मोहीम होत आहे. तोच विचार सर्वांस भारी जाहाला आहे, आणि हा जागा तिसरा शामल वसविल्यास कोठपर्यंत मात चालेल? माहाड, रायगड वरकड किले, राज्यांतील महास्थलें, त्यांस केवल हृदयशल्य होतें. हा अर्थ समजोन तीन च्यार हजार जमाव ते जागा ठेवून व अरमार नस्तावरी[२] नांगरवाडा[३] करून इमारतींचें काम लगटानें चालविलें आहे. हें सविस्तर तुम्हांस कलावें, याकारितां हें पत्र लेहून देऊन राजश्री जगनाथ आवजी पाठविलें आहेत. हे तेथील सविस्तर वृत्त तुम्हांस सांगतील, त्याप्रमाणें मनन करून राजश्री स्वामीचे सेवेसी विनंती करून जे कोणी या जाग्याचे दुराग्रहकर्ते असतील त्यांस ताकीद करून खालीं कोकणांत वलवल न करीत तो अर्थ केला पाहिजे. वरकड राजश्री स्वामींचा निशा करणें तसा वेगले वाटेनें करून हा साकल्य अर्थ समजाऊन बदनिशा न होये तो विचार केला पाहिजे. दरबारीं आम्हांकडील तुम्हांसारिखे वकील असतां कोणेयेक गोष्टीचा विचार होऊन द्यावा. येविषीचा

अर्थे कितेक सांगणें तो रा। जगनाथ आवजी यांजवळ सांगीतला आहे, हे सांगतील, त्यावरून कलेल. बहुत काय लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे. रा। छ ५ माहे रबिलावल हे विनंती. ( लेखन सिमा ).

---

१ हातानें दगड फेकला जाईल इतके अंतर. २ खाडीच्या मुखाशीं असलेला वाळूचा दांडा. ३ नांगर टाकण्याचें स्थान, बंदर.

( 11 ) This is a letter written by Tulaji Angre to Vaidya brothers describing his just attitude towards capturing and settling at Banakot He advises them that they should make the Chhatrapati understand that Ghateg will not do anything in his interest and if he comes down, he will be opposed by him. He sent Jagannath Awaji to explain his position to them.

NO 12 ]

१६ रालावल
वै. व. ३।१६६५
एप्रिल ३०,१७४३

राजश्री विसाजी रघुनाथ वकील

गोसावी यांसी.

दा। अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो। रघोजी भोसले सेनासाहेबसुभा XXXX करून माल सायेर जकाती कुलबाब कुलकानू देखील पटी पटियांत आकार होईल, त्या पैकीं महाल मजकूर ठाणे सिबंदी सनदेप्रो वजा करून, उरला येवज सरकारांचा तुमच्या रदकर्जी देविला असे.

...छ. १६ माहे रबिलावल बहुत काये लिहिणें हे विनंती ( मोर्तब सुद ).

पैवस्ता झुलाजी जगन्नाथ

गुा केसोजी

( 12 ) This contains the rights of villages given to Vishwanathbhat by Raghuji Bhosle in consideration of debt

No. 13 ]  श्री

वैशाख १६६५

मे १७४३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **विश्वनाथ बाबा**

स्वामी गोसावी यास—

पो **शिवराम तुकदेव** सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशललेखन केलें पाहिजे. यानंतर आपण दाणियाविसीं सांगितलें त्यास दाणे सिघ करून ठेविले आहेत. तरी कोठी पाठऊन द्यावी. दाणे न्यावे. पावशाळा समीप आला. मग दाणे जावयाचें संकट. येथें साठवण नाहीं, तरी लौकर कोठी येईसें करावें. **तंडवडीचा** सुतार आला आहे. दिवस लावणीचा हंगाम. तरी पंधरा दिवसाचे भरतीचे दिवस जे उणे असतील तें काम घेऊन निरोप द्यावा. बहुत काये लिहिणें कृपा असावी हे विनंती.

राजश्री **लक्ष्मणपंत** स्वामीस **बाजी भिकाजी** सां नमस्कार. बाबास लिा आहे त्या प्रों बैल पाठवावे. राजश्री सुभेदार पुण्यास लग्नास गेले आहेत. हे विनंती.

( 13 ) This is a letter of Shiwaram Tukadeo Kar markar from Karhati to Vishwanathbhat Vaidya requesting him to take away corn before the rainy season.

[ No 14 ]  श्री

वैशाख वद्य ९ । १६६५

मे ६ , १७४३

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री

**विश्वनाथ भट वैद्य** स्वामीचे सेवेसीं.

पोष्य **पुरुषोत्तम भट सेवडे** कृतानेक सां नमस्कार विनंति उपरी. येथील क्षेम ताा वैशाख वद्य ९ जाणून स्वकीये लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष मांग्न आपणाकडील पत्र येऊन कुशलार्थ कलो येत नाहीं. तरी येंसें न करणें. इरघडी पत्रीं परामृश करीत असिलें पाहिजे. यानंतर **चिरंजीव गोपाळ रघुनाथ** यांसि मागण्याचा तगादा लाविला आहे, म्हणून त्याणें येथें लिहिलें. तर च्यार रोज मागें पुढें लागतच आहे. येथून यैवज पाठवा‍ा तेव्हां तेथें द्यावा. अशास

येथून यैवज हातास आला म्हणजे परभारेंच हुंडी करून तुम्हांकडे पाठावतों. गोपाळ रघुनाथ यास तगादा न करणें. त्याची मदत आनखी दहापांच हजाराची करणें. दुसरे कोण्ही तगादा करतील तर त्यास तुम्ही समजाऊन वाटे लावणें. पैसा आमचे हातास आला म्हणजे येक घडी ठेवणार नाहीं. सर्व प्रकारें गोपाळाची मदत करीत गेले पाहिजे. श्रीमंत राजश्री राघोजीबाबा बंगाल्यास गेले. त्यास कटकचा किला घेतला. तेथें ठाणें देऊन बुलगे हजार तेथेंच ठेवून सडे फौजेनिसी पुढें गेले. तों आलाविर्दीनें मुस्तफाखान याजबरोबर दहा हजार फौज देऊन रवाना केला. आपण मागून मजल दरमजल चालिला. त्यास मुस्तफाखानासी गाठ पडली. लढाई जाहाली. त्याची फौज मोडून त्यास हस्तगत केला. दहा हजार फौज बुडविली. तेथून अलाबिर्दीसी गाठ घातली. यैसें वर्तमान आहे.[१] तहकीक आल्यानंतर लिहून पाठऊ. वरकड वर्तमान येथास्थित असे. तूर्त आम्ही नागपुरीं आहों, कळलें पाहिजे. बहुत काये लिहिणें. हे विनंती.

१ बातमी

( 14 ) Purushottambhat Shevde writes from Nagpur to Vishwanathbhat at Satara for the information of the Chhatrapati that Raghuji Bhosle having captured Cuttack and thereafter having encountered and defeated Mustafokhan who had an army of ten thousand and in a patched battle took the Khan as a prisoner. He then opposed Alibardikhan.

No 15 ] श्री गजानन जेष्ठ शु. १०।१६६५

मे. २२, १७४३

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६९ रुधिरोद्गारी नाम संवछेर जेष्ठ शुध दसमी भानु वासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाशाहू छत्रपति स्वामी यांणीं राजश्री बाळंभट वैद्य बिा रघुनाथभट वैद्य गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन यासि दिल्हें इनामपत्र ऐसीजे, तुम्हीं स्वामीसंनिध आहा तुमचे चालवणें आवश्यक जाणोन स्वामी तुम्हांवर कृपाळू होऊन मौजे कान्हाटी परगणे सुपे हा गाव पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हालीं तुम्हांस नूतन इनाम स्वराज्य व मोगलाई अमंल येकूण दुतर्फा

देखील इनाम तिजाई व बाबती चौथाई कुलबाब कुलकानू हालीपटी व पेस्तरपटी, खेरीज हकदार व इनामदार करून तुम्हांस व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम करून दिल्हा असे, तरी तुम्ही मौजे मजकूर चतु:सीमा पूर्वमर्यादा सदर्हू प्रमाणें आपले दुमाला करून घेऊन तुम्ही व तुमचे वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें. जाणिजे. लेखनालंकार

| १ | २ | ३ | ४ |
|---|---|---|---|
| रुजू सुरु- | संमत | सा। | सा। |
| —निविस | सुमंत | मंत्री | सरकार |

तेरीख ८ माहे रबिलाखर सुरुसन्नास आर्बेन मया आलफ

बार सुद सुरुसुद बार बार बार बार

---

१ सचिवांनी लिहिलेलें २ डबिरांनीं ( सुमंतांनीं ) लिहिलेलें ३ मंत्र्यांनीं ( वाकनिसांनीं ) लिहिलेलें ४ राजाज्ञाचें

( 15 ) This is a sanad of the village of Karhati, Dist. Poona, granted by Shahu Chhatrapati to Vaidya brothers as inam. There are also orders issued by him to Sachiv, Pant Pradhan, Mokadam of the villiage, Deshmukh and Deshpand, District Offficers, including clerks present and future. Those being of the same substance, are not printed seperately. The distinction in the language of the Sanad and order is explained in the introduction of volume 2. of vaidya dafter

No. 16 ] श्री ८ राखर

जे. शु १०।१६६५.

मे २२, १७४३

पुरवणी राजश्री तुळाजी आंगरे यासी उपरी. तुम्हांकारणें व सौभाग्यवती गिरजाबाई कारणें, वस्त्रें येणेंप्रमाणें गणेशपंत भिडा व गुणाजी आंबकर व मिराखान यांजबराबरीं

तुम्हां कारणें.

१ तिवट कुसुंबी

१ दुपटा बनोसी[1]

२

सौभाग्यवती गिरजाबाई कारणें.

१ पातळ कुसुंबी चौकडीदार राव्यांचे किनारा मोतेचूर

१ खण जामेवारी कुसुंबी

·।।· किनखाप किरमिजी बुटेदार

२।।

येकूण सणगें साडेचार रवाना केलीं आहेत. प्रविष्ट जालियांचें उत्तर पाठवणें. जाणिजे. छ ८ माहे रबिलाखर बहुत काये लिहिणें. (लेखनावधि )

१ फिक्या डाळिंबी रंगाचा. ( मोर्तब वाटोळा दुहेरी )

( 16 ) A list of dresses sent by Shahu to Tulaji Angre, for him and for his wife Girjabai with Ganeshpant Bhide, Gunaji Ambakar and Mirakhan.

No. 17 ] श्री

मोर्तब वाटोळा दुहेरी.

११ राखर

जेष्ट शुध १३।१६६५

मे २५, १७४३

अज सुभा राजश्री भिकाजी बलाल सुभेदार पा। सुपे दि।। राजश्री सरलस्कर ता। मोकदम मौजे तरडोली पा। मजकूर.

°श्री°
श्रीभवानीशं
कर चरणि तत्पर
बलाल सुतभि
काजी निरंतर

सु।। आर्बा आर्बैन मया आलफ. सुतार व कुंभार यैसे सातारियासी आणविले आसेत तर मौजे मजकुरचे कुंभार १ सुतार १ यैसे देखत रोखा सुभा पाठऊन देणें. या कामास हरजी साबले पाठविलें आहेत. यास मसाला रु।। ·।· पावला देविला आसे. आदा करणें जाणिजे. छ ११ रबिलाखर ( मोर्तब सुद )

( 17 ) Bhikaji Ballal Subhedar, a Mukhatyar of Appaji Somavansi, orders the Mokadam of Tardoli, Paragana Supa, to send a potter ( कुंभार ) and a

carpenter to Satara. There is another order of the same date to him to send Rasad of Rs. 4o and Jwari fodder of 500 sheaves.

No. 18 ] श्री

पत्रावर शिक्का व मोर्तब अष्टकोनी दुहेरी आहेत.

२२ रा़खर
ज्येष्ठ वा ९।१६६५
जून ५, १७४३

राजश्री बाळंभट व राजश्री विश्वनाथ भट वैद्य गोसावी यासी.

दा। अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नें॥ रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दण्डवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. बहुत दिवस तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान श्रवण होत नाहीं. याजकरितां चित सापेक्षित असे. तरी सविस्तरें कुशल वृत लेखन करून संतोषविलें पाहिजे. यानंतरें इकडील वर्तमान तरी गतवर्षी राजश्री भास्करराम फौजेसह वर्तमान मकसुदाबादेस जाऊन आला. बारदीखान यासी युद्धप्रसंग करून उपांत छावणी करून राहिले होते. त्याचे उपराळेयासी आम्ही फौजेसह वर्तमान मजल दरमजल श्री गयेसंन्निध गेलों, तों राजश्री बाळाजी पंडित प्रधान फौजसुधां तत्प्रांतीं आले, त्यांणी आम्हाकडे भले माणूस पाठविलें. त्याजवरून आम्ही त्यांचे भेटीस जाऊन कितेक बोलणेंचालणें परस्परें जाहलें. उप्रांत आम्ही राजश्री पंतप्रधान यांचा निरोप घेऊन मकसुदाबादेस ताम्राचे पारिपत्या निमित्य मजल दरमजल चालिलों, ते कटवागंजाचे मुक्कामीं श्री भागीरथीतीरास मकसुदाबाद बा ×× ते जागा मुक्काम केला. तो मोगला कडील राजकारण आलें जें, आम्हीं सलूख करितों, वाजवी अंमल देतों, असें राजकारण लागलें. इतकेयांत राजश्री पंतप्रधान फौजेसह वर्तमान मागाहून मकसुदाबादेनजीक येऊन संदर्भ लाविला आणि सांगोन पाठविलें कीं, आपण तुमचे कुमकेस आलों. येविसी पातशहाचा हुकूम आपणास आहे. तुम्ही आम्ही येकत्र होऊन गनीमास मुलकांतून बाहेर काढून देऊं. असा संदर्भ करून मोगलासीं सलुख संपादून मोगल व आपण येकत्र होऊन आम्हावर चालोन आले. हें वर्तमान सविस्तर आपणांस पेसजी लिहून पाठविलें

हात. त्यावरून श्रवण जाहलेंच असेल. त्यानंतर आम्ही फौजेसह वर्तमान रामगड बद्दामीचे नजीक आलों. राजश्री पंतप्रधान यांणी मोगलास मसुदाबादेस जावयास निरोप देऊन आपण पंचेटचे रोखें गयेचे मार्गें चालिले. त्यास निजामाकडील वकील मातबर माणूस राजश्री शेषराव, आलीबारदीखान याजपाशी आहे, त्यांचीं पत्रें आलीं जें, मोगलांचे चितांत तुम्हासी सलूख कराऱ्याचा आहे, याजकरितां राजश्री भास्करराम फौज समागमें फौज देऊन माघारें पाठविणें आणि तुम्ही देशास जाणें, असें लिहिलें आलें, त्याजवरून सडी फौज राजश्री भास्करराम याजसमागमें देऊन माघारे रवाना केले, फौज आणि आम्ही फौजेसह वर्तमान बुलगे सुद्धां बेंडूचे घाटानजीक आलों. दुसरें दिवसीं कूच करून बारी अडचण, याजकरितां आघाडीस होऊन घाट चढोन चार पाच कोस पुढें आलों. बुलगे[२] यांची रव[३] कांहीं घाट चढोन आली, कांही येत आहे, तों अगोदर राजश्री पंतप्रधान यांणीं रात्रीस लांब मजल करून बारीनजीक[४] येऊन बुलगे याचे पछाडीवर घातले ते समयी आम्हाकडील लोक बारीमध्यें होते, त्याची याची कटकट जाहली. सेदोनशे घोडेमाणूस जाया केलें. हें वर्तमान आम्हांस पोचतांच माघारें फिरोन बारीपर्यंत आलों. तों त्यांची व आपले लोकांची झटपट होऊन त्यास बारीखालें मारून घातलें, तों दिवस थोडका राहिला, तेव्हां माघारें फिरोन लष्करचा मुक्काम होता ते जागा आलों. याप्रकारें त्यांणी दंगा आरंभिला होता. हें सविस्तर वर्तमान राजश्री स्वामीचे सेवेसी लिहिलें आहे. त्यावरून कळों येईल. प्रस्तुत आम्ही फौजेसह वर्तमान मजल दरमजल नागपुरास आलों तुम्हास कळावें याजकरितां लिहीलें असे. रवाना छ २२ माहे रबिलाकर. +बहुत काये लिहिणें लोभ असो दीजे, हे विनंती.+( मोर्तब सुद )

१ सहाय २ सैन्यसंभार ३ रांग ४ घोक्याची खिंड. +मधील मजकूर रघूजीचे हातचा

( 18 ) This is an important letter in which Raghuji Bhosle communicates from Nagpur to the Vaidya brothers, the details of his own and the Peshwa's movements in the regions of Bengal and Murshidabad. The mutual dealings and fights between the two during the summar months of 1742 are graphically narrated here.

No. 19 ] श्री आषाढ १६६५

जून १७४३

राजमान्य राजश्री तुळाजी आंगरे यांस आज्ञा केली ऐसीजे राजश्री बाळंभट व विश्वनाथभट वैद्य यास, पूर्वी भातगाव ता॥ वेलंब हा गाव इनाम देऊन चालवावयाविशीं तुम्हांस आज्ञापत्र सादर केलें असतां अद्यापि चालत नाहीं म्हणोन विदित जालें. तरी स्वामीस औशध उपायें करून आरोग्य केलें तन्मुळें इनाम दिल्हा. तो तुम्ही नचालवावा हें तुम्हांस उचित नाहीं. यांचें सर्व प्रकारें अगत्य स्वामीस आहे, हें तुम्ही जाणतच आहा. तुम्हांस ही अवश्यक आहेच, तरी या उपरी मौजे मजकूर मारनिलेस अविछिन्न चालऊन बोभाट हुजूर न येते गोष्टी करणें. जाणिजे. + बहुत काय लिहिन. +

---

+ मधील मजकूर छत्रपतींच्या हातचा.

( 19 ) In this Shahu reprimands Tulaji for having raised some difficulties for the enjoyment of the inam of Bhatgaon by the Vaidya brothers, though the Sanad and its copy had been sent to him before. It was given to them for giving good medicine when the King was ill

No. 20 ] श्रीरामचंद्र

आषाढ १६६५

जून १७४३

सकळगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री

बाळभट व राजश्री विश्वनाथ भट वैद्य

स्वामी गोसावी यांसी.

पोष्य भगवंतराऊ रामचंद्र कृतानेक नमस्कार. विनंती. उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये लिहिणें. विशेष तुम्ही देवजी पवार व सिदू सूर्यवंसी याचे दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिलें वर्तमान कळों आलें. आपण आमचे मध्यस्त फडीं दरबारीं आहेत. आमचें कल्याण ऊर्जित होय, तो अर्थ करावा. कोलापुरचे महाराज व सौ बाईसाहेब व राजश्री आर्जोजी यादव आमच्या अपायावर आहेत, अंतर करणार नाहींत. तुम्ही महाराजाजवळ अर्ज

विनंती करीत जाणें. राजश्री तुळाजी आंगरे हुजूर कधीं येणार ? मनसबा विचार काय जाला आहे ! हें सविस्तर लिहिणें+ बहुत काय लिहिणें. आपले वडिलांचे व आपलें इमान शफत जतन करणें. हुदा व सरंजाम करून देणें. चिरंजीव मुलास हातीं धरणें. येश कीर्ति करणें. नाहींतर जनलोक तुम्हांस हासतील, येसें आहे. कृपा करणें हे विनंतीपर हुजुल.

---

+ पुढील मजकूर भगवंतरायाच्या हातचा.

( 20 ) Bhagwantrao Amatya asks Vaidya brothers to use their influence for his watan with shahu. Sambhaji of Kolapur, Jijabai, his wife and Arjoji Yadav were bent upon doing him harm. He wanted to know whether Tuloji Angre arrived at Satara and what happened

No. 21 ] श्री

आषाढ शके १६६५

जून सन १७४३

तुम्हीं पत्रें पा तीं पा. लिहिलें वर्तमान कळों आलें. रा त्रिंबक विश्वनाथाचा मजकूर लिहिला, त्यास रा स्वामीस विदित केला त्यास राजेश्रीचा आग्रह आहे कीं, त्यास सोडून घ्यावा. परंतु तुम्ही लिहिलेत. याज करितां विचारें करून हुजरे यांस चार रोज तखुब करविले आहे. त्यास तुम्हीं बावास लिहून पाठवून, सोडावयाचा विचार करणें. येथें आम्ही चार रोज लांबणीवर घालतों; परंतु स्वामींचा फारच निकर्ष जाला तर सोडून द्यावा लागेल. त्यास येथून आमचें पत्र गेलें म्हणजे सोडून द्यावा लागेल. जेथवर ओढल तेथवर ओढितों. फारच निकर्ष केला तर तैसेंच लिहोन पाठवितों. मग त्या बारिवा विचार करून सोडून द्यावा. आम्हीं येथें कबूल केलियावर लबाडी आमच्या पदरास न ये तें करणें. वरकड रा पंतप्रधान यांजकडील व रा फतेसिंग बावा कडील व दरबारचा मजकूर सविस्तर रा या जवळ सांगितला आहे हे सांगतील, त्याजवरून कळेल. रा बावाकडे दोन तीन जोड्या मुजरद वर्तमान लिहोन वरचेवर पा व तुम्हीही त्यांचे उपराळेयावर त्या रोखे जावयाचें करणें रा पंतप्रधान यांणीं दुरबुधीवर आहेत. याजकरितां वरचेवर बावास लिहिणें कीं, बहुत सावधपणें देशास येणें. अैशीं पत्रें वारंवार लिहिणें. वरकड सविस्तर वर्तमान जें, होईल तें मागाहोन लिहोन पाठवितों. तुम्हीं आपणा-

कडील सविस्तर वरचेवर लिहीत जावें. म्हणजे येथें जापस्वाल होईल तेथें रा स्वामीकडून प्रधानपंतास ताकीद केली आहे. आनखीही वरचेवर करावितों; परंतु ते आपले विचारास चुकणार नाहीं. याजकरितां बहुत सावधपणें असावें.

त्रिसुद

---

१ सहाय

(21) The whole letter is written by Vishwanathbhat in his kund own probably to his clerk He intorms the addressee that the Psshwa may do harm to Raghuji who should, therefore, be warned to come to Satarawith great caution. If the king is very obstinate in releasing Tryambak Wishwanath, Raghuji wiill have to send him.

No 22 ] श्री+रामचंद्र

आषाढ १६६५
जुलै १७४३

पुरवणी राजश्री बाळंभट व राजश्री विश्वनाथभट वैद्य
स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. तुम्ही व राजश्री सिवाजी हरी बैसोन राजश्री सिवाजीपंत व राघोजी पडवळ यांजवळ कितेक मनसबियाची बोली सांगितली होती. येसियासी श्रावणमास आला पुढें ये गोष्टीचा विचार काय योजिला आहे, राजश्री तुळाजी आंगरे सरखेल याजकडून राजश्री विसाजीपंत व रा गंगाधर नाईक हुजूर सातारियासी गेले आहेत. बोलीचालीचा मजकूर कळलाच असेल
१
तुम्ही मानिले उभयता जवळ बोली केली आहे याचा दढाव असिला तरी तैसेंच उतर पाठवणें, म्हणजे रा सिवाजीपंत यासी पाठवून देऊं. तुम्हास व राजश्री सिवाजी हरी यांसी ये गोष्टीचें आगत्य असिलें तरी दिवाणचें पत्र निश्चयरूप पाठवून देणें. +बहुत काय लिहिणें. आंगरे व सावंत कुडाळकर कोकणांत सबळ लक्ष्मीवंत आहेत, वरघाटे यादव सबळ आहेत. त्यांजवर धणी यांची सत्ता, स्वामित्व चालत नाहीं. आम्ही ब्राह्मण निर्बळी पाहून यादव आम्हावर सता

करीत आहेत, कोणास दुख सांगावें ? श्री देवास संकट आमचें पडलें आहे, तो धावा करील. चहूंकडे अंधकार पडिला आहे. कृपा करणें हे विनंतीपर हुजूर+

---

१ बळकटी. + मधील अक्षर लेखकाचें.

(22) Bhagwantrao Amatya writes to Vaidya brothers inquiring of the wfesult of the interview of Visajipant and Gangadharpant sent by Tulaji Angre to Shahu. Angre and Savant Kudalkar are in the Kokan, but Arjoji Yadav and Chikodikar being powerful, are not loyal to Shahu, and Brahmins being powerless are troubled by Arjoji Yadav Only God will save them.

No 23 ] श्रीरामचंद्र

आषाढ १६६५

जुलै १७४३

सकलगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री

बाळंभट व रा विस्वना(थ) भट वैद्य स्वामी

गोसावी यांसी.

पोष्य भगवंराऊ रामचंद्र कृत्तानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत जाणें. विशेष तुम्हां देवजी पवार याबा पत्र पाठविलें तें पावलें, लिहिलें वर्तमान काळों आलें. आम्ही उदंड. दरबारांत धणीयांसी व तुम्हांस लिहिलें, तथापि राज्यांत दाद मनसुबी नाही. कालमहिमा यैसाच आला आहे. राजश्री बाबू नाईक यासी हुद्दा सरंजाम देतील. × × × × कुंदगोळचें ठाणें बाबूनाईक यांचें होतें, तें नबाबानें घेतलें. रा अण्णाजी परज कितुरास गेले. यैसा मनसबा जाला. राजश्री अर्जोजी यादव याजकडील फभू चिकोडी प्रांतें स्वारीस गेले होते. कागलकर व चिकोडीकर येकत्र होऊन जुंज दिल्हे. अर्जोजी यादव याकडील फौज थोरातांची मोडली पंचवीस तीस घोडीं गेलीं व हत्यारें गेलीं व लोक जाया झाले. पुढें काय मनसबा होईल तो पाहावा. राजश्री सिवाजीपंत पाठविले ते पावलेच असतील. *उभयेता राज्यांतील उभयेतां प्रतिनिधी येकत्र जाले आहेत. मनसबा होईल तो कळेल. राजश्री बळवंतराऊ

प्रधान येतील. सर्व गोष्टीनें सबळ आहेत. जें मनावर घेतील तें करितील. रा बाबूनाईक या जवळ टका आहे. द्रव्यबळें जें करितील तें होईल. आंगरे व सावंत कोकणांत सबळ आहेत. या राज्यांत यादव दिवाणचे आश्रयें सबळ आहेत. काटक आपले, बळें सबळ आहेत पाहाता. आम्हांस कोणी आधार, आशा, नाथ कोणी नाहीं. ब्राह्मण निर्वली आहों. श्री देवाचा आधार आहे तो धावा करून आमचे संकट निवारण करील. सर्वांचे आर्जव केले; परंतु कांहीं सार्थक नाहीं. बैलाचे गरजू लोक आहेत. कृपा करणें हे विनंतीपर. पानें व पोफळें, नारळ नवरात्रांस पो आहेत. धेणें. हुजुर. *

* मधील अक्षर लेखकाचें.

( 23 ) Bhagwantrao Amatya writes to Vaidya brothers the following incidents (i) Babuji Naik Joshi was defeated by Nizam, but he possesses riches. (ii) Arjoji Yadav's army was completely destroyed by Yamajipant Chikodikar and Kagalkar but he is supported by the King of Kolhapur. (iii) The Pratinidhis of both Kolhapur and Satara and Nanasaheb have joined together (iv) In Kokan Angre and Savant are powerful. He is not helped by any of these and hence relying on the favour of God.

No. 24 ] श्री

आषाढ व. १२ । १६६५
जुलै ७, १७४३

यादी

| | |
|---|---|
| मकसुदाबाद | मालवा |
| पटणें | प्रयाग |
| लखनऊ | आंगरे |
| | अजमेर |

यादी तह पटणेपैकीं करोड रुपये तनखा जाहाले, तर तीन लक्ष रुपयांचे घ्यावे. कमी जाहाले तरी वाटणी प्रा॥ घ्यावे. दोन वरसें त्या प्रांतें त्यांची फौज

जाऊं नये. कागदपत्र पाटऊन फितुर करूं नये. अंतरवेदी प्रयागची असेल तरी त्यांणी खावी, आणि प्रयागाखेरीज आहे ती आम्ही खावी. गडेमंडळे निराळें संस्थान जाहालें तरी दरोबस्त आम्ही खावें. मावला जाहाला तरी बाकी सरदेशमुखी चौ आपण खावी आणि मोगलाई त्यांणी खाई. नेमाड व बडेसरकार व मवाडाई यांत त्यांणीं आपला वाजवी पैसा घ्यावा. तहाखेरीज घेऊं नये. कुमक परभारें येकमेकांची येवमेकांनीं करावी. परमुलकी कजिया करूं नये. पटण्यास जावयासी मार्गींचे माहाल चार आहेत ते घ्यावे. मकसुदाबाज व पटणे व लखनाऊ या मुलुकांत पातशहाची वरात घेऊं नये, दाखलगिरी एकंदर करूं नये. [illegible] अमल करावा. अगोदर मुलुकात कागद पत्र उपसर्ग करू नये.

( 24 ) This is a draft of the treaty defining the spheres assigned by the King to the management of Raghuji Bhosle and the Peshwa. An important document indeed.

No 25 ] श्री

शिक्का व मोर्तब पत्राबर आहे. २५ जाबल

आषाढ वद्य १२ । १६६५

जुलै ७, १७४३

राजश्री बाळंभट व विश्वनाथ भट वैद्य गोसावी यांसी.

सकलगुणालंकरण अखंडीतलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री तुळाजी आंग्रे सरखेल रामराम विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष पत्र पाठाविलें. प्रविष्ट होऊन वर्तमान श्रवण जाहालें. दरबारीं कितेकानीं घालमेल करून सौसंपत्र बाईसाहेबांची मर्जी येकप्रकारें विपर्यासें केली आहे म्हणोन लिहिलें. येशास हा मनसुबा सर्वस्वें बाईसाहेबांचाच आहे. तुम्ही वरचेवरी विनंती करणें ते करिजेत आहां. त्याप्रमाणें नित्य देवढीस[1] जाऊन येकनिष्ठतेच्या अर्थे विज्ञापना करीत असावें. अधिकोत्तर वर्तमान असेल तें वरचेवरी लेखन करावें. राजश्री येमाजी पंत व अंताजी सिवदेव सातारा आले. खाली धामधूम करावयाचा आदर आहे म्हणोन लिहिलें, तरी खालीं धामधूम

करणें हीं कार्यें भले मर्दांचीं आहेत. ज्या ज्यांचे मनोदये असतील त्यांनीं आपला निशा करून घ्यावा. येविशीं कोणास गणनेंतही आणीत नाहीं. तथापिहीमध्यें या प्रांतीं प्रजा म्हणाची तरी भूदेव समोह. वरकड किले कोटाचा विचार जगप्रसिद्ध आहे. दरबारीं अधिकोत्तर वर्तमान आढळेल तें वरचेवरी लिहीत असिलें पाहिजे. दल आणि सुपारी येक खंडी उत्तम जंजिरे सुवर्णदुर्गाहून रवानगी करविली आहे. वरकड पोलपाट व पाट व काटवटी मुसळाचे सर व फणसपोली याप्रमाणें सामान पाठविलें असे. रुजू केलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे. रवाना छ २५ माहे जमादिलावल. हे विनंती. शिक्कातुळाजीचा ( यांत सरखेलीचा उल्लेख नाहीं ) ( लेखनसीमा. )

---

१ राणीकडे

( 25 ) This is an important document which discloses the naughty nature of Tuloji Angre, who asks the Vaidya brothers to explain properly to the queen, the services, he was rendering and to remove her displeasure. He threatens Yamajipunt and Antaji Shiwadeo with severe reprisals, for their encroachments. This shows his readiness to oppose them.

No. 26 ] श्री

शिक्का व मोर्तब अष्टकोनी दुहेरी

१ जाखर

भा. शु २।१६६५

जुलै १२,४३

राजश्री बाळंभट व राजश्री विश्वनाथभट

वैद्य गोसावी यांसी.

दा। अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो। रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. आम्ही बंगाले प्रांते जातेसमई चिरंजीव राजश्री जानोजी भोसले यासी वराड व देवगड प्रांताच्या बंदोबस्ता निमित्य ठेऊन तत्प्रांतीं गेलों. मागें राजश्री त्रिंबक विश्वनाथ यांणीं वराड प्रांतें येऊन बहुतच उपसर्ग आरंभिला. याजकरितां आमच्या लोकांसीं व मारनिलेसी हर्षामर्ष होऊन कजिया वाढला;

त्यामुळें मारनिले धरिले गेले. त्यास न्यावयाबद्दल राजश्री स्वामींची आज्ञा घेऊन हुजरे आले. त्यास मारनिलेकडे आमचा हिसेब मागील येणें, त्याचा निकाल त्यांणीं हा कालवर केला नाहीं. त्याजकडे गुंता तैसाच राहिला. यास्तव यांणीं ठेऊन घेतले. तों आमचें येणें नागपुरास जालें. हुजरे यांणीं त्रिंबक विश्वनाथ यांसि हुजूर न्यावयाचा अतीशय केला. हिसेबाच्या गुंत्याकरितां त्यांस ठेऊन हुजूर न पाठवावें, तरी राजश्री स्वामींची आज्ञा उलंघवत नाहीं. याजकरितां त्रिंबक विश्वनाथ यांसी हुजरेयासमागमें देऊन हुजूर रवाना केलें आहेत. परंतु हिसेबाचा गुंता त्यांजकडे तैसाच राहिला आहे. त्याचा निकाल करावा हें त्यांचे चितांत येत नाहीं. तरी मारनिले हुजूर पावलियावर राजश्री स्वामीस विनंति करून मारनिलेसमागती आम्हाकडे रवाना करणें. हिसेबाचा गुता आमचा उरकोन देऊन त्यांणीं मनमानें तेथें राहिल्यास आम्हाकडील उपसर्ग लागणार नाहीं. राजश्री स्वामींच्या पत्रीं तुमचे व राजश्री बऱ्हाणजी बावाचे मुखवचनावर मजकूर टाकून विनंतिपत्र लिहिलें आहे, हें स्वामींच्या कानावर घालून उत्तर पाठविलें पाहिजे. रा छ १ जमादिलाखर+ बहुत काये लिहिणें. लोभ असूं देणें हे विनंति.

( मोर्तब सुद )

---

+ पुढील अक्षर रघूजीचें.

( 26 ) Raghuji Bhosle from Nagpur, earnestly requests the Vaidya brothers to explain to the Chhatrapati the details o? the high handed dealings of Trimbak Vishwanath and to send him back to have the dispute settled to the writer's'satisfaction.

No. 27 ] श्री श्रावण शुध ३।१६६५

जुलै १३, १७४३

स्वास्तिश्री राज्याभिषेक शके ७० रुधिरोद्गारी संवत्छरे श्रावण शु॥ ३ तृतिया सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणीं राजेश्री बाळंभट व विश्वनाथ भट बिन रघुनाथ भट वैद्य गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन यास शिक्का दिल्हें इनामपत्र येसें जें, तुमचें चालविणें आवश्यक जाणोन स्वामी छत्रपतींचा तुम्हावर कृपाळी होऊन मोजे कासारी ता॥ सैतवडे प्रांत राजापूर हा गांव पेशजीच्या मोकासियाकडून दूर करून हालीं कुलबाब कुलकानू,

देखील इनाम तिजाई, हालीपटी व पेस्तरपटी, खेरीज हकदार व इनामदार, तुम्हांस व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें नूतन इनाम करून दिल्हा आसे. तर तुम्ही मोजे मार चतुःशोमा पूर्वेमर्यादेप्रमाणें आपला दुमाला करून घेऊन तुम्ही व तुमचे वशपरंपरेनें इनाम अनभऊन सुखरूप राहणें जाणिजे. लेखनालंकार.

तेरीख छ २ माहे जमादिलाकर सूर सन आर्वा आर्बैन मया आलफ. बारसुद सुरूसुर बार बार बार बार.

( 27 ) This is an inam Sanad of Kasari village, granted by Shahu to Vaidya brothers. There are also orders issued by him and containing the same matter, with an addition of a clause at the end that after taking a copy of this, it should be returned to the Vaidyas.These orders, being of the same substance, are in the Daftar but hence not printed. they are issued to. १ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी. २ मोकदमानी ३ देशमुख व देशपांडे ४ तुळोजी आंग्रे.

No 28 ] श्री

१५ जाखर

श्रा. व. १ । १६६५

जुलै २६, १७४३

राजश्री विसाजी रघुनाथ

गोसावी यांसी

दा। अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री मोत्याजीराव विचारे नामजाद प्रांत जंजिरे सुवर्णदुर्ग. रामराम विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष सुपारी येक खंडी माहाराज स्वामी कडे रवाना करावी. तुम्ही समागमें जाऊन दरबारीं स्वामींचे सेवेसी रुजू करावी, म्हणून हुजुरून खावंदाची आज्ञा जंजिरा आली. त्यावरून वेठेया वरून भरीत खलेते १५ येकूण, सुपारी वजन खरें खंडी १ येक खंडी रवाना केली असे. सुभानजी जगथाप याजबा पाठविली आहे. आपणाजवल प्रविष्ट जाहाल्यावरी यास समागमें घेऊन

माहाराज स्वामीचे सेवेसी सन्निध रुजू करून उत्तर देऊन सुभानजीची रवानगी केली पाहिजे. यानंतर बहुत दिवस पत्रीं वृत्त लिहीत नाहीं तरी हाली सविस्तर वर्तमान दरबारची बोलीचाली तत्वता लेहून पाठविलें पाहिजे; इकडील ममता असावी ही गोष्ट आम्हीं लेहून पाठवावी ऐसें नाहीं. हुजुरून खाशानीं तुम्हास निरवण करणें तें केली व करीत आहेत. तरी हरयेक नवल विशेष आढल होईल तें लेहून पाठवीत असिलें पाहिजे. अंताजी घाटगे सातारियास जाऊन मनस्बेयाचा घालमेल करीत असेन, म्हणून वर्तमान ऐकतों. अशास त्याचें आचरण तुम्हांस कळलेंच आहे, व दरबारीं प्रसिध आहे. ते कजाफती[2] लोक. रुमाजी घाटगा राजपुरीहून येऊन यांची त्याची भेटी जाहाली. हबशियाकडे स्नेहभावाचें अनुसंधान खोलवितात. तिकडून त्यांची माया सुटत नाहीं. परिणामीं कृष्णाजीचें वर्तणुकेप्रमाणें वर्तणुक जाहालियास स्थलास अपाय, प्रजेस अनर्थ निर्माण होईल, ऐसी हाली[3] मुलकांत दाट उठली आहे. हें वर्तमान तुम्हांस कळावें म्हणून लिहिलें असे. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे रा छ १५ माहे जमादिलाखर हे विनंति *.

---

१ पिशव्या, २ भांडखोर, ३ आरोळी, आफवा. * मधील अक्षर लेखकाचें

( 28 ) Motyaji Vichare sends 15 bags of betelnut to Vishwanathbhat Vaidya for handing it over to Maharaj as ordered by his master Angres and informs him, of the danger of sending Antaji Ghatge. Rumaji's name appears in the book of अंग्रेकालीन अष्टागर on Page 152

No 29 ] श्री आश्विन व. । ३० १६६५

आक्टो. ६, १७४३.

यैवज कर्ज देवडी पैकीं निा राजेश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा सुा आर्बा आर्बैन मया व आलफ वाडा पहिला जमा रुपये ५००००.

| रोख | रुपये. |
|---|---|
| १०००० | हिरोजी सेलके |
| ४००० | सिवाजी हरी |
| ११०॥ | जामदार दरुणी महाल |
| ११० | शालनामा गुा महादोबा नाईक तांबवेकर |
| १७३४५ | येमाजी सिवदेऊ |
| २६१८ | रघुनाथभट झिपरे<br>२००० किता येन<br>६१८ व्याज<br>२६१८ |
| १०० | ता वासदेवजी पागा. |
| ५००० | वेंकाजी देवराव वकील |
| ३०० | जासूद दिमत मार. दि मनसूर आलीखान. |
| २०६ | आरब. |
| ६१५ | दक्षणा ता वासदेवजोशी |
| १०० | किा (द) क्षणेस रोख. |
| ५० | विठोबा जगथाप. |
| ८०० | नागोजीराव विचारे. |
| २२ | किरकोळ जासूद व आतार. |
| ३०० | हैबती सोनार बा जोडी देणें उदतसिंग सिर्के मोत्याची. |
| २०० | ता वासुदेव मोरेस्वर खर्चास किरकोळ सरकारात |
| ६०० | कृष्णाजी केशव. |

| सिरस्त्याप्रमाणें | रुपये. |
|---|---|
| २००० | सिदोजी राऊ पाटणकर |
| १००० | सुलतानजी कोकरे |
| १५०० | येसवंतराऊ वाबळे |
| ३७५ | आनंद राऊ जाचक |
| १०० | वास्तुशांतीस ता. |
| १०० | त्रिंबक विश्वनाथ |
| ६५० | इमारती सरकारची |
| ५७२५ | |

किता खाा ता हैबती सोनार.

१ कर्ण फूल जोडी.

१ झुबे जोडी.

२

रुाा ८०० वजा पंचवीस हजार पैकीं दिसेब खर्च रुपये ६१. बाकी आदा रुाा ७३९.

| | |
|---|---|
| ४ | चोपदार हुजूरचे मासे घेऊन आले त्यांसी. |
| ४ | भोई हुजूरचे हेल मासे |
| १००० | पदक देणें विस्वनाथ भट गुा दतु कासार |
| ५० | आनंदराऊ जाचक तिवटें २ सेला १ ——— ३ |
| ४३५३४॥· | |

तेरीज.

| | |
|---|---|
| ४३५३४॥ | रोख रुा |
| ५७२५ | सिरस्त्याप्रमाणें रुा |
| ७३९ | किता रोख |
| ४९९९८॥· | |

बाकी ——— रुपये १॥·

( 29 ) Raghoji Bhosle was paid a debt by S. Sakwarbai, of Rs. 50000 This document contains a list of persons under Raghuji's and queen's favour to whom, he asked Vaidyas, to pay money when he was at Satara.

No. 30 ] हु

२७ रमजान

कार्तिक वद्य १४।१६६५

नोवेंबर ४,१७४३

हदाकत दस्तगाहा [1] बाळंभट ( व ) विश्वनाथभट वैद्य [2] मालुम [3] नुमायेंद सुमा आर्बा आर्बैन मया व अलफ. आंके खत पाठविलें तें रसिद होऊन मजमून मालूम होऊन आला व राजपत्राच्या नकला पाठविल्या त्याही जाहीर जाल्या.

पैशास द्याचे बाबे मसीखत पुन्हा सेखमहमदअली[४] यास हाली लिहिलें असे. ते बोलतां मालूम होईल. त्याचा जबाब आलियावर वतनाचे सनदांचा सरंजाम होऊन येईल. रा छ. २७ माहे रमजान ५न २६ जुहुर कलमी शुध.

१ दस्तगत. २ ज्ञात. ३ जाणावें ४ पवित्रतेचा आश्रय.

( 30 ) Vaidya brothers were informed that they would understand from Shekhmohomed Ali, when they would get the sanads of the watan of Potadan This matter is referred in letter 30 of 1742.

No. 31 ] श्री मार्गशीर्ष शु. ३।१६६५
नोवेंबर, ८, १७४३.

कर्ज निा राजश्री रघूजी भोसले बिा विश्वनाथभट वैद्य सुा आर्बा अर्बैन मया आलफ बाा नन रु. २५०००

सा आंद सुर

| जमा | रुपये | खर्च | रुपये |
|---|---|---|---|
| २७०० किता येन व्याज दर २ | | ५० सुलतानजी येसवंतराव गाटबे | |
| मार्गशिर्ष सु. ३ २००० | | ५० सुभानजी गावडे | |
| हरी रघुनाथ २०० | | १०० जुनदखान माहात | |
| शिवाजी भो हवाला५०० | | ४५०० साखरोजी देवकर | |
| धोंडो कृष्ण फालगुन सुा ४ | | ५०० हिरोजी सेळके वगैरे | |
| २७०० | | २००० राणोजी व संताजी भोसले | |
| २००० रघुनाथजी भो | | १००० किता | |
| १००० मोत्यें चौकडा १ | | १००० किता | |
| २०० कृष्णाजी केशव | | २००० | |
| २०० नाईकजी पाटणकर | | १०० खोजा मनसूर आलीखान | |
| ५० राणोजी सिंदे | | १० जासूद रवाना नागपूर | |
| २०६ आरब | | २५ भगवंत गोसावी हरिदास | |
| १०० खिजमतगार | | २०० आनंदराव (जाचक) दिा | |
| १०० ज्याहांगीरखान वगैरे बारदार | | पद्मोजी जाचक | |

५० राणोजी भांडविलकर — १०० कि
१०० हैबतराव धापटे — १०० कि
१०९० कापड — २००

५० रामदास स्वामी परळीकर तिवट व सेला — १०० साकरोजी देवकर याकडील कारकून

५० पर्वतगीर गोसावी तिवट व सेला — ४००० हैबतराव धापटे

८६९ सौ. सगुणाबाई आली होती त्या दिवशी — २५०० रुद गुा कोनेर पंत १५००

३० साड्या २ — ५० बहीरजी बरगा तिवट व सेला,

१०० पासोडी लिंगे १ पांढरी

६० सेले खसखसी ४ — ११४८१

१५ सेला जाफराबादी — १२५४९ किता रुजू होणें आहेत.

१० शहागाडी सेला १ — १५० त्रिंबक अनंत

६० तिवटें ६ — ७३० चिठी सरकारची

१५० किनखापे २ — ६६९ व्याज

९० शालू किनारदार जरी १ — २३३॥ रुा २२००पैकीं ताा वैशाख १२ रक्ताक्षी ५८९ येाा

३५० पातळ काजळी जरी १ — २२॥· धोंडो कृष्ण ताा वैशाख १२

४ खण पाट २ — यो मुा २८८

८६९ — ४१३ थाा

१०० त्रिंबकजी भो पासोडी १ लिंगाची पांढरी — २३३ गुा कोनेरपंत पैवस्ता चौकीदार ११५॥·

२१ कुसाजी गायकवाड चौकीदार
तिवट व सेला

१०९०

१३२३४ जमा होणें

१००० पालखीचे

२२०३०

१०४४ खा। डेरा वगैरे गुा मलजी
११५ इनाम देवडी धाकटी १००
कुणविणी १५ बुढें

२३१८९

४६ दक्षणा गुा बाबूराव
कोनेर मजमदार

२३२३५

८०० खो कर्णफुलें य झुबे हैबती सोनार
३१७ राजश्री विस्वनाथभट वैद्य
येवन पालखी साल मजकूर पैकीं
६४८ शागीर्द पेशा हुजुरात रा स्वामी

२५०००

गोविंद आप्पाजी पैकीं
माहे१८१७सा ४०००
पो११७।-रु. १२००
विठ्ठल बाजंत्री

२३३

अपूर्ण

( 31 ) The details of the debt incurred by Raghuji Bhosle through Vishwanathbhat Vaidya, when he was at Satara This amount of Rs. 25000 is included in the payment made for Chandakhan to him by Vaidyas.

NO 32 ] श्री

अश्वीन शक. १६६५
आक्टों. १७४३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
**बालभट व विश्वनाथभट** वैद्य स्वामी गो यासीः–

पोष्य **रामाजी महादेव** सां. नमस्कार. विनंती उपरी. येथील कुशल जाणौन स्वकीये लिहित असिलें पाहिजे. विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें. लेखनार्थ सविस्तर कलला. राजश्री **कृष्णभट बोडस** याजवल रुा. ११५ दिल्हे व राजश्री **नारोपंत ओक** यास रुा ६०० ऐकूण सातसे पंधरा दिल्हे. बाकी हिसेब लेहून पाठवावा म्हणोन लिा. त्यास सदरहू सातसे पंधरा रुा. पावले. बाकींचा हिसेब लेहून पाठवावा; परंतु कारकून घरीं गेला आहे. आलियावरी हिसेब लेहून पाठऊं. नोरी[1] सिबाडी[2] करून लाकड पाठवावीं म्हणोन लिा. अशास येंदा **गुजराथ** प्रांतें दुकाल पाडिला आहे याजमुलें गलबतें गला भरून ते प्रांतें जातात. तथापि भिडें करून सिबाड नोरी करून लाकडें भरावीं तरी दर मुड्यास रुा ८ प्रों नोरी पडेल. शंभर मुडयांची सिबाड असल्यास आठसे रुो द्यावे लागतील. उत्तर पाठविलें पाहिजे. पेसजीचे हिसेबा पो अनकूल पडेल तरी कांहीं अैवज पाठवावा. तुमचे लिहिल्या वरून लाकडें चिरावयासी अरकसी लाविलों; व खांब, तुळया, वासे लिहिल्याप्रों करवितों. वासे सोटे चिरून करावे कीं, सोटा तासऊन वासे करवावे? **देवलाचा** बेत कसकसा आहे? तुमचा बेत असेल त्याप्रों वासे वगैरा सामान मुस्तेद[3] जालें पाहिजे. या करितां तेथील येक कारीगर पाठऊन द्यावा. कारीगराचे विचारें सामान मुस्तेद करविले जाईल. + बोशध मागाहून गंडमालेचें पाठऊन देतों. नीरा[4] तो पाठविले आसे. वरकड सविस्तर वृत्त मागाहून लेहून पों. बहुत काय लिहिणें हे विनंती.+

१ भाडयाचें गलबत २ मोठा मचवा ३ तयार ४ खजुरीच्या झाडांची दारू.

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा

(32) The construction of a temple at Malgund is referred to in this letter by Ramaji Mahadev Biwalkar.

The wood for it is secured by him & he is asking what should be prepared out of it- He sent the required medicines.

No. 33 ] श्री

कार्तिक । १६६५

आक्टोबर १७४३

भार्गववरद

श्रीमंत राजश्री **बाळंभट व विश्वनाथभट**

**वैद्य**. स्वामी यासीः—

विज्ञापना. **केशव विश्वनाथ खोत** मौजे **पनली** ता। **सैतवडे** कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंती विनवावया कारणें यैसी. स्वामींनीं पत्र पाठविलें. तें प्रविष्ट जाहलें. लिहिलें कीं, पैका पाठवून देणें म्हणून लि।, तरी आपणास तो या समयीं अनुकूल पडत नाहीं. सेतभाताचा हंगाम जाला असे. यंदा सेतेंही अदलली[1]. दिवाणचा[2] धारा वारतां संकट झालें असे. सारा लुकसानी धंदा झाला असे. आपणास गांवाहून निघालियावांचून उजागिरी होत नाहीं. यानंतर मार्गसीर मासी भेटीस येतों. भेटीनतर सर्व वृत्तांत सेवेशी निवेदन होईल. पाल्लाळ बहु लि। म्हणून स्वामी रागास येतील तर न यावें. मी आपुले पदरीचा, यास्तव लिहिलें असे. विशेष रा. **चिमणाजी गोविंद रानडे** याबा फणस-पोळी वजन ८८२ दोन शेर व गोला नारलाचा व एक, व वोल्या सुपारिया सुमारे पंचवीस पाठविल्या असेत. घेतल्या पाहिजेत. बहुत काय लिहिणें. लोभाची वृद्धि कीजे हे विनंती. १००००

हे।. **नारायण केशव** व **प्रभाकर केशव** यांचे कृतानेक साष्टांग नमस्कार लोभास अंतर न कीजे. विज्ञापना.

हे। राजश्री रामचंद्र पंतास सा। नमस्कार लि। परिसिजे हे विनंती.

हे। रा. **नारो अनंत** यास नमस्कार सांगणें. हे विनंती.

---

१ बुडाली २ सरकारी कर

(33)Keshav Vishwanath Khot of Panali near Lawagan requests Vaidya brothers to grant postponement of

पो चिमणाजी नारायेण सचीव नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशळ लेखन करणें. विशेष. नागोजी नाईक जेधे देशमुख ता भोर यांजकडे तुमचे विद्यमानचा यैवज आहे, याबद्दल तुम्ही वरातदार पाठऊन निकडी केली आहे, म्हणोन वर्तमान कळलें. यैसीयास प्रस्तुत हे दिवस गैरहंगामाचे आहेत; यैवज ये समई येजित नाहीं. याकरितां हे आपल्याकडे रदबदल करितील, ती मान्य करून आणखी मुदती यास ती महिन्याची देऊन विचारें करून यांजकडून निकाल होऊन ये तें करणें. यांचा वोढीचा प्रसंग बहुत आहे. तरी याचा अर्थ पाहोन याजपासून मुदती फुरसतीनें यैवज उगऊन घेणें. +बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती.

+ पुढील मजकूर सचिवाच्या हातचा

(44) Chimnaji Narayan Sachiv requests Vishwanathbhat Vaidya to give Nagoji Naik Jedhe, time to pay the money as he was in an embarassed condition then

No 45 ] श्री+रामचंद्र

१५ साबान

भाद्रपद वद्य १।१६६६

सपटंबर ११,१७४४

पुरवणी बाळंभट व राजश्री विश्वनाथ

भट वैद्य स्वामी गोसावी यासि

विनंती उपरी. सुहूर सन खमस आर्बैन मया आलफ चिरंजीव मुलाचे लग्नाकारणें तुम्हां पासून कर्ज रुपये २०० दोनसे घेतले होते, त्यास हालीं रा संभाजी पडवळ व देवजी पवार याज बरोबर येणें प्रा रुपये

२०० ८ मुद्दल

२७ ८ व्याज

२२७ ८

येकून दोनसे सतावीस रुपये पाठविले आहेत. घेऊन कतबा व रुपये पावलीचें उत्तर पाठविलें पाहिजे. +सर्वेश्व जाऊ, परंतु पत व इतबार उरो, यैसी नीत आहे.

कसबा पाठवून देणें. लोकांचें कर्जवाम देणें उदंड आहे. परमेश्वर यैवज देईल तेव्हां फेडूं. दया करणें, १५ सावान हे विनंती पर हुजूर.+

---

+ मघील मजकूर लेखकाच्या हातचा

(45) Bhagawantrao Amatya paid Rs. 227 to Vaidya brothers which sum was borrowed by him for the marriage of his son.

No. 46 ] श्री+शंकर

२० सावान भाद्र व. ६।१६६६

सप्टेंबर १६,।१७४४

राजश्री नारोपंत स्वामी गोसावी यांसि

सेवक विश्वनाथ भट वैद्य कृतानेक नमस्कार विनंती उपरी. आम्ही आजी नीरे वरून कूच करून श्री मोरेश्वरास आलों. यैशीयास कांहीं शाकभाजी व केळपत्रें व दुभतें पाठवून देणें. तांदूळ, कणीक व तूप पाठवणें.+ बहुत काये लिहिणें. हे विनंती.

---

+ मजकूर लेखकाच्या हातचा

(46) Vishwanathbhat halts at Morgaon near Jejuri.

No 47 ] श्री

भाद्रपद वद्य १०, । १६६६

सप्टबर २०, १७४४

विनंती उपरी प्रा सुपे येथील हिशेब तेथें आहे तो व बाकीची याद गावगनाची व राजश्री विश्वनाथबावाचे स्वारी मुा निंबुत व मोरेस्वर येथें आम्हाकडील जमा काय आहे ते यादी पाहोन अगत्य हिसेब पाठविला पाहिजे. हिसेबाविसीं गुंता जाइला आहे, कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

(47) In this the halts of Vishwanathbhat are given. He was at Morgoon on 13-9-42 and 20-9-44.

No. 48 ]

श्री

आश्विन शुद्ध १।१६६६
सपटंबर २५,१७४४

राजश्री बाळंभट बावा व राजेश्री

विश्वनाथ बावा वैद गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो। महिपतराव तावरे दंडवत विनंती. उपरी येथील क्षेम ता।. आश्विन सुध प्रतिपदा प्रयेंत सुखरूप असो. मुक्काम सुरंज भेळसे तुमच्या भरंवशावर काराटीस मुलमानस टाकल्या. तर संभुसिंग जाधव याचें फार भये आहे. तर साहेबी आपला कागद राजेश्री सिवराम-पंतांस देणें. मुलांमाणसांची खबर घेतील. फार स्याहाव तर साहेब खावंद आहत. बहुत काय लिहिणें. हें विनंती.

(48) Mahipatrao Taware of Karhati requests from Suraj Bhelse to the Vaidya brothers to write to Shiwaram Tukadeo to protect his family from the trouble of Shambhusing Jadhav.

No 49 ]

श्री

३ सवाल का. शु. ४।१६६६
आक्टोबर २८, १७४४

तुळाजीचा शिक्का शिक्का व मोर्तब

पद्मदलसम दुहेरी

राजश्री बाळंभट व विश्वनथाभट वैद्य गोसावी यांस

छ सकलगुणालंकरण अखंडित लक्षुमी आलंकृत राजमान्य श्नो। तुळाजी आंगरे सरखेल रामराम विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन कुशलार्थ कळों येत नाहीं तरी ऐसे नसावें. सदैव पत्र पाठऊन संतोषवीत जावे. यानंतर श्रीमंत महाराज स्वामीचे सेवेसी कितेक अर्थ सांगून राजश्री आबाजीपंत पाठविले आहेत. ते स्वामीचे सेवेसी विदित करितील व तुम्हांस सांगतील. तदनुरूप साहित्यै करून कार्यप्रयोजन उरकून देऊन

श्री०
श्री शाहूनृप
हर्षेण सरखेलस
मुन्नते: तुलसिंहस्य
मुद्रेयं सर्वोत्क
र्षेण राजते.

मशारनिलेची रवानगी अविलंबें केली पाहिजे. बहुत काय लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे. रवाना छ३सवाल हे विनंती. लेखन सिमा तुळाजीचा शिक्का

(49) Tulaji Angre sends his agent to Shahu and requests the Vaidya brothers to support his mission with the king. Abaji Ranganath is sent for the purpose.

No. 50 ] श्री

फत्तेसिंहाचा शिक्का

का. शु. ४ । १६६६

आक्टोबर २८, १७४४

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्ये राजश्री फत्तेसिंग भोसले ता। मोकदमानी मौजे भोसे ता। चाकण सु॥ खमस अर्बैन मया अलफ मौजे मजकूर पेशजी पासून वेदमूर्त राजश्री बालंभट वैद्य, सनिध राजश्री स्वामी याजकडे मुकासा दिल्हा आहे, तेणें प्रा। सालमजकुरीं करार असे. तरी तुम्ही यासी रुजू होऊन मौजे मजकूरचे मुकास बाबेचा वसूल सुरलीत देणें. जाणिजे छ ३ सवाल निदेश समक्ष.

श्री शिवशंभु
स्वामिनि शाहूभूपे
चपार्थिवो रसो परि
णतचेतोवृत्तेः फत्ते
सिंहस्य मुद्रेयं

लेखनावधि मुद्रा.

शिक्का व मोर्तब वाटोळे दुरेघी. बार सुरु सुद बार

No. 51 ] श्री

का. शु ४ । १६६६

आक्टोबर २८, १७४४

छ ❀मा। अनाम देशमुख व देशपाडे ता। चाकण सरकार जुंनर यासी. फत्तेसिंग भोसले सु॥ खमस अर्बैन मया अलफ मौजे भोसे ता। मजकूर हा गाव पेशजी पासून वेदमूर्त राजश्री बालंभट वैद्य, संनिध राजश्री स्वामी, याजकडे मुकासा दिल्हा आहे तेणें प्रा। सालमजकुरी करार असे. तरी तुम्ही यासी रुजू होऊन मौजे मजकूरचे मुकासबाबेचा वसूल सुरलीत देवणें. जाणिजे छ ३ सवाल निदेश समक्ष लेखनाधिमुद्रा

बार सुरु सुद बार

---

❀ महशूर, मशरूल,

(50-51) These are the orders by Fattesingh Bhosle to Deshmukh and Deshpande of Tarf Chakan and to mokadam to pay Mokasa of Bhose to Balambhat Vaidya.

No. 52 ]

श्री

६ शौवाल का. शु. ७ । १६६६
आक्टोबर ३१, १७४४

राजश्री बालंभट व विश्वनाथ भट वैद्य गोसावी यांस

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री तुळाजी आंगरे सरखेल रामराम विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. श्रीमंत राजश्री स्वामीचे सेवेसी खजूर व सोडे व मासे बोंबील पाठविले आहेत. स्वामीचे सेवेसी रूजू करून प्रविष्ट जाहाल्याचें प्रत्योत्तर घेऊन पाठविणें. वरकड दरबारचें वर्तमान सविस्तर यथंभूत लिहून पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ असो दिला पाहिजे. रवाना छ ६ माहे शौवाल हे विनंती. लेखन सिमा

(52) Articles sent as presents to the King by Tulaji Angre through Vaidya brothers.

NO 53

श्री

का. शु. ७ । १७६६
आक्टोबर ३१, १७४४

राजश्री विश्वनाथभट वैद्य

स्वामीचे सेवेसी त्रिंबक विश्वनाथ केतकर सां नमस्कार विनंती उपर. वेदमुहूर्तां राजश्री सदाशीवभट सोमन यांसी रुपये १००० येक हजार देणें. मिती कार्तिक सुध ७ सप्तमी शके १६६६ रगतक्षी नामसंवत्सरें.

(53) Trimbak Vishwanath Ketkar requests Vishwanathbhat to pay one thousand Rs. to Sadashivbhat Soman.

No. 54 ) श्री

कार्तिक शु. १२ । १६६६

नोव्हेंबर ५, १७४४

राजश्री विश्वनाथभट वैद्य स्वामीचे सेवेशी.

सेवक बाबुराव भोसले नमस्कार विनंती उपरी. आमचा येवज तुम्हाकडे येणें तो राजश्री जगोबा नाईक गोडसे यास रु॥ २७०० सतावीसे देणे. मि॥ कार्तिक सुध द्वादसी बहुत काय लिहा हे विनंती.

( 54 ) Baburao Bhosle reguests Vishwanathbhat that Rs. 2700 should be paid to Jagoba Godse out of the money due from him.

No 55 ] श्री+शंकर

कार्तिक वद्य १।१६६६

नोव्हेंबर ९, १७४४

तीर्थरूप राजश्री बालंभटबाबा वडिलांचे सेवेशी आपत्ये विश्वनाथभट वैद्य सा। नमस्कार विनंती उपरी. येथील वर्तमान कार्तिक वद्य प्रतिपदा मुकाम मौजे तिवसी मंगलवेढ यथास्थित असे. यानंतर राजश्री सिवराम तुकदेव करमरकर यासी कर्ज रुपये १०० येकसे द्यावयासी आम्ही येथें मान्य केले आहेत, तरी सदरहू रु॥ राजश्री बालाजीपंत फाटक याजपासीं देणें. येवज देणे बाबत बेटे सरकारांत वडिलीं येकसे रुपये बालाजीपंतापासी द्यावे. बहुत काय लिहिणें हे + विनंती.

+ पुढील अक्षर लेखकाच्या हातचें

( 55 ) Vishwanathbhat writes to Balambhat from Tiwasi that Rs. 100 should be paid to Balajipant Phatak on behalf of Shivaram Tukdeo.

No 56 ] श्री ३ शिक्कादं

मार्ग शु. ४ । १६६६

नोव्हेंबर ११, १७४४

शिक्का व मोर्तब पत्रदल सम दुहेरी

राजश्री बालंभट व राजश्री विश्वनाथ भट वैद्य गोसावी यांस.

सकलगुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो॥ तलाजी आंगरे

सरखेल रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. साप्रत आपणाकडून पत्र येऊन कुशलार्थ कळो येत नाहीं, तरी ऐसें नसावें. सदैव पत्र पाठऊन स्नेहाभिवृद्धि केली पाहिजे. वरकड दरबारची बातमी साधंत कळावी याकरितां पत्र लिहून मुजरद जोडी आपणाकडे पाटविली आहे. तरी राजश्री स्वामीची मर्जी कोणेविचारावरी आहे इकडील मामिल्यावरी काय निमित्य रोश करितात याचा अर्थ शोधून राजश्री स्वामीची ×निशा बरासा करून सतोशी करावें. इकडील वकिली उभयतांवरी असतां दरबारीं, बोलाचाली प्रसंगोचित जपोन, उत्तरास प्रत्योत्तर समर्पक देऊन वरचेवरी निशा करीत जावें आणि वर्तमान लेहून पाठवीत असिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ असो दिल्हा पाहिजे. रवाना छ ३ माहे जिल्काद हे विनंती ( लेखन सिमा )

शिक्का—तुळाजीचा सरखेलीचा

---

× खात्री, समाधान

( 56 ) Tulaji Angre Sarkhel requests Vaidya brothers to be informed why he should have incurred the displeasure of the King and that it should be removed when occasion comes.

No. 57 ] श्री

शके १६६६

सन १७४४

राजश्रियाविराजित राजेश्री हरी रघुनाथ जोग

स्वामी गोसावी यासी.

सिवभट साठे कृतानेक नमस्कार विनंती उपरी. तुम्हांकडील वर्तमान कळों आलें नाहीं, तरी सविस्तर वर्तमान लिहिणें. विशेष. तुम्हांकडे रुपये आपले १०० मुदल सेंमर व व्याज माहे २४ रुा ७५ येकूण पावणे दोनसे जाहाले. रा गोपाळपंत खोलापुरकर यास देणें. पावलियाची रसिद घेणें आणि दरबारचें सविस्तर वर्तमान लिहिणें व आपण सातारीयाचे से पनास रुा आपण देणें असेत त्याकरिता गोपालपंतास सांगितलें असे. तरी त्यास साय देन. केसोहरी व कासीभट खरे त्यांचे संभर देणें असेत तर तुमचे आपणावरी हेच उपकार होतील. बहुत काये लिहिणें हे विनंती.

बाल्ह माणस पाठविला असे. यास रुा १ येक खर्चास देणें. मजुरा देऊन.

[ 57 ] Shivbhat Sathe asks Hari Raghunath Jog to give Rs 100 to Gopalpant kholapurkar will pay them to Keso how Kasibhat Khare.

No. 58 ] श्री

मार्ग. व. ६ । १६६६
डिसेंबर १४, १७४४

राजश्री दामाजी शंकर कमाविसदार पा सुपे गो.

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्नो बसवंतराऊ खासखेल रामराम. सुहूर सन खमस आर्बेन मया अलफ मौजे कार्‍हाटी हा गाऊ इनाम व मौजे बर्‍हानपूर हा गाव मुकासा राजश्री बालंभट व विस्वनाथभट वैद्य यांजकडे आहे तेथें तुम्ही रोखपत्र करून उपसर्ग देतां म्हणून विदित जालें. तर हे गोष्ट कार्याची नाहीं. या देखतपत्र दोही गावांस रोखेपत्र करून उपसर्ग न देणें फिरोन बोभाट आलिया कार्यास येणार नाहीं. देहाये मजकूरच्या रखवालीस सटवाजी मोरे पाठविले आहेत तर उपसर्ग न देणे जाणिजे छ २० जिलकाद बहूत काये लिहीण. सही

( 58 ) An order by Basawantrao Khaskhel to Damaji Shankar Subhedar of Supa not to obstruct Satwaji More to recover money of Babati of Karhati and Mokasa of Barhanpur, on behalf of Vaidya brothers who have to receive these amounts The last word सही is written by the writer himself.

No. 59 ] श्री वैशाख १६६६
एप्रिल सन १७४४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

बालंभट व ता राजश्री विश्वनाथभट

वैद्य स्वामी गोसावी यासीं

पो मोरो नारायण कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें पावले. तेथें लिहिले कीं, घरांत समाधान वाटत नव्हतें. त्याचें वर्तमान लेहून पाठविणें. त्यास तूर्त कांहीं आरोग्य जालें आहे आपणास कळावें. अम्ही येते

समई अपणांस विनंती केली होती. त्यास हालीं राजश्री रघोजीबावाही आले अहेत. तरी आपण मान्य केले आहे. तरी त्यांची विचारणा अगत्यरूप करावी. अपणाकडे तीर्थस्वरूप राजश्री बावा व चिरंजीव राजश्री आबा येतील तरी आपण ज्या प्रों बोलिले आहेत त्या प्रों कार्य करावें. अम्ही यावेसे असेल तरी लेहून पाठवावें, म्हणजे अम्ही ही येऊं. दरबारचें वर्तमान यथास्थित बरचेवर लेहून पाठवीत जावें. बहुत काये लिहिणें कृपा असो दीजे हे विनंती.

राजश्री रामचंद्रपंत यास नमस्कार. चिरंजीव कृष्णाजीपंतास पत्र पाठविलें आहे तें प्रविष्ट केलें पाहिजे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

( 59 ) This letter gives the arrival of Raghuji at Satara.

No. 60 ] श्री भाद्रपद १६६५
सप्टेंबर १७४४

राजश्री विश्वनाथभट वैद्य बावा स्वामीचे सेवेसी.

॥ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो नागोजी सर्जाराऊ जेधे देशमुख ता। भोर रामराम विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. आपण यैवजाबद्दल भोई पाठविले, त्यांणीं बहुत निकडी केली आहे, तो अर्थ पत्रीं लिहिता न ये. गोसावी याचा पैका तो आपलें पत्र न येताच आम्हीं पाठवावा, परंतु प्रस्तुत गैर हंगाम ये समयीं यैवजांची योजना होऊन येत नाहीं, याम्तव अतर पडिले. आम्ही आपलें पदरीचे. आम्हास सर्व प्रकारें भरोसा आपलाच आहे. आम्ही विस्तारें लिहावें ऐसें नाहीं. सारांश आश्विनमासपर्यंत गोसावी यांणीं कृपा करून टहकूब करावें. पुढें हर कैसी तर्तूद करून आपला यैवज वारून देऊन. ये गोष्टीची निशा आसो यावी. आम्हापासून मुदती बहुत होऊन गेल्या; परंतु आपणास यैवज झाडियानसी न पावला. यास्तव आपण अनमान मुदती द्यावयास करितील, तरी अनमान सहसा न करावा. याउपर आपला यैवज ठेवीत नाहीं. सदरहू लिहिल्याप्रमाणें निकाल करून देऊन. तरी भोयास स्नाचिठी पाठऊन उठऊन नेले पाहिजेत. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे हे विनंति.

( 60 ) Sarjerao Jodhe requests Vaidya brothers to give him to pay their debt

No. 1 ] श्रीमूलपीठनिवासिनीप्र ॥

शक १६६७
सन १७४५

राजश्रियाविराजित राजश्री **विश्वनाथभट वैद्य**

स्वामी गोसावी यासी.

सेवक **व्यंकटराव गंगाधर** नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणें विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावोन समाधान जाहालें. देण्याचा मजकूर लिहिला. त्यास **रिणें, हत्या, वैर** हें कोणास सुटलें आसें नाहीं. आम्हीची तो आवस्था आहे ती विश्वजनास विदित आहे. आपणासही विदित असोन ल्याहावें आसें नाहीं. आम्हीही आपल्या दरशणास येणार आहों. भेठीआंतीं सविस्तर विदित होईल. आपले आशिर्वादें कांहीं काल आनकूल जाला, म्हणजे जसा कलेल तसा निर्गम करूं. यांत आंतराये कदापि होणार नाहीं. आपण सर्वज्ञ आहेत. आपण जो स्नेह केला आहे तो वारंवार स्मरतों. निजध्यास आपला आहे. कांही संसार कृत्याचा तरी योग असतां तरी त्यामधेंच थोड्या बहुतानें निर्गम करितों. प्रस्तुत अन्नवस्त्रास अवकाश नाहीं. असा प्रसंग आहे. बहुत काय लिहिणें. कृपा आसो दीजे हे विनंती.

Vyankatrao Gangadhar Hanmante describes his poor condition and expresses inability to pay the debt at this time.

---

शक १६६७
सन १७४५

No. 2 ] श्री

श्रीमोरया

वेदमूर्ती राजश्री **बालंभट व विश्वनाथभट वैद्य** यासि.

**श्री** नी आज्ञाजे, येथील वर्तमान येगास्थित असे. आपलें वर्तमान लिहीत गेलें पाहीजे. यानंतर श्री च्या अन्नछत्राचे गांव मौजे **माण** व मौजे **आंबी** येथें रा। **महादजी खाडकर** याज-

कडून आंबियाचीं झाडें मोकदमाच्या पासोडींत लाऊन माल जप्त जाला आहे, तरी तुम्ही त्यास चार गोष्टी सांगोन आंबियांची मनाई करविली पाहिजे. कदानचित **राजेश्री** च्या कानावर घालणें जालें तर घालून कार्य केलें पाहिजे. मौजे **भोसरी** व मौजे **थेऊरचा** मार सर्व तुम्हांस श्रुत आहेच. अभिमान धरून गांव सुरळीत होत तो अर्थ केला पाहिजे. सविस्तर वर्तमान **नानाजी महादेव** मुखवचनें सांगता कळों येईल. विशेष काय लिहीणें.

A request is made to Vaidya brothers to use his influence at the Shahu Darbar and see that there will be no obstruction to the enjoyment of the mango trees planted at Man & Ambi.

---

शक १६६७<br>सन १७४५

*No. 3* ] **श्रीशंकर**

राजश्री **भवानजी बांभले**

गोसावी यासि.

**दा** अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्वो. **बाळंभट व विश्वनाथभट वैद्य** आसीर्वाद. उपरी तुम्हांकडील कागदपत्र येऊन बहुत दिवस वर्तमान कळों येत नाहीं, तरी ऐसें न करणें. सदैव आपणाकडील कुषळ वृत लेखन करीत जाणें. यानंतर राजश्री **तुळाजीबावा आंगरे** यासी पत्र पाठविलें आहे. हें पत्र **जयगडास** रवाना करणें. तेथून **विजयदुर्गास** रा करितील कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आसीर्वाद.

Vaidya brothers ask Bhawanji Bhambale to send to Jayagad a letter written to Tulaji Angre. The officers will send it to Vijayadurg.

---

*No. 4* ] श्री शके १६६७
सन १७४५

शिक्का व मोर्तब फारसी लिपींत वाटोळा दुहेरी **महमदशहाचे** वेळचा—
( आरंभीचा मजकूर फाटला आहे )

रा. रा. **विश्वनाथभट वैद्य**

यांचे सेवेसी.

**दा** अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नेहप्रतिपूर्वक लेखनार्थ यैसाजे. श्रीमंत **बाबासाहेबी** प्रांत **देवगड** येथील **पोतदारी** तुम्हांस दिली असे. तेन्हे प्रमान आपनही सनद करून दिली आहे. तरी दरसदे सा २ दोन प्रमान जमाबंदीवर वसूल करून खाने बहुत काये लिहिने मो

This is a letter to Vaidya brothers by the Emperor sanctioning the Potdari of Deogad granted by Raghuji Baba at the rate of Rs 2 P. C. on the revenue. Mahamad-Shaha was ruling at Dilhi between 1716 & 1748.

---

*No. 5* ] श्री छ १ मोहरम
माघ शु ३। १६६६
जानेवारी २४, १७४५

राजश्री **बाळंभट व राजश्री विश्वनाथभट वैद्य**

गोसावी यासि.

**दा** अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्नो, **प्रतापजी सोमवंसी** दंडवत विनंती उपरी. येथील **कुशेल** लेखन करित असिले पाो. विशेष तुम्ही पत्र पाो तें उत्तम समई प्रविष्ट होऊन परम संतोश जाला. यैसीयासी राजश्री **बाबूराव यांणीं** लिहिलें तेंही वर्तमान कळों आलें, परंतु आपला मामिला अवकलेस पडला. तुम्ही दरबारीहून जें लिहिलें आहे तेथ आमचे मायेचेंच लिहिलें. परंतु **चिरंजीव राो सरलस्कर दूर** प्रों गेले आहेत, आण आवांतर गृहस्त मंडली पुण्य खर्च करून आदावली घालीत आहेत. म्हणावयासि अथवा माया येक

आमची तुम्हासची आहे. आम्ही तो शरीर भोगानें पिडलों आहों. आण प्रसंगीं तुम्ही आहात. हरयेक आम्हांकरितां तुम्हांस सोसावे लागते. यास्तव सुभअसुभ पत्रीं लिा आहात. यांत आपण तुम्हांस मात्र लेहावें कीं, सर्वेस्वें वोढा सोसिता याजबाा दिवसांच फेरही आपले आहेत. तदनुरूप सर्वास बुधी सुचली आणि त्या सारिखेच कर्म घडोन आलें आहे. त्यास तुम्ही प्रसंगीं आहात. मोहिमेचें काम. आम्ही तो प्रसंगीं नाहीं. चिरंजीव तिकडे. आपणापासीं सरंजाम रावतांचा अथवा खर्चाचा. येक रुपये आहे नाहीं, हें कुली वर्तमान रा॰ **बाबूराउ रघुनाथ** यांणीं निवेदन केलें असेल. आण आवांतर परभारेंही वर्तमान येकिला असेल. तेथील प्रसंगचा भरवसा जाणोन तुम्हापासीं मारानिलें रवाना केलें, ते खर्चाची बेजमी न जाली आाणि **चिरंजीव सरलस्कर** यांणीं दोनच्यार पत्रें पाठविलीं कीं, **बाबूराव** यांसि दरबारास पाठवून देणें. सांप्रत पत्रें लस्करचीं आलीं तेही पाा आहेत, तर जव जाणाल तव मोहिमेचा अर्ज करून राहाविली पाहिजे, सरंजाम येकरूप नाहीं. तुम्हांपासीं पा॰. ते मागोन तुम्हांस त्याच्या खर्चवेचाचे बेजमी करणें लेहावी. येसी आपणावर संकटें आहेत, तरी नहक फेरी पडेन ते गोष्टी न केली पाहिजे. चिरंजीव प्रसंगास ये तोपावेतों दरबारचा रंग व आमचा रंग सर्व प्रकारें राखिला पा॰. दिवसांच्या फेरा सारखे साहेभूत न होणें. सरंजाम मोहिमेचा. येक रूपये नाहीं. पाचासातानसी गेलीया भरम राहात नाहीं. यास्तव अवज्ञा लिहिली आहे. तुम्ही खोलून पत्रें लिा आहेत. आपण आण येथें राहावे; परंतु भोगास आलें आहे. यास तुम्ही काय कराल. आमचा भोग. तु (म्हा) सांसर्गीक मंडलीस सोसावासा जाला. जववरी जाणाल तव मोहीम मना केली पाहिजे. हलीं तुम्हांपासीं राा **बाबूराव** व माहीश्वर आहेत त्यांचें भक्षावयाचें मानासिक, तरीं तुम्ही त्यास खर्चावया देणें. यांस उपवासी मरो न देणें. जैसें कळेल तैसें **गवलकोटची मोहीम** मना करणें. बहुत काये लिा छ १ मोहरम हे विंनती.

Pratapji Somavansi writes to Vaidya brothers the circumstances unfavourable to conduct the invasion of Govalcot and requests to try that it is postponed.

No. 6 ] श्री ४ मोहरम

तुळोजीचा शिक्का व मोर्तब माघ शु. ६, १६६६

पन्नदल दुरेघी जानेवारी २७, १७४५

राजश्री **बाळाजी रघुनाथ** गोसावी यांसी

द्दा अखंडीतलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो **तुळाजी आंगरे सरखेल** रामराम उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे विशेष **अजणवेलीस** मोर्चे बंदी केली होती, त्यास माघ शुद्ध सौम्यवारीं आरमारावरीं खासा चढोन व खुसकीनें जमावसहवर्तमान हला करून दोन तास दिवसा किला फुते केला हें तुम्हांस कळावें म्हणून लिहिलें असे. **अजणवेली** फुते ( फत्ते) केली हे वर्तमान **गोवलकोटास** कळलियावरी **सिदी याकूद** गोवलकोटीं होता, तो दाहा लोकानिसी पलोन गेला. मागें कोटांतील लोक होते, त्यांणीं **चिपळुणकर** गडीमध्यें होते त्यांसी मायावी विचार सांगोन त्याचे निशाण व लोक व बंदरें कांहीं घेतले होते. आमचे आमदार लोक **गोवलकोटास** रवाना केले त्याही एक भला माणूस पाठविला कीं तुम्ही (नि) शाण चढविलें, बरें उत्तम केलें. त्यास दोनशे माणूस आमचे वर घेणें म्हणून सांगोन पाठविलें. त्यांणीं वरून हाक मारून सांगीतलें कीं, तुम्ही किल्याखालीं न येणें आणि वरून× भांडीयांची मारगिरी व बंदुखांचा मार आमचे लोकांवरी केला, त्याणें आमचे लोक दाहापाच जखमी होतांच हला + + दोन प्रहरा करून लोक तेरा चौदाशे माणूस होते ते पाणी भरवण केलें. भृगुवारीं गोवलकोटही दोनप्रहरा फत्ते केला हें संतोषाचें वर्तमान तुम्हास कळावें म्हणून लिहिलें आहे. तुम्ही आमचे दरबारीं आहा. तरी दरबारचें वर्तमान वरचेवरी लिहोन पाठवीत असिलें पाहिजे. येविसीं बहुत काय लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे.

रा छ ४ माहे मोहरम [ लेखन सीमा ]

The capture of Govalcoat and Anjanval is communicated by Tulaji Angre to Balambhat Vaidya.

---

×भांडें=तोफ. दामले रुजु खू. सु। १२

*No. 7* ] श्री माघ शु. ११,१६६६
फे. १, १७४५

श्रीमंत राजश्री बाळंभट व विश्वनाथभट
वैद्य स्वामीचे सेवेसी

पोष्ये **नारो अनंत** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता। माघ सुध येकादसी शुक्रवार पावेतों मुकाम कर्यात **भुगांव** प्रांत **देवगड**. जाणून स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. वि॥ तिमाजी जासूद याजबा॥ कर्यात **भूगांव** पैकीं रुपये १००० येका हजाराची राजश्री **रामाजी नाईक काळे** यांचे दुकानची हुंडी करून पाठविली आहे. येऊन पोहोचेल. हजार रु॥चे हुंडीस हुंडणाळ व बटा रु॥ १४० येकसे चालीस पडले. कळलें पाहिजे. कर्यात मा॥रचे गुदस्तची जमा-बंदी रा॥ **मल्हारराम** यांनीं स्वामीजवळ सांगितली कीं, साडे **नवहजार**, त्यास येथें चवकसी करितां येैन जमाबंदी पांच हजार व पटिया अडीच हजार येकून साडेसात हजारचा गुदस्ता आकार आहे, त्यास स्वतानिकाची तकसीम वजा होऊन उरला यैवज **मल्हारराम** यानीं नेला. सालमजकूर आकार म्हणावा तरी दोन गाव अगदीं खराब पडले आहेत. दहागाव लागले आहेत. त्यास गांवांत निमे किर्दी आहे. तीन चार हजार रु॥ वसुल जाहाला. त्यास बारासे रुपये पटिया जाहाल्या. राजश्री **रघोजी** बाबांनीं **नजरपटी** म्हणून साडेसातशे रुपये घेतले. स्वतानिकांनीं साडेचारशे घेतले. बाकी हिशाप्रों जिकडील तिकडे वसूल जाहाला. पुढें जमाबंदी होणें असे. श्रीमंत राजश्री **रघूजीबाबा वणीचे** ठाणीयासीं झुंजत आहेत. ठाणें **चांदियापासून** येकमजल पुढें आहे. आम्ही श्रीमंताकडे आज स्वार होऊन गेलों. तेथें गेलेयावरी वराताचा मजकूर करून व **नजरपटी** घेतली आहे त्याचीही विनंती करून पाहो, अर्ज ऐकिला तर उतमच जाहाले, नाहींतर दर्शन घेऊन येऊं. वराता या प्रांतें पेशजी घेऊन दिल्हत होत्यात, ते मामलेदारांनीं तमाम माघारिया टाकिल्या. याजकरितां श्रीमंतापावेतों जातों. कळलें पाहिजे. **गिरमाजी सिंदा** व **चिंतोबा** व उंट यैसें **कृष्णाजी बामन**

याजबा **निरमलप्रांतें** सुखरूप आहेत. **कृष्णाजी पंत** याजमागें पैकिया-करितां **विठ्ठलपन्त** गेला आहे. **संकराजी पंत** निर्मलेस पैसेयाबा गेला आहे. घोडी भुगांवीं ठेवणें, म्हणून पेसजी लिहीलेत होतेत. त्यास आम्हां-जवळ गंगीचा सिंगा व तटू व अधरी निली घोडी व सि[ग]रूं आहे त्यांस येथें काय ठेवावी आणि बो कोणती आणावी तें लिहोन पाठविले पाहिजे त्या प्रों वर्तणूक करून. **तिमाजी फिरोन** माघारी आला म्हणजे आम्हीं स्वार होऊन देशास येऊं. घोडी या प्रां(ता)स ठेवावी तर येथील कांहीं भरवसा पुरत नाहीं. यात स्वामीचे आज्ञा होईल त्याप्रों वर्तणूक करून. **कानो-कडील** कागद्पत्र आला असिला तर **तिमाजी** बा पाठविला पाहिजे. कोकणांत घरीं खर्चवेचाचा परामृष घेतला पाहिजे. बहुत काय लिहीणें. लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विनंती.

Naro Ananat Gadre writes to Vaidya brothers that Naza-rpatti was taken by Raghuji Bhosle from the village of Bhugaon The states had also levied Najarana. Raghuji was fightingat Vani which is beyond Chanda.

---

*No. 8* ] श्री+रामचंद्र माघ १७६६<br>फ १७४५

सकलगुण परिपूर्ण राजमान्य राजश्री

**बाळंभट** व राजश्री **विश्वनाथभट** वैद्य

स्वामी गोसावी यासि.

पोष्य **भववंतराऊ रामचंद्र** कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष तुम्हीं **सुभानजी साळोखा** याजबा पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळों आलें. पालखीच्या दांडी विसीं लिहिलें होतें त्यावरून हालीं पाल-खीची दांडी पाठविली आहे. घेऊन पावलियाचें उतर पाठविलें पाहिजे. राजकी वर्तमान त्या प्रांतीचें सविस्तर लिहिलें पाहिजे. **कोल्हापूरचे राजे**,

**धणी** व सौभाग्यवती **बाईसाहेब** तेथें आली आहेत. रा **आर्जोजीयाद**
सर्व राज्यभारी संनिध आहेत. पुढें काय मनसबा विचार होत आ
**कागल** घ्यावें, राजश्री **राणोजी घोरपडे** व आमचा अपाय करावे, **चिके**
**डीकरास** शह द्यावा हा मनोदय **बाईसाहेबांचा** व **यादवांचा** आं
राजश्री **गंगाधर पंत प्रतिनिधी** यांची उभारणी होऊन मागती उप
केला. चहूकडे फजीती केली. पुढें आम्ही लोकी काय करावें ? सरकारद
नाच्या इजती व आब्रु बाकीस राहिले नाही. राजश्री **श्रीपतिराव हुज**
दरबारास फडास आले असतील. काय विचार होईल तो कळेल. राजश्र
**तुळाजी आंग्रे** यांणीं **अंजणवेली** व **गोवळकोट** फितुराने घेतला. माह
राजांचें पुण्य करून येश आलें. सर्वांचे गर्व परिहार जाले. पुढें काय विच
होईल तो पाहावा. पेसजी लिहिल्या प्रमाणें राजपत्रें करून पाठवणें. तुम
भेटीचा हेत आहे. भेट होईल तो सुदीन. + बहुत काय लिहिणें आमच
वृधापकाळ जाला. येकवेळ **महाराजांचे** व तुमची सर्वांची भेट घेउ
चिरंजीव मुलें हातीं देऊन देवदेव करीत बसावें. **श्री यात्रेस** जावें हा मनो
दय आहे. राज्यांत परीक्षा नाहीं, बद मनसुबी; न्यायनिति बुडाली, कदीम
पाया राज्यांतील मोडला; ब्राह्मण व मराठे मोडले ; अंधकार पडिल
बेदाद जाली ; काल महिमा ; कलीधर्म यैसा जाला, येकवर्ण होत चालिले
याच काळीं कल्युगाचा अन्त आला यैसें दिसतें. श्वधर्म बुडाले, सीम
जाली, आम्ही लोकी देशांत जावें. यैसें जालें. आम्हा लोकांचा धावा ईश्व
करील. तुम्ही आपले वडिलांचे व आपले ईमान शफत जतन करणें सारथ
करून हें घर जतन करणें. कृपा करावी हे विनंती. पर हुजुल.

Bhagwantrao Amayta describes the political trouble: at Kolhapur created by the King, the queen and Arjoji Yada

---

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा

*No. 9* ] श्री पौष शुद्ध १४, १७६६
जा. ६, १७४५

श्रीमंत राजश्री **बाळंभट बाबा** व तथा
राजश्री **विश्वनाथ बाबा** स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक **संकराजी कानो** साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीयें लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशे (ष) आम्हांकडील वर्तमान ता। पौष्य शुध चतुर्दसी **मु॥ भुगाव**, स्वामीचे आसीर्वादे करून येथास्थित असे. यानंतर या प्रांतीचें वर्तमान राजश्री **नानांनीं** लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. दुसरे गुदस्तां **भिकू पाटील** भुगावचे **रुपये** साडे आठ हजार देत होता, ते स्वामींनीं चित न घातलें आणि **झुलाजीचे** हवाले केले. त्यांनी आपले मतें जमाबंदी रु॥. सा हजार केली आणि रयेत हैराण केली. मनमानें सारिखें काम केलें. स्वामींनीं देशमुखी दिली जे, परगणा सवाई भरून देतों, म्हणोन दिली. त्यास परगणा तो यंदा वसत नाहीं. **श्रीमंती** यंदा देशमुखाचे गाव इनाम होते ते खालसा केले. देशमुखावरी इतराजी आहे. स्वामीस अगत्य असेल तरी, रयतेचे व आपल्या रुपयाचे, तर देशमुखी व देशमुखाचा गाव इनाम, येसें सरकारात ठेविले पाहिजे. हजार रुपयाची प्राप्तमध्येंच कां जाते? स्वामी जिकडे वलतील तिकडे हत्ती देतील; परंतु कामाचा गैरकामाचा पाहत नाहीं. स्वामी या प्रांतास येते तर हकीकत स्वामीस विदित होती. आतां जे **झुलाजी** करील तें प्रमाण. **ठाकरिणीचें** वर्तमान तीनसे रुपये दांड केला आणि सर्वस्व लुटून आपले घरात घातलें. येक कवडीचें वित ठेविलें नाहीं. वेळेचें अंन भक्षावयास नाहीं. घरांतून बाहेर घातली. दुसरे जागा राहिली आहे. ना स्वामीचे घरीं. नाहीं मध्येंच चोर खातेत. तिचे मागील कागदपत्र जुने कारकीर्दीचे होते तेही नेले. या रीतीची तिची अवस्था केली. पाटिलकी सरकारची म्हणोन **ठाकरिणीचे** बाईल **सरंसाल्ये** कुल सामान घेऊन खेती केली. सरकारची पाटीलकी आहे म्हणोन इस्तमालेत केली. पैदास्त कसठ्यामध्यें होती ते पाटलाकडे जाती. **नानांनीं** पाटीलकी

**झुलाजीस** दिली. त्यामुळें पैदास्त गेली. आतां पत्रीं कोठवरी ल्याहावें? पाटिलकी व देशमुखी रुपये येक हजार प्राप्त स्वामीची जाती याकारितां देशमुखी व पाटीलकी येैसी सरकारांत ठेऊन अमल माझ्या नावें सनद करून पाठविलीयानें **हारसेन सेत** इस्तमालेत होईल आणि खावंदाचे घरास रुका जातो या गोष्टीस येक दोन मातबर गृहस्थ आहेत. स्वामी म्हणतील जे, आज पावेतों **झुलाजीची** गोष्ट सांगत होतास आणि आतां कैसें लिहिलें? तरी आजपावेतों दुरून सहवास होता. आतां गावांत आठ महिने कबिला सुधा आलों. तमाम हकीकत मनास आणली. या रीतीची आहे. कितेक प्रकारचें कर्म आहे, कोठेंवरी ल्याहावें. जर स्वामीच्या चितास येईल तर लिहिल्याप्रमाणें आपण या प्रांतास येत तोवरी आमच्या नावें सनद. देशमुखी व पाटीलकी पा. साल मजकूरचा वसूल घेतला असेल तो फिरोन देणें, येैसी सनद पाठविली पाहिजे. स्वामी **झुलाजीची** मुवत धरितील तर **श्रीमंतांचा** कारभार स्वामीस विदित आहे. या प्रतीची दिलीं वतनें जप्त केली. या करितां माझा कांहीं इतला आसल्यानें स्वामीचा रुपया जाऊ न पावे, हें स्वामीस बहुत विदितच आहे. मी स्वामींचा बरा वाईट बहुता दिवसाचा चाकर आहे. लोणहराम नाहीं. या लोकांनीं आपले दाखविले तरी याच प्रांतीं राहतील आणि आम्ही पायापासीं येऊन हे गोष्ट स्वामींच्या चितीं न ये तरी परिणामीं विदित होईल. गुदस्ताचे रुा सातसे येणें त्याची वाट अद्याप नाहीं. जर चितास येईल तर आमच्या नावचें पत्र ल्याहावें जे, **झुलाजी** कडील रु. सातसे व्याजसुद्धां पत्रदरशनीं घेऊन हुंडी करून पाठविणें, व येक पत्र **नानास,** येैसें लिहल्यानें काम होईल. यंदा या प्रांतीं खराबी आहे. **श्रीमंत चांद्यामुळें** बहुतांस कष्टी करील. **झुलाजी**पासीं कांहीं मागतात म्हणोन आइकिलें. यास्तव आपला रुपया घेतला पाहिजे. स्वामींच्या साहेबींत **झुलाजी** गबर जाला, तो परस्परें विदित होईल. पत्राचा मजकूर ध्यानांत आणून लिहिल्याप्रमाणें पत्रें आलीं तर बेमुर्वत रुपये स्वामींच्या घरास

येतील. मनास न ये तर आमचा तंटा नेमला पाहिजे. जादूनें मारितील. बहुत ल्याहावें तर स्वामी सूज्ञ आहेत. हे विज्ञाप्ति.

इस्तमालत=लावणी; इतला=सबध लाभ; लोणहराम–निमकहराम; साहेबी–मोठेपणा.

Letter by Shankaraji Kano, Clerk of the Vaidyas from Bhugaon, near Nagpur, to VishvanathBhat at Wai explaining the difficulties of managing the Deshmukhi of the village & advising not to relie on Zulajipant.

---

*No.10*] श्री २० मोहरम

रघूजीचा शिक्का व माघ वद्य ८।१६६६

मोर्तब अष्टकोनी दुरेघी फेब्रुवारी १२, १७४५

राजश्री आपाजी जिवाजी सुभेदार
प्रांा देवगड गोसावि यांसी

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रीा रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत सुाा खमस अर्बैन मया व अलफ राजश्री विसाजी रघुनाथ वकील यांची वरात दरबार खर्चाबाबत दोन हजार रुपये पेसजी देविले आहेत त्यांस अद्यापि पावले नाहींत म्हणोन विदित जाहालें तरी मारनिलेचे वराते प्रांा यैवज झाडियानिसी पावता करणें. जाणिजे २० माहे मोहरम × बहुत काय लिहिणें. मोर्तब सुद

× पुढील रघुजीचें अक्षर

Raghuji asks Apaji Jivaji Subhedar or Deogad to pay without delay Vishwanath Bhat Rs. 2000 as Darbar expenses.

---

*No. 11* ] श्री माघ व. ११।१६६६
फे १५।१७४५

राजश्री विश्वनाथभट वैद्य स्वामीचे सेवेसी.

सेवक हरी रघुनाथ जोग साा नमस्कार विनंति. येथील कुषल ताा माघ वद्य एकादशी पावेतों मुाा लस्कर प्रांत चांदों नजीक वैरागड जाणोन स्वकीये कुषल लिहीत असिलें पाहिजे. यानंतर बहुत

दिवस स्वामीकडील कुषलार्थ कळो येत नाहीं. तरी सविस्तर लिहिलें पाहिजे. विशेष. राजश्री **नारोपंत** व **गोपाळपंत** व **संकराजी कान्हो** व **विठल आणाजी** लस्करामध्यें आले. श्रीमंतास भेटले. **कर्यातभुगाव** व **राहाटगाव मवाड** व दरबार खर्चाच्या ताकिदा घेतल्या. भुगाव ( येथें घाल ) मेळ करणारांहीं बहुत केली होती. त्यास त्याही त्यांचे गोष्टीमध्यें चित घातलें नाहीं. पेसजी प्रों करार करून दिल्हे आहे. वरकड सविस्तर रा। **नारोपंत** लिहितील, त्याजवरून कळो येईल. आम्ही **श्रीमंता** समागमें **बंगाले प्रांतास** जावयासी स्वार होऊन गेलों. कोकणामध्यें तीर्थरूप राजश्री बावा व मुलें माणसें आहेत, त्यांचा हरयेक प्रकारें सांभाळ करीत असिले पाहिजे. खर्चावयासी रुपये संभर पाठऊन दिल्हे पाहिजेत. **श्रीमंतांही** सांगितलें आहे कीं, इकडील रुपये वसूल होतील. ते वरच्यावरी **सातारयासी** रवाना करीत जाणें, येसें रा। नारोपंताचे रुबरूत सांगितलें आहे. आम्ही **बंगाले** प्रांताहोन फिरोन छावणीस आलों म्हणजे तुम्हांस पत्र पाठऊं आणि तुम्ही स्वार होऊन **नागपुरास** आलें पाहिजे. विस्तार ल्याहावा तरी स्वामी सर्वज्ञ आहेत. बहुत काये लिहिणें. कृपालोभ अभिवृद्धीतें पाववीजे. हे विनंति.

समस्त इष्टमित्रांस सा। नमस्कार सांगणें.

घरामध्यें सौ. वज्रचुडेमंडित **सरस्वतीबाई** व सौ. **उमाबाईस** कृतानेक सां। नमस्कार. मुलांस आसीर्वाद. लोभ असो देणें हे विनंति.

Hari Raghunath Jog informs Vishvanathbhat of occurrences in the Bhosle's camp during his expedition into Bengal.

---

*No. 12* ] **श्रीराम समर्थ** माघ व. ९, १६६६
फे. १३, १७४५

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री **बाळंभट** व रा। **विश्वनाथभट** यांप्रती.

पूर्वक **लक्ष्मण नाम्नें** नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणऊन स्वकियें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष **श्रीच्या** मोहोच्छायासी

प्रारंभ माघ वद्य प्रतिपदेस जाहाला. मुख्य दिवस नवमी बुधवारीं आहे. यैसी यासी आपण अवकाश करून अगत्य आलें पाहिजे. आनमान न कीजे. बहुत काय लिहिणें हीं विनंति.

Invitaion to Vaidya brothers from Laxmanbawa, the grandson of Gangadharbawa, the brothar of Ramdas Swami for attending the Celebiation of Das Nawami.

---

*No 13* ] श्री शक १६६६
सन १७४५

अशिर्वाद उपरी. **वाकोजी जाधव सेटयाची जाधव** याजबा गेला होता तो घोडेसुद्धां **नागपुरास** आला. पाच मासे शा तलब, **सेटयाजी** जाधव याजकडे जाहाली. त्याची वरात **पंचगव्हाणावरी** दिल्ही होती, ते **वाकोजी जाधव** घेऊन आला होता; ते वरात फिरली. त्यामुळें फिरोन **नागपुरास** गेला. त्याजबा थोरली घोडी दिली होती ते त्याजबा नागपुरींच आहेत. पातुरी येथील शिंगरे व येक घोडी येकून पांच येथें आहेत. त्यास यंदा वराडांत पाऊस नाहीं त्यामुळें दाणाचारा महर्ग जाहाला आहे. **हरभर** दुसेरी पाइल दर खंडीस टके तीस व कडबा दरसदे टके तीन प्रों प्रस्तुत भाव जाहला आहे. पाच घोडीं व दोन माणसें येथें आहेत. त्यांस येथें दिवसेदिवस महर्गता होत आहे. त्यास पुढे येथें घोडी आहेत हे येथें ठेवावीं किंवा आपणांकडे पाठवावी, याची तजवीज कैसी करावी ते लिहोन पाठवावी. त्याप्रों वरूं. उत्तर पाठवावें. बहुत काये लिहिणें, हे आसिर्वाद.

This letter of Naropant Gadre gives market rates of fodder when there was famine. in Berar He had to arrange for the feeding of horses.

---

No 14 ] श्री फा. शु. ८।११६६६
रघुजीचा शिक्का व फे. २, १७४५
मोर्तब अष्टकोनी दुरेघी

राजश्री **विश्वनाथ वैद्य** गोसावी यांसी.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो **जानोजी भोसले** दंडवत, विनंति उपरी. येथील कुशल जाणून जाणून स्वकीयें लेखन करणें विशेष. गतवरर्षी महाराज राजश्री **स्वामी** यांनीं तीर्थरूप राजश्री **बाबासाहेबांचा** व राजश्री **पंतप्रधान यांचा** स्नेहे उभयपक्षीं ऐक्यभाव करून दिला असतां, गुदस्तां रा **अवजी कवडे** यांनीं **सिवणी छपारे** यांसी अग्नदग्ध करून [1]अवग्र वितविषये घेऊन मणुशाची खंडणी रुपये वीस हजार घेऊन गेले. पैसे असोन सांप्रतकाळें रा **जायापा सिंदे** शैन्यसहवर्तमान **वऱ्हाडप्रांते** कसबे **माटरगांव** पा **बालापूर** येथें अग्नप्रवेस करून अवग्र वित्त-विशये व साहुकारास नागावा लाऊन चित्तानरूप द्रव्य घेऊन, अन्यत्र स्थळें नष्ट भ्रष्ट करून समग्र **वऱ्हाडप्रांतें** पषत्रादि हरण केलें. हा स्नेहे सख्या म्हणोन या प्रकारची फळश्रुत जाली. राजश्री **स्वामीचे** चरणांसनिध वचणप्रमान. तुमचे [2]रुबकार जाला होता. त्यासी आपलीकडून अंतर किंचित न पडोन त्यांनीं या प्रकारचा उपसर्ग देऊन उपक्रम योजिला आहे. यापूर्वी आमचें शैन्य **जळगांव जामोद** खानदेशची [3]शरदेस गेली असतां त्यांचे प्रांतेस काडीमात्र उपसर्ग लागों न दिला. किंनिमित्य कीं राजश्री **स्वामीच्या** पायासीं आवज्ञा होईल. यावरी आपलेही शैन्य अणिवार असे. तुम्हांस कळावें. रा। छ ७ माहे सफर. बहुत काये **लिहिणे**.

---

१ समग्र. २ समक्ष, पुढे. ३ हद्द, सीमा.

· Janoji Bhosale writes to VishvanathBhat Vaidya about the plunder and destruction perpetrated by Avji Kavade and Jayappa Sinde on behalf of Peshwas in the jurisdiction of the Bhosales. This was against the terms of the reconciliation brought about by the king between the Peshwa and Raghuji Bhosale last year Janoji did not give any trouble to the country of Pesawas, though he had gone with the army. to Jalgaon Jamod, the border of Khandesh. Ganoji wished that this should go to the ear of The King shahu.

मातेर्ब सुद शिक्का

*No.15* ] श्री. फा. व. ९/१६६६
मार्च १,१७४५

राजश्री **बालंभट व विस्वनाथभट वैद्य** गोसावी यांस

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो **तुळाजी आंगरे सरखेल** रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. श्रीमंत राजश्री **स्वामीचे** सेवेसी हुताशनीचे उछाहार्चे साहित्य गुलाल व गुलाबासिसे व खजूर पाठविला आहे. **स्वामीचे** सेवेसी विदित करून प्रविष्ट जाहाल्याचें प्रत्योत्तर पाठवावें. वरकड दरबारचें सविस्तर लिहून पाठवावें. येविसीं बहुत काय लिहिणें. रा छ ८ माहे सफर लोभ असों दिल्हा पाहिजे. हे विनंति. (लेखन सीमा)

( शिक्का व मोर्तब तुळाजीचा )

Articles are sent by Tulaji to Balambahat & Vishwanath bhat in order to present them to Shahu Swami for the Shimga festival. He tries to please him. There is a seal of Tulaji but no mention of Sarkheli init.

---

*No. 16* ] श्री.कऱ्हाटेश्वर फा व. ५/१६६६
मार्च ११,१७४५

श्रीमंत राजश्री बालंभट ताा राजश्री **विश्वनाथभट**
वैद्य स्वामि गोसावि यांसी—

सेवक **राघोबा दरवे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती, येथील क्षेम फाल्गुण वदी पंचमी जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. यानंतर पेसजी आपण येथें आले होते ते समयीं आपणांपासीं विनंती करून ठेविली होती. त्यैसीयासीं हलीं **चिपळूणचें** बंदर आमचे स्वाधिन **श्रीमंतांहीं** केलें आहे. याजकरितां स्वामीकडेस **तानसेट तेली** हें पत्र देऊन पाठविला असे. तरी कृपा करून वरसाचे बोलें रुपये १००० येक हजार दिले पाहिजेत. येक वरसानें येकोत्राचे व्याजसहित देउं. हेंच पत्र कतबा दाखल ठेऊन रुपये सदरहू येक हजार दिले पाहिजेत. अनमान सहसा न कीजे. फाल्गुण वदी पंचमी शके १६६६ रक्ताक्षीनाम संवत्छरे बहुत काये लिहिणें. सदरहू रुपयांत कांहीं सोनें मिळालें तर सेर पावेतों पाठवावें, बाकी रुपये पाठवावे.

बहुत जरूर आहे. हा धंदा स्वामिच्या धिरावरी केला आहे. बहुत काय लिहीणें. आपलें वचन खरें करावें हे विनंती लक्ष.

Raghoba Darve requests Vaidya brothers to send Rs. 1000 with Tanset Teli to fulfil the contract of chiplun harbour. with angre. He always uses the word लक्ष at the end of a letter.

---

*No. 17* ] श्री फा. व. ८।१६६६
मार्च १४।१७४५

शिक्का व मोर्तब तुळोजीचा
शिक्यात सरखेल हुदा नाही

राजश्री **बाळंभट व विश्वनाथभट** वैद्य गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो **तुळाजी आंगरे** रामराम विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. प्रस्तुत तुम्हांकडून पत्र येत नाहीं. यास्तव हें पत्र पाठविलें आहे. तरी दरबारचें वृ (त्त) साकल्य लेहून पाठविणें. यानंतर **बाणकोट वेसवी खाडीचे** नस्तावरी पहिला शामलानें वसविला होता. अलीकडे **राजपुरीस** फौजा उतरल्या, तेव्हां **सुवर्ण-दुर्गाहून बकाजी नाईक** जमावसुधां जाऊ (न) जागा हस्तगत केला. त्याजउपरी **शामलानें** घेतला. फिरोन बकाजी नाइकांसारखे बेरबेरे **माणूस** त्या जागांसाठीं कामास आले. तो जागा प्रस्तुत **अजणवेलकर** याणें वसवावा, यास्तव दाहा गलबतें लोकसमेत तयार करून **राजपुरीहून** गलबतें व लोक, सामान, कुदळ्या, पावडी देखील तयार केलीं. हें वृत कळतांच बातमीस माणसें पाठऊन तथ्यवृत आणितां **बाणकोट** वसवितों आणि **महाडपर्यंत** धुंदाई करणार, ऐसें खरें जाहालियावरी तेच क्षणीं गुराबा व गलबतें सामानसुधां पाठऊन जागा वसविला. हें वृ (त्त) राजश्री **स्वामीचे** सेवेसी अवगत असावें यास्तव लिहिलें असे, तरी तुम्ही राजश्री **स्वामीस** विनंती करून जाब सुप्रयुक्त पाठविले पाहिजेत. कोण्ही काहीं म्हणतील त्याचा निशा करणें ते रीतीनें करणें. वरकड आम्हांस तों माहाराजांच्या पायांविना दुसरें दैवत नाहीं. सर्व जागें जंजिरे

माहाराजांचे. सेवा करून कृपेस पात्र व्हावें हाच निदध्यास आहे. वरकड अधिकोत्तर दरबारचें वृत लिहित गेलें पाहिजे. बहुत काये लिहिणें लोभ असो दीजे रा।। छ २१ माहे सफर हे विनंती. लेखन सीमा

Tulaji Angre asks Vishvanathbhat Vaidya to assure the Chhatrapati that he was exerting his utmost in capturing the places of Bankot and Anjanval from the possession of the Siddis.

---

*No. 18*] श्री फा शु ११।१६६६
मार्च १७, १७४५

श्री सकलगुणालंकरण राजमान्य राजश्री वैद्य
**बाबा** स्वामीचे सेवेसी.

सेवक **केसो त्रिबंक** मुा **किल्लेगोपाल दुर्ग** कृतानेक नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले तें पावोन लेखनार्थ श्रवणें संतोष जाहला. यैसेंच सर्वदा पत्रीं दर्शनाचा लाभ देत जावें. या नंतर आपली रवानगी श्रीमंत **सारखेल** साहेबाकडे गुरुवारीं जाहाली म्हणून पत्रीं लिहिलें, उत्तम जाहलें. दिवाण साहेबाचे भेटीनंतर सर्व मनसबे होऊन येतील. आपण हुजूर जावयासि येतां हे यैकोन, जावयासी गलबत **जयेगडीं** तयार करविलें असे. **मारवजनचे** मार्गे जयेगडीं जाऊन हुजूर जावयाचें केलें पाहिजे. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे. रा। छ. २४ सफर + हे विनंती.

Vishvanathbhat Vaidya is sent by Shahu to Tulaji Angre.

---

*No. 19* ] श्री फा. १६६६
मार्च १७४५

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री **रामचंद्रपंत दाजी**
स्वामीचे सेवेसी

सेवक **नारो अनंत गद्रे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करावयासीं आज्ञा केली पाहिजे, विशेष. बहुता दिवसीं पत्र पाठविलें तें पावोन संतोष जाहला. यैसेंच निरंतर पत्र पाठऊन सांभाळ करीत असिलें पाहिजे. इकडील सविस्तर **भटजीस** लिहिलें आहे. त्यावरून कळों येईल. चिरंजीव **मोरोपंताचें** आरोग्यतेचें वर्तमान लिहोन पाठवणें. तेणेकरून समाधान होईल. वरकड आपणांकडील व कोकणचें सविस्तर वृत्त लिहित असावें. आम्ही इकडील गुंता जो उरकेल तो उरकून वैशाख मासीं देशास येतों. **जयेगड रत्नागिरीचें** काये वर्तमान जाहलें तें लिहिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे हे विनंति.

चिरंजीव राजश्री **लक्षुमणपंत** व **गोपाळ यास** आशिर्वाद उपरी. तुम्ही पत्रें पाठविलीं तें पावलीं. लिहिला मजकूर कळों आला. **अंजणवेल** (व) **गोवलकोट** घेतला म्हणून लिहिलें तें कळों आलें. यैसेंच हरघडी आपणांकडील व राजकी व कोकणचें वर्तमान लिहोन पाठवणें. मौजे **वरवडे** येथील देवालयें तयार जाहलें कीं न जाहलें हें लिहिणें. मौजे **रीळ** येथील देवलाचें काम चालीस लागलें न लागलें हें लिहिणें. राजश्री **सिवभटजी साठे** यान दोन चार वेला आम्हांस लिहिलें जें, देवल तयार जालें न जाहलें याचें वर्तमान लिहोन पाठवणें, म्हणून लिहिलें आहे, तरी सविस्तर लिहोन पाठवणें. त्याप्रों त्यास लिहोन पाठऊं. वरकड आम्हाकडील वर्तमान तरी येथास्थित असें, आज दोन वरशामध्यें चारसे रुा आपणास पाठवलें तितके वरचेवरी खर्च जाहला. पुढें वैशाख मासीं देशास येतों. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आशिर्वाद. तीर्थरूपास पत्र पाठविलें आहे तें कोकणांत प्रविष्ट करणें, हें अशिर्वाद.

Naro Anant writes to Ramchandra Gopal Kurkare from Berar that he would be coming to you in Vaishakh after finishing the work here. He knew the news of the fall of Anjanwel & Gowalkot, But Karkare did not write whether jayagad & Ratnagiri forts were captured. **Shiwbhat** Sathe inquired with him whether the temple of Varawade was finished & that of Reel begun as he paid the expenses of the erection buildings,

*No. 20* ] **श्री** **चैत्र शुध** १ । १६६७
मार्च २३, १७४५

श्रीमंत राजश्री **बाळंभट** व राजश्री
**विश्वनाथ भट** वैद्य स्वामींचे सेवेसी.

विनंती सेवक **विठल आणाजी** कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील क्षेम ता चईत्र शुध प्रतिपदा पावेतों मुा **नागपुरास** समस्त सुखरूप असो विशेष. स्वामीकडील कांहीं वर्तमान कळ ( न ) नावते. त्यास **तिमाजी** जासूद याज बतवरी समस्तांस पत्र पाठविलीं. तीं ज्याचीं त्यास दिलीं व येथें राजश्री **आपाजी जिवाजी** सुभेदार यांजकडे रुा दरबार खर्चाचे आहेत, ते वसूल करावया बदल राजश्री **नारोपंतांनीं** ठेविलें आहे व **रामटेक** येथील रुपये वसूल जे होतील, ते करून पाठवून. रा नारोपंत येतील तेव्हां घेऊन येतील, कळलें पाहिजे. त्यानंतर हिकडील वर्तमांन तर श्रीमंत राजश्री **रघोजी भोसले सामळपूरच्या** पार गेले आहेत व राजश्री **आवजी कवडय देवगड प्रांतास** येतों ऐसी बोली आहे, कळलें पाहिजे. यानंतर राजश्री **कृष्णाजी वामन चांदेहून** आला नाहीं. आलियावर रुपये मागोन घेतों व राजश्री **माहादाजी केशव** त्यास कुणाबिणीविसीं तगादा लाविला आहे. देतों म्हणतात. देतील तेव्हां रा **नारोपंत** यांचे स्वाधीन करून देऊ. यानंतर सर्व प्रकारें सेवकांवर लोभ करीत गेले पाहिजे. वरकड वर्तमान राजेश्री **नारोपंतीं** लिहिलें आहे, त्या—

वरून कळों येईल. बहुत काय लिहिणें, कृपा लोभ असो दीजे हे विनंती.
राजश्री रामचंद्र गोपाळ स्वामीचे सेवेसी विनंती सेवक विठल आणाजी कृतानेक सां नमस्कार लोभ करीत असिले पाहिजे. हे विनंती.

Vithal Annaji writes to Vaidya brothers from Nagpur th account of his work of money collection and informs that Raghuji has gone beyond Samalpur and Awaji Kawade is expected to visit Deogad side

---

*No. 21* ] श्री चैत्र शु. ११।१६६७
एप्रिल १, १७४५

राजश्री महादजी नाईक गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आळंकृत. रनो सिबाजी च (व) धरी रामराम. विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुमची आज्ञा घेऊन स्वार जाल त्यास कटकास पावला असो. तुम्हांकडील वर्तमान लेहून पाठवण. तेनाकरून समाधान होईल. सटवाजी जासूद मा (क) सुदाबाजेस गेला असावा. रायाजी जा (सू) द हाही राहिला, तो गोळी लागोन मिला. चात्र सुद येकदसी मिला. तुम्हास कलावें. म्हणऊने लिहिल, असो. बहुत काये लिहिणें. विनंती.

हसनकुली सुभा ढकाचा मरला गेला.

Shivaji Chavaddhari writes to Mahadaji Naik from Katak that Satwaji Jasud probably went to Makasudabad ( मुर्शिदाबाद ) and Rayaji Jasud and HasanKuli, Subha of Daka were killed on Chaitraya shudh Yekadashi. The letter contains the language of an illiterate.

---

No. 22 ] श्री वैशाख ८/१६६७

यावर शिक्का व मोर्तब आहेत. मे १२, १७४५

राजश्री **बाळंभट** व राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यासी.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री **रघोजी भोसले** सेनासाहेब सुभा. दंडवत. विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे, विशेष. आम्हांकडील वर्तमान, वराड प्रांतीं असतां वरचे-वर तुम्हांस लिहून पाठविलें होतें, त्यावरून कळलेंच असेल. उप्रांत **देवगड** प्रांतीचा बंदोबस्त कर्तव्य तो करून माघमास सरतां कूच करून **बंगाले** यांसीं चालिलों. ते मजल दरमजल संस्थान **धमतरी** व **रायेपूर** यावरून **संमळपूर** डावे टाकून **कटकचे** सुमारें फाल्गुण सरतां आलों. **कटकची** बातमी मनास आणितां **अलाबर्दीकडील** जमातदार व लोक शहरांमध्यें आहेत हें वर्तमान पोहोंचलियावर **कटक पुढें** तीन मजली राहिले. ते जागा बुलगे मागें ठेवून सडे फौजेनसी लांब मजल करून दुसरे रोजीं फाल्गुण वद्य द्वादसीस प्रहर दिवसां येऊन दाखल जालों. इतकेयांत मोगलांकडील जमातदार वगैरे लोक शहरांत बाहेर होते, ते किलेयांत पळोन जाऊन किला वळकाविला. तेव्हां तेचरोजीं किलेयासीं मोर्चेबंदी करून चौगीर्द मोर्चें चालविले. त्यास किलेयाचें काम व सामान मातबरच होतें, परंतु महाराज राजश्री **स्वामींच्या** पुण्यप्रतापें छ १४ रबिलाखरीं किला फत्ते जाला. मोंगलाकडील किलेदार व लोक यांसी बाहेर काढिलें. याउपरी येथील बंदोबस्त जो कर्तव्य तो करून येथून कूच करून मजल दरमजल **मकसुदाबादेस** जात असो. पुढें जें वर्तमान होईल तें लेहून पाठविलें जाईल. वरकड दरबारीं आम्ही तुम्हाकरितां बेफिकीर असो. रा। छ २० रबिलाखर.+ बहुत काये लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद.

---

+ मधलि अक्षर रघूजींचें स्वतःचे

The details of the capture of Cuttak are given in this letter by Raghoji Bhosale to Vishvanathbhat.

———

*No 23* ] श्री वै व ८।१६६७

यावर रघूजीचा शिक्का व मोर्तब आहेत. मे १२, १७४५

राजश्री **बाळंभट** व राजश्री **विश्वनाथ भट** वैद्य

गोसावी यांसीं.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा दंडवत. विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे, विशेष. तुम्हांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळों येत नाहीं, याजकरितां चित सापेक्षित असे. तरी सदैव पत्रीं संतोषवीत असावे. यानंतर इकडील वर्तमान तरी आम्ही **वराड प्रांतीं** फौजेचा गलब करून मजल दरमजल **बंगालेयासीं** चालिलों. फालगुण मासापासून झाडीचे मुलकांत मार्गी दाणापाणीयाचे अनकूल पाहोन दहा बारा कोसांच्या मजली करीत फालगुण वद्य द्वादशीस **कटका**वर येऊन दाखल जालों. तों **अलाबर्दी**कडील लोक शहरांत होते, ते **कटकचे** किलेयांत जाऊन, किला बळकाविला. आम्ही तेच रोजीं किलेयासीं मोर्चेबंदी करून बैसलों. किलेयांत दारुगोळीं व आरब व बाहलीयांचे सामान मातबर व चौगीर्द खंदकात पाणी बहुत, याजमुळें दोन मासपर्यंत किला भांडला; त्यास महाराज राजश्री **स्वामींच्या** पुण्य प्रतापें करून छ १४ रबिलाखरीं किला फत्ते जाला. **मोंगलां**कडील लोक बाहेर काढिले आणि आपणाकडील ठाणें बसऊन येथील बंदोबस्त कर्तव्य तो केला. याउपरी येथून छ २० रबिलाखरीं कूच करून मजल दरमजल **मकसुदाबादेस** जात असो. तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें असे. पुढें जें वर्तमान होईल तें लेहून पाठविलें जाईल. वरकड दरबारीं तुम्ही आहां. सर्वप्रकारें भरंवसा तुमचा आहे. विस्तारें उपरोधिक ल्याहावें ऐसा अर्थ नाहीं. वरचेवर आपणाकडील वृत्तलेखन करीत जाणें. रा छ २० रबिलाखर.

जाणकीराम, अलावर्दीचा दिवान, त्याचा लेक दुलभराम सांपडला आहे. ईश्वर व राज्याच्या पुनेंकडून बरच होईल. कांहीं चिंता नाहीं. दरबारच्या कामकाजाविसीं तुम्ही कबूल केलें होतें, त्यावरून आह्मी बेफिकीर असूं. जें वर्तमान होईल तें वरचेवर लिहून पाठवीत जाऊं. कळल पाहिजे बहुत काये लिहिणें. लोभ असूं देणें हे विनंती. मोर्तब सुद

The capture of Cuttak is reported by Raghoji Bhosale for the informtion of the king. The fort was captured on 6 the May 1945.

---

*No. 21* ] श्री जे. शु ९/१६६७
मे २८, १७४५

आप्पाजी सोमवंशीचा शिक्का व मोर्तब बाटोळा यावर आहे.

छ राजश्री बाळंभट व विश्वनाथभट वैद्य गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री आपाजी सोमवंशी सरलस्कर दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेस. कासिदा समागमें पत्र पा ते छ २१ रबिलाखरीं प्रांत बुंधेलखंड येथें प्रविष्ठ होऊन लेखनार्थ अवगत जाहाला. समाधान जाहालें. ऐसेंच सदैव पत्रीं परामर्ष करीत असलें पाहिजे. यानंतर कितेक अर्थ राजश्री स्वामिस निवेदन केला. दुसरे वरचेवर साहित्य करितच आहों. फिकीर न करावी. राजश्री—स्वामींची ममता पूर्ण आहे. म्हणून तपासिलें लिहिलें. ऐसियासीं तुम्ही सर्वस्वें प्रसंगीं असतां ममता असेलच. पत्रीं उपरोध काये लिहावा. तुम्हां वेगळे आणिक मायावदी आमचे कोणी दरबारीं आहेत कीं काये? पहिल्या पासून भरोसा तुमचाच आहे. राजश्री स्वामीचीं तीन चार पत्रें राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांसी आलीं तीं प्रविष्ट केलीं. गोवल कोटचा मजकूर लिहिला तो कळो आला. ऐसीयासी आमचा प्रसंग

चोकडून कोणे रितीचा जाहाला आहे, मसलत कांही द्रव्यावांचून होत नाहीं महाल मुलुकचा प्रसंग तुम्ही जाणतच आहा. धण्यांनी चाकरी सांगितली, न करावी येसें नाहीं, परंतु ये प्रसंगी कांही अनकूल होत नाहीं. तुम्ही प्रसंगीं येविसीं साहित्य करून आम्ही ये. तोपावेतों राहावणें. दर्शनानंतर मग जो अर्ज करणें तो तुमच्या विचारें करून. मुख्य गोष्ट तुमची आमची भेटीनंतर सार्थल्यार्थ कलोन जें कर्तव्य तें केले जाईल. प्रस्तुत लस्कर **मालव्यात** आलें आहे. मजल दरमजल येत आहेत. यांसि च्यार रोज गुंता जाहला तर आम्ही पुढे येऊं. श्रावणमासीं देशास येणें होईल. तुमचा खासगत गुंता किंचित कांहीं राहिला असेल, तोही विल्हेस लागेल. दुसरा विचार तुम्हांठायीं नाहीं. समाधान असो द्यावें. हा कामकारभार अवघा तुमचा आहे. कळेल त्या रितीनें साहित्य केलें पाहिजे. रा छ. ७ जमादिलवल बहुत काय लिहींणें लोभ असो दीजे. हे विनंति. मोर्तब सुद.

This letter is an answar of Somavansi to Vaidya brothers' letter of 2-5-1745 received in Bundelkhand when he was with Nanasaheb Peshwe, for the invasion of Bhelsa.

---

No 25 ] श्रीगजानन जे व. ५/१६६७
जून ८,१७४५

तीर्थस्वरूप राजेश्री **बाळाजीपंत भाऊ** स्वामी
वडिलांचे सेवेसी.

आपत्ये **रामचंद्र विठ्ठल मनोहर** मु॥ हमेद कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील क्षेम ता। **जेष्ट** वदी ९ सुखरुप असो विशेष. तुम्हांकडील कांहीं वर्तमान कळत नाहीं तरी येसें न करावें सविस्तर लिा पा।. आम्हांकडील वर्तमान राजश्री **विश्वनाथभट** यांचे पत्रावरून सविस्तर कळेल आम्ही सुखरुप असो. पुढें **बंगालेयासी** जावे लागेल. घरीं लिहिणे **मातुश्रींचें** व त्याचें सविस्तर वर्तमान लिहिणें. हे विनंती.

रा कृष्णाजीपंत काणे यासि नमस्कार. लिा पारिसिजे. आमचे घरीं कळविणें कीं, समस्त सुखरुप आहेत.

Ramchandra Vithal Manohar writes to Balajipant from Hamed that the letter written by Vishvanathbhat Vaidya must have given you all details. He will have to go to Bengal, He therefore requests him to inform him of the well-being of his mother and other persons of his family.

---

*No. 26* ] श्रीगजानन ज्येष्ठ व. ५।१६६७
जून ८, १७४५.

श्रीमंत राजश्री बाळंभट व तथा
रा विश्वनाथभट वैद्य स्वामीचे सेवेसी.

विनंति सेवक रामचंद्र विठल व बाळाजी हरी मुा रतनपूर वगैरे कृतानेक सां नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल ता ज्येष्ठ वदि पंचमी जाणवून स्वकीये कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष. स्वामीचे आज्ञे प्रों येथें आलों. देशांतून शिबंदी ठेऊन आणिली आणि नागपुरास प्यादे वगैरे ठेऊन आणिली. येथें आलियावर येथील वर्तमान मामलेयाचें वृत तुम्हांस पूर्वी येक दोन वेळां लिा. त्याजवर सविस्तर कळलेंच असेल. मुख्य कीं, रसदेचा अथवा येथें सिबंदी लोकांचें कर्ज घेतलें, त्यांसी द्यावयासी येक पैसा आला नाहीं. श्रीमंत राजेश्री रघोजी बावांनीं बंगाले–यासी जात्ये समयीं रा मोहनसिंगास सांगितलें कीं, यासी पंचवीस हजार रुा देणें. त्यांणीं येथे अद्यापि आम्हांस पैसा दिल्हा नाहीं. येथील वसूल जाहाला नाहीं म्हणावें तरी निमे वसूल जाहाला. परंतु आम्हांस देत नाहीं. जो वसूल जाहाला तो रा विसाजीपंत खासनिवीस यांचे गुमास्ते व जगदीसगीर गोसावी यांचे गुमास्ते आहेत, त्यांसी देतात. आम्हांस खर्चासही प्राप्त होत नाहीं. येथें महागाई बहुत आणि आम्ही कर्ज हरकोठें मागावें, तरी येथील सावकाराचा विचार शंभराचें खत द्यावें

आणि पाऊणसे घ्यावे, ऐसें विपत्य आहेत. ऐसेंही मिलत नाहीं. आम्हांस तुम्हीं व आमचे प्राक्तनानें येथें आणिलें, आणि पुढें तुम्हीं आम्हीं उगवून येऊं, ती **गोष्ट** करणें. येथें ज्याचें वासिले आहेत, त्यासी पैसा प्रविष्ट पावतो आणि आमचे साथ करणार तुम्हीं तेथे. ऐसा विचार आहे. **बंगालेयाचे** वर्तमान **कटक** घेतलें. साल मजकूर छावणी जहाल. पुढें आम्ही **बंगाले**-यासीं जावें कीं देशास तुम्हांजवळ यावे, हें लिहीले पाहिजे. हे जासूद येतील तेव्हां आम्हांस पत्र व श्रीमंत **बाबासाहेबास** व रा **कोनेरपंतांस** व रा **मोहनसिंग** यांस ऐसें पत्र पा पा. तुम्हांस **सरूसेन नवागडास** मोगलीचा सनदा दिल्ह्या त्या सनदा रा **मोहनसिंगास** दिल्ह्या. त्यानें साफ जाब दिल्हा कीं, आम्ही गांव देत नाहीं. त्याचेही त्यासी ताकीद लिहीली पा. आम्ही बहुत ल्याहावें तो स्वामीस सूज्ञ आहेत. बहुत काये लिहिणें हे विनंति.

रा रामचंद्रपंत दाजीस सां नमस्कार. लिहील परिसिजे.

Ramchandra Vithal and Balaji Hari Manohar write to Vaidya brothers from Ratanpur that Mohansingh did not pay them Rs 25000 as settled, Cutak was captured by Raghoji who intends to go to Bengal. They want advice whether they should accompany him or return.

---

*No 27* ] श्री जेष्ठ ।१६६७
जून , १७४५.

श्रीमंत राजश्री **बाळंभट** वैद्य स्वामींचे शेवेसी.

आज्ञाधारक **खंडो मल्हार** कृतानेक सां नमस्कार विज्ञापना.

राजश्री **विस्वनाथबावास** देवी निघाल्या. ऐसें वर्तमान आईकिलें, त्यावरून चिंता आहे, आरोगतेचें वर्तमान लेहून पाठवावें. राजश्री **दाजीपंत सातारा** आले. राजश्री **पंतास** च्यार गोष्टी गोरवाच्या सांगोन ते मामला करार करीत असिले अगर निरोप देत असिले तरी भाव मनास आणून उतर पाठऊन द्यावें.

मामला जाल्याखेरीज पतपाव होऊन आम्हांस अन्न मिळत नाहीं. याजकरितां स्वामींनी आमच संरक्षण केलें तैसें सार्थकता करून मामला हरयेक होऊन येईल ऐसें करावें. आमचे घरच्या देवी निघाल्या. त्याचा दगा कारला म्हणजे सेवेसी येतों. गुंता वारून देऊन. परंतु बलावणेयाचें पत्र राजश्री पंत पाठवीत ऐसें करून इजत गेली ते उभी करून द्यावी. आम्हीं तुमचे शरणांगत. शरणांगतास मरण चिंतील कोणी? त्यास खावंद स्वामी अन्नास लाविलें पाहिजे, बहुत काय लिहिणें कृपा लोभ असो दीजे. हे विनती.

This letter of Khando Malhar of Prachandgad gives the news that Vishvanath bhat was suffering from small pox. Shivram Tukadeo communicates the same news in in his letter of 19-6-1745.

---

*No. 28* ]

श्री

श्री राजा शाहुच
रणी तत्पर रघुनाथ सुत
वीश्वनाथ नीरं
तर

शिक्का व मोर्तब दुहेरी लंबगोल आहेत.

१४ जमादिलाकर
आषाढ वद्य ३। १६६७.
जुलई ७, १७४५.

अजस्वारीं राजश्री बालाजी रघुनाथ व विसाजी रघुनाथ वैद्य ता। मोकदमानी मौजे वाकी पा। सुपे सु॥ सीत आर्बैन मया व अलफ. मौजे मारचे पाटील व कुलकर्णी हुजूर येणें म्हणोन पेशजी रोखे केले होते. त्यास दामाजी संकर याचा *उजूर करून आला नाहीं. त्याची गत जाहाली ती तुम्हांस कळली आहे, तरी ह्याउपरी देखत रोखा पाटील कुलकरणी गुदस्ताचा हिसेब घेऊन देखत रोखा येणें. नसता उजूर करून न आला. तरी जी गत दामाजी संकराची जाहाली तैसी तुमची होईल.

---

* आक्षप, तक्रार.

दोनदोनसे रुपये मसाला करून हुजरे पाठवूं, तेव्हां श्रमी होऊन याल. यैसें न करणें. लौकर येणें. या कामास संभाजी कदम व सटवाजी मोरे पाठविले. यासी मसाला रुपये ५ पाच देणें. जाणिजे. छ १४ जमादिलाकर ( मोर्तब सुद )

This is an order of Vaidya brothers sent to Mukadam of the village of Waki in the Supa division warning the Patil and Kulkarni of the place for their absence and sending them without any excuse, with the accounts of the revenue collection, they will have to suffer the same fate as that of Damaji Shankar for disobedience. There are many orders of this kind, showing that Mukadam was quite a different watandar, other than patil In the list of watandars of the village, prepared in the British rule, there is no Mukadam.

---

*No. 29* ] श्री आषाढ वद्य १०।१६६७
जुलै १३, १७४५

राजेश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बाळंभटबाबा** व ताा राजश्री **विश्वनाथभट बाबा** स्वामीचे सेवेसी.

सेवक **विसाजी गोविंद** साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथिल क्षेम ताा आषाढ वद्य १० पावेतों मुाा **नागपूर** स्वामीचे कृपेकरून सुखरूप असो विशेष. स्वामीकडून सांप्रत कागदपत्र येऊन संतोषाचें वर्तमान कळत नाहीं, तर यैसें न करावें. सदैव कृपा करून पत्र पाठऊन सांभाल करीत असावें. तेणें करून संतोष होईल. मागें महाराजाकडील हुजरे पैक्याची हुंडी करून वार्तिकाबरोबर पत्र देऊन स्वामीकडे पाठविले. पावले असतील. ×(फाटले) वर्तमान श्रुत जाहलें आसेल. सांप्रत श्रीमंत × × की याप्रांताहून मजल दरमजल कटका

---

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा.

× × × मजकूरीं मोर्चेबंदी केली, परंतु किलेयांत सामान × × × × असतां दोन मास लडाई करून छ १४ माहे रबिलाखरीं किला फत्ते करून आलाबर्दिकडील दिवाण जानकीराम याचा लेक दुलभराम हस्तगत करून तेथील बंदोबस्त करून दुलभराम यासी समागमें घेऊन मजल दरमजल मकसुदाबादेस गेले. यंदा छावणी त्या प्रांतीं जाहली यैसीं पत्रें श्रीमंतांचीं आलीं. तेंच बजिनस जासूद पत्रें देऊन स्वामीकडे पाठविलें आहे. श्रीमंतांचीं पत्रें स्वामीस व सर्वांस आहेत. त्यावरून स्वामीस अवगत होईल. यंदा ईश्वरीकृपेंकरून श्रीमंत विजयी होतील यैसा विचार आहे. स्वामीस कळावें म्हणोन सविस्तर लेखन केलें आहे आण– खीही मागाहून श्रीमंतांकडून पत्रें आलीं म्हणजे तेच क्षणीं सविस्तर वर्तमान स्वामींचे सेवेसी रवाना करितों. +बहुत काय लिहिणें हे विनंति.+

An important letter describing the movements of Raghuji Bhosale into Bengal after he had captured Cuttak on 6-5-1745.

---

*No.* 30 ] श्री आ. शु ७। १६६७

(शिक्का व मोर्तब तुळाजी आग्रे याचा पद्मदलसम) २४।७।१७४५

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री तुळाजी आंगरे सरखेल यांणीं मा। माहादाजी रघुनाथ व लक्ष्मण विठल व तुको विठल उपनांव खंडकर फगेर देशकुलकर्णी तपे सांवर्डे प्रांत दाभोल सुमासीत आर्बैन मया व अलफ. दिल्हें वतनपत्र यैसें जें, तुम्हांमधून माहादाजी रघुनाथ यांणीं जंजिरे विजयदुर्गचें मुक्कामीं हुजूर येऊन विनंती केली कीं, सांवर्डे तप्याचें देशकुलकर्ण वतन पुरातन आपले वडीलवाडिलापासून अनुभवित आलों. मधें अंजनवेल जागा हबशानें घेतला. त्याच्या उपद्रवामुळें वतनावरी टिकाव न होई, तेव्हां आपले वडील परागंदा होऊन वरघाटें गेले. सांप्रत अंजनवेल जागा साहेबीं हस्तगत केला, साहेब कृपाळू होऊन आपली वतनावरी स्थापना

करावी म्हणून विदित केलें, व पुर्वील थोरले व कैलासवासी राजश्री-स्वामी यांचे कारकिर्दीचे कागदपत्र व आलाकडील पत्रें आणून दाखविलीं. तीं मनास आणून तुम्ही पुरातन वतनदार, तुमची स्थापना वतनावरी करावी, उचित जाणोन तुम्हांस वतनसमधें हक्क, रयेत निसबत गांवगना पुर्वील दाखला कागदपत्रीं दाभोळी लाहारी ५०० पाचशे पनास जाणून त्याप्रमाणें हाली हक चहू लाहारीस रुपयाप्रमाणें रुपये १२५ अेकशें पंचवीस करार करून व सदरहु खेरीज पेशजी सुभाहून माहालचे जकातीस दर बैलास हक्कदारी रुके ८२ दोन करार करून दिल्हे आहेत, त्याप्रमाणें करार करून चालवावयाविषीं किले जयेगडास आज्ञापत्र सादर केलें असे, व या वतन समंधें तुम्हांपासून हरकी रुपये ३७५ तनिसे पंच्याहात्तर हुजूर पोता वसूल घेऊन, हें पत्र भोगवटियास सादर केलें असे, तरी तुम्ही आपलें वतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप राहणें जाणिजे. रा। छ ५ माहे रजब पा। हुजूर ( लेखन सीमा ) बार.

An order of Tuloji Angie to the officers of Jayagad to continue the vatan of Khandkars as settled by the Shahu Chhatrapatti at their request

---

*No. 31* ] श्री. श्रा. शु. ७। १६६७
जुलै २४, १७४५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालंभटबावा व तथा राजश्री विश्वनाथभट बावा स्वामींचे सेवेसी.

सेवक भिसाजी गोविंद सां। नमस्कार विनंती, उपरी येथील कुशल ता। श्रावण शुध ७ पावेतों मु। नागपूर सुखरूप असो विषेश. स्वामींनीं कृपा करून पत्रें पाठविलीं तीं पावोन समाधान जाहाले. यैसेंच सदैव पत्र पाठऊन सांभाल करीत असिलें पाहिजे. यानंतर बापूजी अनंत यांजबरोबर महाराज स्वामींचीं वस्त्रें व हातरोखे पाठविले, त्यांस वस्त्रें श्रीमंत राजश्री बाबा साहेबांकडे रवाना करावीं, तरी पंथ दूर

बहुत, याजकरितां येथें ठेविली आणि स्वामींचीं पत्रें व महाराज स्वामींचे हातरोखे श्रीमंताकडे जासुदाबरोबर देऊन रवाना केलीं आहेत. श्रीमंत व तीर्थरूप या प्रांतीहून गेल्यापासून **कटकच्या** किल्ल्यास मोर्चेबंदी दोन मास करून, जेर होऊन छ १४ राखर किल्ला फत्ते करून, **अलाबर्दीचा** दिवाणाचा पुत्र धरून, तेथील बंदोबस्त करून, मजल दरमजल **मकसुदाबादेस** गेले. म्हणून **श्रीमंत** व तीर्थरूपांचीं पत्रें छ २० माहे राखरचीं आलीं, तीं बजिन्नस जासुदाबरोबर देऊन स्वामींचे शेवेसी पाठविलीं. तीं पावोन साकल्य वर्तमान स्वामींस श्रुत जाहालें असेल. मागाहून दुसरीं पत्रें आलीं म्हणजे ते क्षणीं साकल्य वर्तमान लेखन करून स्वामीकडे पाठवितों. या प्रांतीं गांवखेडीं आहेत. त्याविसीं स्वामींनें हरवडी लिहिणेंसे काये आहे. सर्वस्वें मी स्वामींचे पदरचा सेवक आज्ञांकित असे. चिरंजीव राजश्री **उधोपंत** व मूल तेथें आहेत. त्यांचा वडीलपणें परामृश करीत असिलें पाहिजे. विस्तारें लिहीणें, तरी सर्वजाण विवेकी सूज्ञ असा. + बहुत काये लिहीणें, कृपा लोभ असो देणें हे विनंती +

---

+ मधोल मजकूर लेखकाचे हातचा

Visaji Govind communicates to Vaidya brothers some details of Raghuji's expedition into Bengal.

---

*No 32* ] **श्री** श्रावण वद्य १। १६६७
ऑगस्ट २, १७४५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बालंभट** तात राजश्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यांसी.

सेवक **कोनेरराम** नमस्कार विनंति, उपरी. येथील क्षेम तात श्रावण वद्य प्रतिपदा मुकाम नजीक **रामगड** समस्त सुखरूप असो विशेष. तुम्हांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलों येत नाहीं. तरी सविस्तर लेखन केलें पाहिजे. यानंतर **कटकचे** मुकामींहून चैत्रमासीं तुम्हांकडे पत्रें पाठविलीं

होतीं, त्यांवरून सविस्तर कळलेंच असेल. त्यानंतर **कटकच्या** किल्ल्यांत ठाणें ठेऊन, तेथील **बंदोबस्ती** करून **मकसुदाबाद** प्रांतें आलो. त्यास **बंगालें** प्रांतें पर्जन बहुत याकरिता **बर्दवान** कसबा येथें येऊन मुकाम केला. त्यावर नवाब **अल्लावर्दी** यांणीं वकील पाठविला आणि **तहाचें** राजकारण केलें त्या-वरून त्या वकिलासमागमें राजश्री **निलोपंतांस** रवाना केले, आणि **वर्दवान** प्रांतें चिखल बहुत, याकरितां डोंगरचे सरदेस **रामगड** प्रांतें आलों. त्यास **निलोपंत** येक महिना **मकसुदाबाजेस** होते. ऐसी— यासी रदबदलीमुळें बोलीचा बनाव न बसे. याकरितां मानिले निरोप घेऊन लष्करात आले. सविस्तर वर्तमान निवेदन केलें. त्यास या प्रांतें दोन मास छावणी करून, दसरियास कूच करून, **मकसुदाबाजेस** जाऊन, **तांब्राचें** पारिपत्य करावें हा सिद्धांत आहे. वरकड सविस्तर अर्थ श्रीमंतीं लिहिला आहे, तो ध्यानास आणून त्याप्रमाणें पैरवी केली पाहिजे. दरबारचे बंदो-बस्ताविषयीं तुमचे भरोसियावर बेफिकीर असो. वारंवार ल्याहावें ऐसा अर्थ नाहीं. वरचेवर स्वाचे चाबसाल व दरबारचें सविस्तर वर्तमान लेहून पाठवणें.+ बहुत काये लिहीणें. लोभ असो दीजे हे विनंति.+

+ मधील अक्षर लेखकाच्या हातचे.

Graphic details are given in this letter of Raghuji Bhosale's campaign in Bengal

---

*No. 33* ] **श्री** **श्रावण व. १०।१६६७**

ऑगस्ट ११, १७४५

राजाश्रियाविराजित राजश्री **रामचंद्रपंत** स्वामीचे सेवेसी.

सेवक **नारो अनंत** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता। श्रावण वद्य दशमी मुकाम **नागपूर** जाणून स्वकीये लेखन करीत असलें पाहिजे. विशेष स्वामीकडील वर्तमान बहुत दिवस कागदपत्र येऊन कळत नाहीं तर ऐसें नसावें हरवडी आलिया माणसाबा पत्र सविस्तर वृत्त लिहीत असिलें पाहिजे. सालमजकूरीं इकडील कामकाज

कांहीं होत नाहीं. बंद जाहलें आहे पुढें काये होईल तें पाहावें. राजश्री **रघोजी बावाची** अवकृपा विदित आहे. राजश्री **वैद्य बावा** या प्रांतास येतील तर सर्व कामकाज होऊन येईल. नाहींतर कांहीं होत नाहीं. वरकड सविस्तर वर्तमान भटजीस लिहीलें आहे त्याजवरून कळों येईल. कोंकणांतील कोणी आलें असिलें तर आमचे घरचें वर्तमान लिहीलें पाहिजे. हालीं पत्र कोंकणांत पाठवावयास पाठविलें आहे तें कोंकणांत पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहीणें लोभ असो दीजे हे विनंती.

Naro Anant Gadre writes to Ramchandra Gopal Karkare from Nagpur that owing to the displeased attitude of Raghuji towards Vishvanath Bhat, it is difficult to work here. His presence in this part of the country was therefore necessary.

---

*No. 34* ] श्री भाद्रपद, १६६७
ऑगस्ट., १७४५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथभट वईद्य** बावा स्वामी गो यासीं.

सेवक **केसो त्रिंबक** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुषळ जाणून स्वकीयें कुषळ लिहीत गेलें पाहिजे, विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें, त्याजवरून बहुत समाधान जाहालें. यैसेंच निरंतरी पत्र पाठवून परामृष घेत असलें पाहिजे. विशेष दरबारचें वर्तमान सांप्रत कळत नाहीं. याजकरितां हें पत्र आपणास लिहिलें असे तरी श्रीमंत **महाराज स्वामी** व सौभाग्यवर्ती **मातुश्री बाईसाहेबांचा** आशई कसा आहे व राजश्री **श्रीनिवास पंडित** याचा मनोदये कसा आहे हें सविस्तर आपण लिहीलें पाहिजे. आपण दरबारीं आहेत, तेथें चिंता काई आहे ? दरबारचें वर्तमान सविस्तर लिहिलें पाहिजे. आम्हांस श्रीमंत राजेश्री **सरखेल** साहिबी **गोपाळदुर्गास** ठेविलें आहे. येथील आमल **शामलाचे** वेळेस चालत होता, त्याजप्रमाणें सुदामत चालवावा लागतो. त्यास दरबारी कोणी कांहीं म्हणतील, तरी आपण तेथें आहेत, वरचेवरी परिहार केला पाहिजे,

कर्नाटक प्रांतीं हत्तीं आणावयास गलबतें पाठविलीं आहेत व सा गुराबा व २० गलबतें यैसे आरमार बाहेर स्वारीस गेलें आहे व तीन गुराबा २० गलबतें व वीस महागिरीया यैसा संज करून राजपुरी प्रांतें रवाना केली असेत. आपणांस कळावें म्हणून लिहिलें आसे. बहुत काय लिहिणें, लोभ असो दीजे, हे विनंति.

Tulaji Angres' agent Kesav Trimbak writes to Vaidya brothers to inform him of the news of Shahus' court. He wanted to know the opinion of Chatrapati, the Senior queen and Srinivas Pratinidhi about the actions of Angre. The writer was asked by Angre to manage the affairs as before.

---

*No. 35* ] श्रीशंकर भाद्रपद शु. ११/१६६७
ऑगस्ट २६, १७४५

तीर्थस्वरूप राजश्री **बालंभटजी** दादा स्वामी वडिलाचे सेवेसी.

अपत्ये **विश्वनाथभट** वैद्य कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति, उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. आपणांकडील वर्तमान बहुत दिवस कलों येत नाहीं तरी सविस्तर लिहोन पाठविलें पाहिजे. यानंतर आम्ही अनुष्ठान भाद्रपद शु. ७ समाप्त करून भाद्रपद शुा ११ स्वार होऊन **विजयदुर्गा**(स) गेलों. राजश्री **सरखेलची** भेट घेऊन सत्वरच येतों. चिरंजीव **बाबू भाखजनास** पाठविला आहे. तुम्हीं वरून पालखी पाठवणें, इतकियांत आम्हीं इकडून येतों आणि समागमें येऊं. **आंबरसेट कोंबडा** खाले येईल, त्याजबरोा आपलीं तटें व खचर बैल यैसें पाठविणे. येतें समयीं खालून तांदूळ घेऊन येऊं. वडिलांस कलावें म्हणोन लिहीलें आहे. बहुत काये लिहीणें. लोभ असो दीजे. वरकड सविस्तर वर्तमान लिहोन पाठविणें. **आंबरसेटी**बाा येक माणस देऊन लिाप्राा बैल, खेचर, तटें पाठविणें. + बहुत काये, लिहिणें, हे विनंति.

---

+ या पुढील मजकूर खाशाचे हातचा आहे.

Vishvanath Bhat Vaidya writes to his brother about his journey to Vijaydurg,

---

No. 36 ] श्री छ ६ सवाल
कार्तिक शु. ८ । १६६७
ऑक्टाबर २१, १७४५

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री विश्वनाथ
वैद्य गोसावी यांसी

सेवक बाबूराव सदाशिव नमस्कार. सुहूर सन सीत आबैन मया अल्फ. तुम्ही सेवेस उमेद्वार लिहिणार सरंदाज, शाहाणे पाहोन तुम्हांस फडणिशी सांगितली आसे. तरी इमानें इतबारें राहाणें. ..तुम्हांस वेतन सालिना रुपये १००० येक हजार केलें असे. पावेल. जाणिजे छ ६ माहे सवाल. (लेखनावधी सीमा) बार सरंदाज=बुद्धिवान.

Babuji Naik Joshi confers a grant of 1000 annuity upon Vishvanathbhat Vaidya for the Phadanisi

---

No. 37 ] श्रीसांब कार्तिक शु, १०।१६६७
ऑक्टोबर २३, १७४५.

श्रीमंत राजमान्य राजश्री बाळंभटजी वैद्य ताा
श्रीमंत राजश्री विश्वनाथभटजी वैद्य स्वामींचे शेवेसी.

पोा। आप्पाजी जिवाजी कृतानेक साां नमस्कार विनंति. येथील वर्तमान कार्तिक शुा १० मुाा नागपूर येथास्थित जाणोन स्वामीनें आपले निजानंद लेखन करीत गेले पाा. यानंतर कृपा करून दोनच्यार पत्रें पाा तीं उत्तम समई पावोन बहुत समाधान जालें स्वामीनें आसामीच्या रुपयासाठीं व दरबार खर्चासाठीं लिाा. येशास आमचें वर्तमान मामलतीचें स्वामीस कळावें म्हणोन लिाा आहे. गतवर्षी सातान्याचे मुक्कामीं दोन लक्ष दहा हजार रुाा नगद भरणा करून, श्रीमंत राजश्री रघोजीबावास दिल्हे आणि मामला केला. त्यास आठरा महिने जाले. कुल आज ताा रसदेस भरणा साठ हजार रुा। पावले. वरकड रुपया जो वसूल जाहला, त्याजपैकीं राा विसाजी गोविंद यांचे गुजारतीनें, एक लक्ष दहा हजार सरकारांत नेले व राा मल्लारराम यांही बदले पंच्यासी हजार रुायांचे घालून

पैका नेला. याजखेरीज किल्ल्याचा खर्च सिबंदी पंचेतालीस हजार रुा, समाईक खर्च सव्वा लाख रुा याजखेरीज राज्याचा हिसा निराळा. येणे-प्रमाणें गुाची मामलत जाहली. त्याज उपरी श्रावण मासीं सौावती मातुश्री **सकवार बाईनें** व रा **जानोजी भोसले** व रा **जिवराऊ मोहिते** व रा **तुलजोराम** यांहीं विचार केला कीं. आम्हांकडुन मामला काढून सरकारांत मामला ठेवावा. येक कारकून सरकारचा ठेवावा, जो पैसा येईल तो जमा करून ठेवावा. यैसा विचार पूर्ता करून आम्हांस सांगोन पाा कीं, तुम्ही आपले कमाविसदार बोलाऊन घ्या आणि आमचे कमाविसदारांस आमल करूं द्या. तेव्हां त्यास आम्हीं खरपुस सांगोन पाा कीं, आमचे रुा जो कोणी देईल तो आमल करील आणि धणी तुम्ही जबरदस्त आहां. तुमच्या चित्तास येईल ते करा. परंतु आम्ही शंभर ब्राह्मण येथें आहों, इतके तुमच्या दारापाशीं बसोन प्राणत्याग करून, रुधिरें करून, तुमची कचेरी रक्तांबर करूं, तर आम्ही ब्राह्मण. यैसें पुर्ते विचारून कर्म कर्णें तें करा: म्हणोन सर्वांस सांगोन पाा; आणि आम्ही निसुर कारबार सोडून बैसलों. यैसें दोन महिने समग्र दंगा जाहला. शेवटीं सर्वांच्या चित्तास आलें कीं, हे ब्राह्मण अतत्याई आहेत. हे आतत्याई करावयासी चुकणार नाहींत. यैसें पुर्तें ध्यानास सर्वांच्या आलें. तेव्हां दिपवाळी जाल्यावर आम्हांस बोलाऊन समाधान केलें; परंतु रुा हजार विसेक आणखी गला पडोन घेतलें, तें कबूल केलें. येजातींचें वर्तमान आहे. बालनाइकी, बहुनाइकी, स्त्री-नाइकी यैसी सर्व येकत्र जालें आहे. यैसी यास पुढें ईश्वर काये करील तें पाहावें. रा **पुरुषोत्तम** भटजीच्या व रा **कोनरेपंत** यांच्या इमानावर गुतलों. त्यास **कोनरपंत बंगाल्यांत** गेले आणि **पुरुषोत्तमभटजी** सर्गास गेले. रा **विसाजी गोविंद** येथें आहेत. त्यास कोणी कारभारांत मानितच नाहींत. यैसे प्रसंग जाहला आहे. आतां आम्हांस सर्व प्रकारें अश्रा स्वामीचा आहे. जर स्वामि मनावर धरून अभिमान पुरस्कर आम्हांस उगविता, तर आमची जिनगानी राहत्ये. नाहींतर भटजी ज्या पंथास गेले त्याच पंथास आम्हांस जावें लागेल. यैसे ढंग परिछिन दिसोन आले. यानंतर स्वामीचे दरबार खर्चाचे रुा पैकीं येक हजार रुा तूर्त वरात देविली आहे, ते येका महिन्यानें तुमच्या कारकुनाचे पदरीं पडतील. रुा हजार तेही जमाबंदी

मार्गशीर्ष मासीं करितों आणि तेहि हरतजवीज करून देवितों. आपलें समाधान असो द्यावें. आम्हीं दोन हजार आपल्या सावकारांस उणे देऊं; परंतु स्वामीचे असामीचे व वरातेचे यैसे अगत्यवादें प्रविष्ट करूं, हे निशा आसो देणें. सर्वस्वें स्वामीचा भरोसा धरितों आणि स्वामीस कैसें गैरराजी राखों ? स्वामीस सर्व प्रकारें राजी राखो. कळलें पा।, परंतु स्वामीनें सर्व प्रकारें आमचें अगत्य धरून रा। तुकोराम विनंती करतील त्याप्रमाणें साहित्य पत्रें उत्तम प्रकारें मातुश्री बाईसाहेबांस व रा। जानोजीबावांस व रा। जिवराऊ मोहिते यांस व रा। विसाजीपंतास व रा। तुळजोपंतास यैसी बरें प्रकारें धमक देऊन, ताकिद पत्रें महाराजांचीं व सौभाग्यवती बाईसाहेबांची पा। द्यावीं कीं, उत्तम प्रकारें स्वामीचें रुा। देणें, नाहीं तर हुजरे येतील आणि तुम्हांस श्रमी करतील, यैसें न करणें. यैसीं पत्रें खामखा पाठऊन द्यावीं. येविसीं आनमान न करावा. बहुत काय लिहिणें, कृपा असो दीजे. हे विनंती.

Appaji Jivaji Subhedar of Deogad writes from Nagpur to Vaidya brothers that last year he paid at Satara 2 lacs to Raghuji Bhosale and the Mamlat was secured, During the last 18 months he paid Rs 60000 as Rasad and Visaji Govind paid one lakh and 10 thousands into the treasury Malharram Gharpure took away 85 thousands The other items of expenditure were — Rs. 45000 for fort expenses and one lakh for common expenses In the month of Shravan, S Sakwarbai, Janoji Bhosale, & Jivarao Mohite settled that they should take away his mamlat and keep it for the State and accordingly nformed him to order his Mukhtyar to hand over possession of the villages to their Mukhtyar. He then told them that he would not leave their door. As a true brahmin, he would shed his blood in their house. He did not leave his attitude for two months and in the end they agreed after Divali to pay the money. They wanted Rs. 20000 which he agreed to pay after great reluctance

As to the recovery of money, Konarpant Kulkarni went to Bengal and Purushtotambhat Shevade died One Visaji Govind was in Berar But he lost his influence in the management of the State. His request therefore was to send peremptory letters from the king and the queen, ordering these persons to pay the debt of Vaidyas at any cost.

———

*No. 38* ] श्रीरामचंद्र कार्तिक । १६६७
नोव्हेंबर, १७४५.

सकलगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री **बालंभट** व **विस्वनाथभट** **वैद्य** स्वामी गोसावी यांसी.

पोष्य **भगवंत राऊ रामचंद्र** कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष. अलीकडे आपणा कडील पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तरी ऐसें नसावें. निरंतर पत्रीं सांभाल केला पाहिजे. यानंतर अलीकडे सौ **जिजाबाईसाहेबीं** रा **अर्जोजी यादव** याची उभारणी करून पुत्र म्हणविलें. राज्यभाराचा येखत्यार देऊन फौजबंदी केली. राजश्री **आपाजी सितोळे** व **चिकोडीकर** मेलऊन **इंगलीवर** शह दिल्हा. खंडणी घेतली. तेथून कूच करून **मुरगूड** प्रांतें **कागल** येथें येऊन मोर्चे दिल्हे. **कोल्हापुरा**हून खासा माहाराज धणी लस्करांत नेऊन राजश्री **राणोजी घोरपडे** सेनापती व **निपाणकर** हत्ती-घोडे देऊं करून बोलाऊन आणिले. **मुरगूडचें** ठाणें घेतलें, तेथून मौजे **टीकपुरली** देसकाचा गांव होता, त्यास वेढा घातला. खासा बाईसाहेब **कोलापुराहून भांडें** घेऊन लस्करांत आली. मोर्चे देऊन भांडीयाचे बलें गांव घेऊन ठाणें घातलें. तेथून आम्हांवर शह द्यावा, याअर्थे **मनसबा** केला होता. परंतु लस्करांत दंगा होऊन **सेनापतीचा** रुसवा जाहाला. सेनापती निघोन गेले. **चिकोडीकर येसाणा** व खासा **धणी बाईसाहेबा**सहवर्तमान **कागल** प्रांतें जाऊन टेकुंडी मारिली. खेडें घेतलें. तेथून **काडापाच्या** मठास जाऊन **चिकोडीकरांच्या** संमतें जंगम गोसावी ठेऊन **करवीरास** आले. **चिकोडीकर यमाणा** यासी मोत्याची जोडी व उत्तम वस्त्रें व **बारवाड खेडें,** इनाम देऊन बहुमान करून, निरोप दिल्हा. याप्रमाणें आजी तागायत मनसबा जाला आहे. पुढें आमचा अपाय करावा, सरदारी मोडावी, हा मनोदय **बाईसाहेबांचा** आहे. परमेश्वर दयेनें घडेल तें पहावें. **मनोलीकर** राजश्री **हिंदुराव घोरपडे ममलकतमदार** येऊन बैसले आहेत. राजश्री **दौलतराव** यांसी **सेनाखासखेल** यांची कन्या वधू नेमस्त केली आहे. राव **मामदार** यांकडून धणी यांस पत्रें घेऊन **माहिपाजीराम** व **जीवभट** आले आहेत. माघमासीं लग्नें नेमस्त केलीं आहेत. लग्नाचा समारंभ होईल तो पहावा. सविस्तर अर्थ **महाराजांस** व आपणांस कळावा या अर्थें लिहिला

आहे. निराळें वाटेनें विदित करणें. *आम्ही ब्राह्मण लोक निर्बळी पाहून आम्हांस मोडावें ही वासना धरीत आहेत. तुम्ही आमचे दरबारीं मध्यस्त असोन, थोरले **महाराजाजवळीं** अर्ज करीत नाहीं. उभयेता राज्यांत आमची दाद नव्हे. काये करावें ? कोणास **शरण** जावें ? सर्वत्र अविचार झाला. न्यायेनीति धर्म बुडाला. मोगलाई बुडाली. आम्हां ब्राह्मण लोकांचें संकट परमेश्वरास आहे **महाराज राजे** थोर, समर्थ, दीनबंधु, दिनानाथ, त्रिरुद हिंदुपतीचें आहे. आमचा धावा करावा. आपलें निशाण रक्षावें. तुम्हीं विनंती करणें. कृपा केली पाहिजे हे विनंती. ×

१ तोफ. २ राज्याधारस्तंभ ( किताब ).

* पुढील मजकूर लेखकाचे हातचा.

Bhagwantrao Amatya writes in detail to Vaidya brothers the administration of Jijabai of Kolhapur. She considered Arjoji Yadav as her son and gave him the assistance of Yamanna Chikodikar and Apaji Shitole to capture Murgud, Kagal, Ingali, Tikapurli and exact money. The marriage of Daulatrao Ghorpade was settled with the daughter of Senakhaskhel which will be performed in Magh He requests them to explain Chhatrapati his deplorable condition.

---

*No. 39* ] श्री **सोमवार कार्तिक व. ५। १६६७**

नोव्हेंबर ११, १७४५.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **बाळंभट** व

राजश्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यांसी.

सेवक **कोनेर राम** कृतानेक नमस्कार विनंति. तागायेत कार्तिक वद्य ५ मुकाम नजीक **सहस्राव** येथें सुखरूप असो विशेष. तुम्हांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी येैसें नसावें. सदैव येणारा समागमें पत्र पाठवून संतोषवीत गेलें पाहिजे. यानंतरी इकडील मजकूर तरी येंदां छावणी पांच महिने **बंगाले** प्रांतें कमून **श्रोणभद्रतीर** कार्तिक सुध त्रितियेस उतरोन, प्रस्तुत **भोजपूर** प्रांतामध्यें आलों. असो, इकडील

महिना पंधरा रोजामध्यें कार्यभाग उरकून पुढें **मकारग्राम** प्रांतें जाणार. ईश्वरकृपेंकरून यश येईल तें खरें. तुम्ही दरबारी व चहूकडील वर्तमान साध्यंत मनास आणून सविस्तर लेहून पाठविलें पाहिजे. वरकड सविस्तर वर्तमान इकडील यथास्थित असे. दरबारी बहुत सावधपणें असिलें पाहिजे. तुमच्या भरंवसियावर राजश्री **रघोजी बावा** बेफिकीर असेत. घरीं चिरंजीव मुलें आहेत. त्यांचा समाचार हरघडी घेत असिलें पाहिजे. बहुत काये लिहीणें लोभ असो दीजे हे विनंती.

Details of Raghuji's expedition into Bengal are given in this letter by Koner Ram Kolatkar from his camp at Sahasrav when he was with Raghuji

---

*No. 40* ] श्री सोमवार मार्ग. शु, १३। १६६७
नोव्हेंबर २५, १७४५.

श्रीगणेशाय नमः।

स्वस्तिश्री शके १६६७ क्रोधन संवत्सरे मार्गसिर्षे मासि शुध पक्षे त्रयोदसी ईंदु वासरे जन्म नक्षत्र भरणी चरण द्वितीय शुभंमस्तु **बाबूचें** जन्म नक्षत्र (अपूर्ण)

This gives the date of the birth of Baburao Vishvanath.

---

*No 41* ] **९ जिल्काद.**
श्री **मार्गशीर्ष शु १० शाके १६६७ ते**
**मार्गशीर्ष ब. ९ शाके १६६७.**
नोव्हेंबर ते ६।१२।१७४५.

याद्री स्वारी राजश्री **विसाजी रघुनाथ** श्री **गणपतीपुळें** सुाा सीत अर्बैन मया अलफ माहे जिल्काद छ. ९ ताा

जमा —————————————————— रुपये

२०० छ. ९ रोज **पोतापैकीं** घेतले
२० छ. १० रोज राजश्री **पंताकडील**
१५ छ. २२ रोज शुक्रवार **पंताकडील**
———
२३५

खर्च —————————————————— रुपये

१२॥ मुकाम **पाली** छ ९ रोज
-॥- श्रीखंडेराव यांजपुढें
-॥- दाणा घोड्यास कैली ८८२॥
दर ८।१ प्रों
-॥- पानें विड्याचीं २९००
९ भोई रोजमुरा खर्चास दिल्हे
१ **गंगाजी** खिजमतगार
१ **फिरंगोजी जाधव**
खिजमतगार
१ **लिंबा** खासदार
**३ रायाजी कानटकर** वगैरे
आा ३ हुजरे
———
१२॥

१ मुकाम **चाफळ** छ **११** रोज
रविवार
१८ **श्रीरघुविरापुढें**

२ मुकाम **नाटोसी** छ १४ रोज
२ देणगी नि रा **विष्णुपंत**
१ चोपदार १ भोई
———
२

-॥- मुकाम **मलाघाट** घोडियास
दाणा हरबरे

२ मुकाम **संगमेश्वर** छ **१७** रोज
**१** दाणा घोडियास कैली ८॥
उडीद
१ कर्दन खुर्दा केला रा
———
२

१०॥ मुकाम **आंबेड खुर्द** छ१८ रोज
१० भोई बा।मुशाहिरा
९ किता ९ किता
———
१०
-।।- घोडियास दाणा हरभरे
कैली ८८१
———
**१०॥**

३ मुकाम **कोतवड** छ १९ रोज
२ कुंडास भेठ ठेविली
-।।- भोईसरा बदल दिल्हा
-॥- केसो महादेव कुंडापुढें
———
३ ठेविली

३६॥ मुकाम श्रीगणपतीपुळें छ १९
ता छ २३ रोज मंदवार
१९ श्रीची समाराधना व
लघुरुद्र ब्राह्मणभोजन
वगैरे सामान
१९॥ लघुरुद्राबदल ब्राह्मणांस
दक्षणा रा
१ **फिरंगोजी जाधव**
**१ गंगाजी खिजमतगार**
१ **राणोजी यादव**
दिा **गोसावी**
मोघम खर्चास दिल्हा
———
३६॥

An account of money spent when Visajipant Vaidya visited Ganpati Pule.

———

*No 42* ] श्री २६, जिल्काद.

तुळाजीचा शिक्का व मोर्तब यावर आहेत.

**मार्ग व १३ । १६६७**

डिसेंबर ९, १७४५

राजश्री **विसाजी रघुनाथ गोसावी** यांसी.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य **श्रीतुळाजी आंगरे** सरखेल रामराम विनंती, उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष तुम्ही राजश्री **सिवाजीपंत** समागमें श्री पुळें येथें देवकार्यास आले आहा. ऐशास राजश्री सिवाजीपंत याचे भेटीचें प्रयोजन आहे, याजकरितां राजश्री **आबाजीपंत** पाठविले आहेत. तरी तुम्ही त्यांस जो विचार सांगणें तो सांगोन गुंजाणनां ये जागा दर्शनास अगत्यताच यावें. येथें आल्यावर कितेक अर्थ परस्पर अवगत होऊन समाधान होणें तें होईल. तुम्हीं आलेस(च) आहा, हेंही उत्तम आहे. दर्शनांतीं सविस्तर कळेल. रवाना छ २६ जिल्काद बहुत काय लिहिणें हे विनंती. (लेखन सीमा)

Tulaji Angre invites VishvanathBhat for a personal meeting, from Pule where he had gone.

———

No. 1 श्री पौष १६६७
जाने. ,१७४६

यादी

१ राजश्री **नरहर लक्ष्मण** दि॥ **माहादजी सिंदे** यासि पत्र जें, **महादजी सिंदे** यांनीं पा॥ **जालनापूर** येथें पाईमली व घासदाणा व तसनस फार केली त्यास परगणे मजकूरचा यैवज घेतला असेल तो आपले सरदेशमुखींत मजुरा देणें म्हणून पत्र.

१ रा॥ **हणमंतराव आटोळे** सफेजंगबहाद्दर यांसि पत्र जें, नानाप्रकारें परगणेयांत उपद्रव रोखेपत्र करून करितात तर हे गोष्ट कार्याची नाहीं, तरी फिरोन रोखापत्र होऊन तुम्हाकडून उपद्रव जाहाल्यास कार्यास येणार नाहीं म्हणून पत्र.

१ मौजे **कान्हाटी** पा॥ सुपे हा गांव दरोबस्त राजपत्रीं इनाम आहे, त्यांस रा॥ **बाजी हरी सुभेदार** पा॥ मा॥र यांजकडून बहुत प्रकारचे उपद्रव होतो त्यास पत्र जें, यांचे गांवास हरयेकविसीं रोखापत्र करावयास प्रयोजन नसे म्हणून पत्र फिरोन बोभाट येऊं न देणें.

( 1 ) This is a list of letters that were taken by Vaidya from Shahu Maharaj to 3 persons who were ordered not to show undesirable activities.

---

२२ जिल्हेज
No. 2 श्री पौष व. ८।१६६७
जाने. ४,१७४६

तुळोजीचा शिक्का व
मोर्तब पद्मदलसम
दुरेघी

राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथ भट वैद्य** गोसावी यांस.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य **श्री तुळाजी आंगरे सरखेल** रामराम विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष सांप्रत आपणाकडून पत्र येऊन दरबाचें वर्तमान कळों येत नाहीं तरी सविस्तर लेहून पाठविलें पाहिजे. यानंतर कितेक कार्यभागाचा अर्थ सांगोन श्रीमंत **राजश्री स्वामींचे** सेवेसी राजश्री **विसाजीपंत** पाठविले आहेत. सकल अर्थ राजश्रींचे सेवेसी निवेदन करितील व तुम्हां उभयतां सांगतील, त्याप्रमाणें राजश्री जवळ विनंति करून इकडील जे कार्यभाग आहेत ते उरकून देऊन मशार-नुलेची रवानगी केली पाहिजे. वरकड इकडील कार्यप्रयोजनीं दरबारीं ममता धरि-

जे, ते तरी उचित आहे. तुम्हांवरी वकिलीच सोपिली असतां हरएक प्रसंगास जपोन, समई जाबसालास अंतर करूं नये व न कराल हा भरवसाच आहे. तरी कार्यभागाचे ठाईं तत्परता धरिजेत असिले पाहिजे. येवसीं बहुत काय लिहिणें ! लोभ असों दिल्हा पाहिजे. रवाना छ २२ माहे जिल्हेज हे विनंती. ( लेखन-सिमा )

(2) Tuloji Angre writes to Vaidya Brothers that Visajipant is sent to narrate to Maharaja and to you both, what he wanted from the King and requests that Visajipant should be sent back early. The writer expresses his perfect confidence in Vaidya Brothers that they will not fail to protect his interest in political contested matters.

---

No. 3 श्री पौष व. ८।१६६७ जाने. ४,१७४६

माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे सेवेसी.

सेवक तुळाजी आंगरे विज्ञापना. लोकांनीं गवगवा केला आहे, राजश्री विसाजीपंत यासी निरोप देणार महाराज धनी आहेत विनंती.

---

हें सर्व पत्र स्वदस्तुरचें आहे.

(3) Tuloji requests Chhatrapati to send back Visajipant, his clerk.

---

No. 4 श्री पौष वद्य ११।१६६७ जाने. ६,७४६

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळंभट

व विश्वनाथ भट स्वर्मांचे सेवेसी.

सेवक नारो अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता। पौष वद्य येकादसी जाणून स्वकीयेलेखन करित असिलें पाहिजे. विशेष पिराजी बा। पत्र पाठविल, तेथें आज्ञा जे, कुंभार व वेठे पाठवणें. त्याजवरून वेठे ४ व कुंभार पाठविला आहेत. यांजपासून पंधरा दिवस वेठ घेऊन निरोप द्यावा. कुंभार येकच पा। आहे. यासही बेगार घेऊन निरोप द्यावा. सेताभाताचा हंगाम आहे. पुढें ही आज्ञा होईल तेव्हां येईल. मौजे मजकूर पैकीं संक्रांतीचे तीळ वेठे याजबा। केली ८।१ च्यार पायली पाठविले आहेत. घेतले पाहिजेत. मौजे मजकूरचा गुरव रा। सिवरामपंताकडून सातारेयासी गेला आहे, त्यास त्याचे बोंस बरें वाटत नाहीं. याजकरितां राजश्री पंताकडून त्यास निरोप देवावा. रा। दामाजी शंकर याजकडे हुजुरे

व **देवडीचा** कागद पाठविलात, त्यास **दामाजीपंतांनीं** कागद माघारा टाकिला, घेतला नाहीं. हुजुरे याजजवल बोलिला जे, सालमजकुरीं आपणाकडे तें गाव नाहीं. त्याजवरी हुजुरे मौजे **बराणपुरास** गेले. तेथील पाटील घेऊन **दामाजी**पंताकडे गेले आहेत. **दामाजीपंतांनीं ब-हाणपुरकर** पाटील घेतले, तर **दामाजी पंतासी** हुजुरे कजिया करून महाला घेतील. त्यानें कांहीं पाटिलास आडथळा न केला, तर चौगांवचे पाटील घेऊन **सातारियास** येतील. **दामाजीपंतही सातारियास** येणारे आहे. तेथें आला तर उत्तमच जाहले. तेथें न आला तर फिरोन त्याचें पारपत्य केलें पाहिजे. नाहींतर खेडीं तरी टाकावीं. दोतील एक गोष्ट होई, ती करावी. परंतु याचा कथंला न ठेवावा. राजश्री **पंतप्रधान** यांचे कागद पाठविलेत ते त्यांचे कमाविसदारास दिल्हे. त्यांनीं एक गाय व म्हैस नेली आहे. त्यास म्हैस आणावयास माणूस पाठविले होते. त्यास ते म्हणतात जे, सुभेदार **सातारा** आहेत तेथेंच म्हैस गाई पाठवितों. ते तेथें देतील. यैसें वर्तमान आहे. **आपाजी पाटील वाबळे** यांचें खत तेथें आहे तें पाठवावें, पैका देतो म्हणतात आहे, तर खत पाठविलें पाहिजे. येथें घर बांधावें सारखे आसिलें तर लिहोन पाठवावें. येथें गाडे येणार आहेत. लाकडें घेऊं. सातातुलयाचें घर बांधलें तर तेनसे पर्यंत रुपये लागतील. कळावें म्हणून लिहिले आहे. रा **इंद्रोजी कदम** निा **पंतप्रधान** यांची पागा कसबे **सुपें** येथें आहे, त्याचे काबाडी येथें येऊन गवताविसीं उपद्रव करितात. त्यास **इंद्रोजी कदम** तेथें आहेत, त्याचा एक कागद त्यांचे पागेस पाठविला पाहिजे. वरकड वर्तमान गांवचे येथास्थित असे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे, हे विनंती.

राजश्री **रामचंद्रपंत** स्वामीस साष्टांग नमस्कार. विनंती उपरी. आम्हास खासगत येक पागोटें विकत घेऊन पाठविलें पाहिजे. किमत रुपये ४ पावतों पाठवावें. येथें पागोटें बांधावयास नाहीं, यांजकरितां लिहिलें आहे. हे विनंती.

---

१ बापास. २ तंटा. ३ मजूर.

(4) Naro Anant writes to Vaidya Brothers from Karhati that four labourers and one potter are sent. They should be allowed to come back after a fortnight. The gurav sent by Shivram Tukdeo should be sent back. His father was unwell. The letter contains the information about the revenue collection of 4 villages and the difficulties created by Damaji Shankar. The trouble caused by the labourers of Supa who were taking grass from Karhati for the body of horses belonging to Indroji Kadam, can be stopped by a letter from him to Paga Officer.

No. 5 श्री + शंकर

१० जिल्हेज
माघ शु. २।१६६७
जाने. १२,१७४६

राजश्रियाविराजित राजश्री **नारोपंत** स्वामी गोसावी यांसी.

सेवक **बाळंभट वैद्य** नमस्कार विनंती उपर तुम्ही तील पाठविले ते पावले. गावचा मजकूर लिहिला, त्यास **देवडीचे** ताो हुजरे आले. राजश्री **स्वामी**कडील हुजुरे पाठविले आहेत त्यांचा मजकूर काय होईल तसें लिहून पाठविणें. मौजे **कान्हाटीचा** पाटील पाठवणें म्हणून लिलें, त्यास राजश्री **स्वामीचे** घरचें लग्न जालें. म्हणजे त्यास निरोप होईल. घोडियांची निगादास्त करणें. रा छ ३० जिल्हेज बहुत काय लिहिणें. हे विनंती मौजे मजकूरची रसद पाठवणें दाणे जोरी व सजगुरे खा १०० संमराचे घेऊन पाठवणें + हे विनंती.

+ पुढील मजकूर लेखकाच्या हातचा

(5) This letter must be at the time of S. Gajarabai's Marriage.

---

No. 6 श्री

१ मोहरम
माघ शुध ३।१६६७
जाने. १३,१७४६

तुळोजीचा शिक्का व
मोर्तब पद्मदलसम
दुरेघी

राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यांसी.

छ सकलगुणालंकरण अखंडीत लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नों **तुळाजी** **आंगरे सरखेल** रामराम विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष सांप्रत पत्र येऊन कुशलार्थ कळो येत नाहीं, तरी सदैव पत्र पाठवून समाधान पावविलें पाहिजे. श्रीमंत राजश्री **स्वामीचे** सेवेसी लग्नसमारंभनिमित्य तुस्त व सामान देऊन राजश्री **विसाजीपंत** पाठविले आहेत. हे कितेक कार्य भागाचा अर्थ सांगतील. त्याप्रमाणें उरकून देऊन रवानगी केली पाहिजे. तुम्हांस शंक्रमणयुक्त तिलशर्करा खले दोन पाठविल्या आहेत. घेऊन प्रविष्ट जाहल्याचें प्रत्योत्तर पाठविलें पाहिजे. येविसीं बहुत काय लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे. रवाना छ १ माहे मोहरम हे विनंती. (लेखन सिमा)

(शिक्का:) श्री ०
श्रीशाहुनृप
हर्षेण सरखेल स
मुन्नतेः तुलसिंहस्य
मुद्रेयं सर्वोत्क-
र्षेण राजते.

(6) This is a letter by Tuloji to Vaidya Brothers. He sends Tilgul for Shahu. On the letter there is the seal of Tuloji in which he is called Sarkhel.

---

No. 7 श्री १ मोहरम
माघ शु. ३।१६६७
जाने. १३,१७४६

तुळोजीचा शिक्का व
पद्मदलसम मोर्तब
दुरेघी

पुा राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यासी.

रामराम विनंति उपरी. राजश्री **सिवाजीपंत** यांची भेटी **रत्नागिरीचे** मुकामीं जाहाली, तेसमई बोलाचाली जाहाली, तेव्हा तुम्ही होतेस, तरी बोली-प्रमाणें **माहाड प्रांतीचे** हातरोखे व दक्षण प्रातीचे मनसबे यांचा विचार दोन्ही गोष्टींचा करार करून मशारनुले व तुम्ही गेलेत. याकरितां हें पत्र आपणास लिहिलें आहे. तरी **सिवाजीपंतास** सांगोन केले करारा प्रॉो हातरोखे व पुढें कर्तव्य मनसबयाचा विचार केला पाहिजे. येविसीचें सविस्तर सांगोन राजश्री **विसाजीपंत** पाठविले आहेत. हे सर्व अर्थ सांगतील. त्याप्रमाणें कार्यभाग उरकून दिल्हा पाहिजे. रा. छ १ माहे मोहरम बहुत काय लिहिणें हे विनंति. ( लेखन सीमा )

(7) Tulaji requests Vishwanathbhat Vaidya to carry out what was discussed and settled at Ratnagiri. He sent Visajipant to him for that purpose.

---

No. 8 श्री ६ मोहरम
माघ. शु. ८।१६६७
जाने. १८,१७४६

तुळोजीचा शिक्का व
मोर्तब पद्मदलसम
दुरेघी

राजश्री **विसाजी रघुनाथ** गोसावी यासी.

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेोा। **तुलाजी आंगरे सरखेल** रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणें विशेष. पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लिा वर्तमान कळों आलें. भेटीस यावें की काय म्हणोन लिा तरी खासा स्वारी **जयेगडी** लौकरच होईल. तेव्हां भेटी होईल जाणिजे राा छ ६ मोहरम ही विनंती. ( लेखन सीमा )

(8) Tuloji Angre Promises to meet Vishvanathbhat at Jaigad.

---

No. 9 श्रीरामचंद्र माघ १६६७
जानेवारी १७४६

पुरवणी राजश्री **वैद्य** उभयतांस नमस्कार.

विनंती उपर राजकी वर्तमान तर,

रा **दौलतराऊ घोरपडे** व सौ. **मानुबाई** लग्नास **कोलापुरास** आली सौ **साहेबी** व खासा **धणी** यानीं लग्नकार्य केलें. समारंभ खर्च वेच बराच केला. परंतु बोली प्रों परिणाम नाहीं. वतनी खेडीं इसाफती कदीम दिलीं नाहींत, यामुळें रुसवा करून दिलगीर होऊन गेले. रायेजादे यांची कन्या वधू होती. आणून दुसरें लग्न केलें, आणि आपले श्वथ(स्थ)सलास गेले. सर्व राज्यभार **बाईसाहेबावर** व **अर्जोजी यादव** यांवर आहे. धनी करितील ते होईल.

हे विनंतीपर हुजुल.

राजश्री **गंगाधरपंत सातारा** आले होते, **श्रीपतराया** पासीं मागोन **माहाराजा** पासीं आणिले. **प्रतिनिधी** व **पेशवाई** देतों येसें मान्य केलें. सेवटीं दोन मास ठेऊन कर्जदार करून आशा दाखऊन फजित पाऊन निरोप दिला. ते **विशाळगडास** गेले.

**सोंधेकर** व **वाडीकर सावंत** व **गोविंद ठाकूर** येकत्र होऊन **अणाजी परभू** यांसी दगा केला. गोवेकरांनीं **अणाजी परभूस** धरून नेले. **गोविंद ठाकूर** याची दाहावीस घोडीं गेलीं पळोन. वरघाटे आले. येणेंप्रों विचार आहे. **माहाराजास** विदित करणें.

(9) This whole letter is in the Bhagwantrao's handwriting. He gave the news of Kolhapur affairs during the regime of Rani Jijabai. The marriage of Daulatrao Ghorpade took place. She was guided by Arjoji Yadav. Gangadharpant Pratinidhi was called to Satara and promised to get the Pratinidhipada and Peshwai. He stayed there for two months and returned to Vishalgad disappointed without getting anything. Bhagwantrao requested Vaidya Brothers to inform Shahu Chhatrapati of the mal administration of Kolhapur.

No. 10 श्रीरामचंद्र ईश्वराची माघ १६६७
फेब्रुआरी। १७४६

सकलगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री **बाळंभट** व राजश्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यासि—

पोष्य **भगवंतराऊ रामचचंद्र** कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुसल जाणौन स्वकीये लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. तुम्ही रा **संभाजी पडवळ** याजबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. व **माहाराजाचे** पत्राचें उतर पाठविलें तेंही पावलें. लिहिलें वर्तमान कळों आलें आम्ही उदंड लिहिलें तथापि दरबारीं राज्यांत आम्हा लोकाची दाद मनसुबी नाहीं, हें दुख कोणास सागावें ? श्री परमेश्वरावर भार घालून काळ घालवीत आहों. लग्नास दिवस थोडके उरले. लौकर येऊन कार्येसिधी करावी म्हणवून तुम्ही लिहिलें. यैसीयासी आमचा विचार आहे तो आपणास ठावकाच आहे. नातवानीमुळें सर्वही प्रतिकूळ आहे हें तुम्ही जाणत आहां. कर्जवाम तुम्ही देऊन खासा येऊन लग्नाचें साहित्य कराल तरी लग्नकार्य सिधीस जात आहें. आमचे सखे ईष्टमित्र अवघे तुम्ही आहा. तुम्ही मनावर घेतले पाहिजे. **सातारीयासी** यावे तरी तूर्त येता नये. सनेश्वर येऊन पुढें आडवा उभा राहिला आहे. याजस्तव दर्शनास आलो नाहीं. दर्शनार्ती सकल अर्थ कळेल. राजश्री **संभाजी पडवळ** सांगतील त्याप्रमाणें स्वामींनीं कर्जाचे
+
साहित्य करून दिल्हें पाहिजे. सर्व भरवसा आपला मानिला आहे तुमचे वडिली आमचा सांभाळ केला, ईमान शफत दिली; त्यांचे जागा तुम्ही आहा; तुम्ही शफत दिली; सांभाळ केला; दरबारीं फडी आहा; बोलाचाली करिता; परंतु आमचे ऊर्जित होऊन मनोरथ सफळ न जालें. अम्हा जवळीं टका नाहीं निर्बलीमध्यें ब्राह्मण लोक; आगत्य कोण धरितो ! आमचे सारथी सरदार मराठे, वेगवसिलातीचे लोक कदीम आवघे मेले, गेले. कथा बाकीस उरल्या, भारत भागवते व रामायणे कथा जाल्या. श्रवण करून सार्थक नाहीं. तैशा कदीम राज्यांतील पाया, चालचर्या, निर्फळ जाल्या. हालीं चालतें हेंच खरें आहे. आमचे ब्राह्मण लोकांचे संकट परमेश्वरास आहे, तो धावा करील, दुसरा उपाय नाहीं, तुम्ही ये समई कर्जवाम देऊन समये रक्षावा. लग्नकार्य करून द्यावें. स्वामीचें कर्ज [1]केले तर सहीत वारून देऊं. चिरंजीव मुलें तुमचे हातीं व माहाराजांचे पदरीं घालून देशांतरें जाऊं. सेवेची उमेद नाहीं सीमा जाली. माहाराजांस विनंतीपत्र पो आहे. दीनबंधू यैसें बिरूद माहाराजाचें; यैसें असोन कोलापूरचे **राजे याजवर** हवाला घालीत आहेत. तरी राजे लोक थोर; परंतु त्यांचे हातीं कांहीं नाहीं. **बाईसाहेब** व **यादव** करितील तें होईल. दया करणें हे विनंतीपर. हुजुल.

---

+ पुढील मजकूर लेखकाचे हातचा आहे. १ व्याज.

(10) Bhagwantrao Amatya requests Vaidya Brothers to pay money for son's marriage and to excuse his absence for some marriage ceremony at Vaidya's, owing to poverty. He says that the Kolhapur administration is run by the queen and Arjoji Yadav and not by the King.

---

छ २५ मोहरम
No. 11 श्री माघ वद्य १२।१६६७
फेब्रुआरी ६,१७४६

आज्ञापत्र राजश्री पंत **राजाज्ञा** ता। **केशव मोघी** सुा।सीत आर्बैनबा। देणें बा। लग्न खर्च सौा. **गजराबाई** देणें सिधा लोक दिा। राजश्री **पंत आमात्य** निा। करवीर आ। येकून बा।

| | |
|---|---|
| १ सिवाजीपंत कारकून | १ ब्राह्मण |
| १ देवजी पवार | १ बावाजी गायकवाड |
| १ हिरोजी सावंत | १ महादजी मालुसरा |
| १ सिदू सूर्यवंसी | १ भिवाजी आबरो |
| १ धोंडजी जाधव | १ मोदी तांबोळी |
| १ महंमद खासदार | |
| — | — |
| ६ | ५ |

११

येकून अकरा आसामी येकून दुरोजा आ। २२ बावीस असामीचा शिरस्ता
+
प्रमाणें देणें छ २५ माहे मोहरम पा। हुजूर रुजू.

बार सुरू सुद बार

(11) This letter gives the approximate date of the marriage of Gajarabai, the daughter of Queen Sakawarbai with Malharrao Bande.

---

No. 12 श्री फा. १६६७
मार्च १७४६

राजश्री **बाळंभट** (व) **विश्वनाथ भट वैद्य** गोसावी यासी

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो **प्रतापजी सोमवंसी** दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणौन स्वकीये लिहिणें विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. पावोन वर्तमान कळों आलें. कितेक **सिंध्याचा** मजकूर लिहिला तोहि कळला. आज लस्कराहूनही जासूद आले, त्यांनीं **सिंदियाचें** वर्तमान तपसिलें सांगितलें कीं, कोन्ही त्यास पुढें बोलाऊ पाठविले नवते. इमान प्रमान कांहीं दिल्हा नाहीं. आपले खुशीनें भेटावयास आला. आठ पंधरा दिवस लस्करांत राहिले, आण येथें यांजपासीं राहून चोर राऊत दाहा पंधरा जण जागिराच्या ठाणियांत येऊन चोर बातमीनें आमचे लष्करचे कहीं गेली म्हणजे राजांत येऊन रोज पाच सात घोडीं चागलीं नेत. ऐसें पंधरा दिवस नित्य जालें. तेव्हां चिरंजीवानें चोर बातमीस आपले दोनचार राऊत पाठविले. तो आठजण राऊतांनीं आठ घोडीं आमचे लस्करचीं घेऊन ठाणियास चालले. तेव्हा आमच्या राऊतांनीं धरून आणलें. कोन्हाचे काय सांगेनात. तेव्हां दबाऊन डोकीं मारावीं ऐसें जालें. तेव्हां **मालजी** सिंदीयाचें नांव घेतलें. तेव्हां लोकांनीं गवगवा केला. घोडीं सिंदीयाचे जिमेस पाऊणसे लागले. तेव्हां **सिंदीयाचीं** पाऊणसे घोडीं घेऊन लोकांचीं दिल्हीं. तेव्हां **मालजी सिंदे** यांणीं आपले जागिरीचे ठाणियास माणसें पाठवून पाऊणसे घोडीं आमचीं नेलीं ते आणून दिल्ही. ते आमच्यानीं लोकाचीं जायाचीं त्यास दिल्हीं. यांचीं घोडीं पाऊणसें लोकाचे येथें होतीं तें आणून **मालजी सिंदे** यांस दिल्हीं. आतां समागमें **मालजी सिंदे** आहेत, चिंरंजिवानेंहि वस्त्रेंपात्रें देऊन बार आहेत आण तेथें लबाडी लिहिली कीं, कैदेंत ठेविलें. दोनच्यारसें घोडीं लुटलीं तर ह्या गोष्टी खऱ्या नाहीं. ह्याच गोष्टी सर्वांनीं खऱ्या मानून हजार रा मसाला केला. जेजालबारदार पाठविले तर बरें. धणी समर्थ आहेत. हकनहक इनसाप मनास न आणितां करावे, तुम्ही मसाले करू घ्यावे ऐसें नाहीं. बरें, जें होणें तें दरबारींच होईल. सा लाख रु. कर्ज करून फौज मातबर धरून **बीडावर** गेले. त्यासी अद्याप तहरह कांहीं जाला नाहीं. **सुलतानजी निंबाळकर** व चिरंजीव **नडसी** पावतें जात आहेत. किंचित त्याच्या याच्या लोकाची झटपट झाली, त्यासी **निंबाळकराची** चौदा घोडीं आणलीं बारा घोडीं आमची गेलीं. युध्यें मातबर होणार आहे. येजातीचें वर्तमान आहे. तुम्ही लिहिलें कीं, **स्वामी** रागास आले, म्हणोन लिहिलें. तर स्वामी धणी समर्थ आहेत स्वामी संतुष्ट करावयासी.

(12) This is an account given by Pratapji Somavansi of the enemical relations beaween him and Malaji Shinde. It seems there was some fight between them near Beed. Sulatanji Nimbalkar and his son were prepared to encounter any friction.

No., 13 श्री फाल्गुन व० ५।१६६७
मार्च १,१७४६

बंधुवर्ग शिरोमणी राजमान्य राजश्री **बाळंभट** ता। राजश्री **विश्वनाथभट दादा** स्वामीचे सेवेसी.

विनंती. सेवक **नारो रघुनाथ थोरात** सां नमस्कार विनंती ता। फाल्गुन वदी ५ जाणून स्वक्षेमलेखन केलें पाहिजे विशेष. आमचें वर्तमान तो आपण परस्परें ऐकिलेंच असेल. आम्हीं लिहावें तरी कोण तो संतोष ? परंतु हालीं वेदमूर्ति रा। **केसभट** खाले आले, यांणीं सांगितलें कीं, आपण कोकणात **बावडे घाटें** येणार. यैसीयासी आमचा सर्वस्वापार तेथूनच जाला आहे. ज्यांणीं वाणियाची मुली चोरून नेली यांणींच आम्हांस दगा दिला. ते चोर त्यांचेच निसबतीचे, हा निश्चय खराच. बरें, आमच्या अद्रस्टानसार स्वामीचें जाणें त्या मार्गे जालें तर बरेंच जालें. नाहीं तर, आपणांकडून मुदाम माणूस पत्रें देऊन रा। **बाजीरायाकडे** पाठवावीं कीं, ज्यांणीं वाणियाची मूल चोरून नेली, त्यांनींच आमचा भाऊ **पावसे**कडून येत होता त्यास सा। माणसांस नागवून नवसे रुपयांचें वित नेलें, तें आमचें पाठवून देणें, म्हणून आपले विचारें होईल. रा। स्वामीचेंही पत्र गेलें तरी कांहीं लाग लागेल. रोख रुपये ३१८८- याखेरीज वित नगनगोटी वस्त्रपात्र सासे रुपयाचा यैवज गेला आहे. मीं भेटीस यावे तरी स्वामीस तोंड दाखवत नाहीं. बरे, आपण पुरातन स्वामीचा आहे. येत्न होईल तरी केला पाहिजे. वाणियाची मुली नेली होती, तिचे मावळे तेथें होते. त्यांनीं ओळखिली. मागाहून ही लाग गेला. ती सोडवून आणिली. यैसा विचार आहे. यैवज आला, तरी खर्च स्वामीस देऊं, आंतर होणार नाहीं. देहभान गेलें आहे, याचा परिहार आपण करतील. बहुत काय लिहूं लोभ कीजे हे विनंती.

हो। रा। **रामचंद्रपंत दाजीस** सा। नमस्कार. लिा। पारेसोन आमचें बरें होईल ते गोष्ट कीजे. हे विनंती.

दोघांमध्यें सोवळें एकही नाहीं. अनकूल पडेल तरी सोवळें नवें अगर जुनें पाठविलें पाहिजे. मार्ग लक्षित असे, हे विनंती.

(13) Naro Raghunath Thorat writes To Vaidya Brothers to help him to recover the money and other luggage which he lost in theft, when his brother was coming from upcountry through Pawar. The same theives had taken away the merchant's girl. He requested Karkare to send a holy cloth old or new, to wear.

No. 14 श्री फाल्गुन वा ७।१६६७
मार्च ३,१७४६

श्रीमंत राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथ भट वैद्य** स्वामीचे सेवेसी.

सेवक **नारो अनंत गद्रे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ता फाल्गुन वद्य सप्तमी मुकाम **राहाटगांव** जाणून स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष स्वामीकडे पाचसात पत्रें पाठविलीं; परंतु येकही पत्राचें उतर न आलें तर यैसें न कीजे विषश. या प्रांतींचें वर्तमान तर श्रीमंत राजश्री **रघोजी** बावा **माहुरावरी** आहेत **मोंगलांचा** यांचा सौरख्य जाहला. दाहावीस लाख रुा **मोंगलानें** यांजपासून घेतले. येणें प्रा तह जाहला आहे, परंतु उभयतां फौजा अद्याप **माहुरींच** आहेत. दोचो रोजांत कूच होणार आहेत. वरकड आपलें कामकाज तर आम्ही लस्करांत गेलों होता. राजश्री **हौंसपूर गोसावी** याची चिठी राजश्री **सिवाजी दादाजी**-वर पंचविस हजार रुा घेतली आहे. चिठी रा **सिवाजीपंतास** दाखविली त्यास ते लस्करांत गेले आहेत. ते लस्करांतून आले म्हणजे रुा त्याजपासून घेऊं. रा **रामाजी गिरधर** याजकडील प्रस्तुत पेसा येत नाहीं. मौजे **राहाटगांव** येथील चुकोती सालमजकूर कुलबाब कुलकानू राजश्री **कृष्णाजी गोविंद** यांनीं रुपये १५०० पंधरासे करार केले. आ(ता)त्याजपैकीं पेसजी वसूल ता **जखापा** रुा सातसे व हलीं येका महिनेयाचा निशा करून घेतला आहे रुा चारशेयाचा. बाकी चारसे बाकी राहिले ते उगवतील तेव्हा खरें. यंदा उगवत नाहीं स्वामीस कळावें म्हणोन लिहिलें आहे. आम्हांकडील वर्तमान येथास्थित असे, ल्याहावें यैसें नाहीं. भेटी जाहल्यावरी सविस्तर वृत सेवेसी निवेदन करून. प्रस्तुत दोन गोष्टी प्रतिकूल आहेत. आपलें आगमन या प्रांतास कितीका दिवशीं होईल तें लिहिलें पाहिजे. आम्ही पुढें येथें काय करावें. कामकाज तो हा काळपर्यंत प्रथम दिवसच आहे हे वर्तमान कोठपर्यंत स्वामीस ल्याहावें ? वारंवार पर्याय ल्याहावा यात उतम नाहीं. इकडील वर्तमान राजश्री **गोपाळपंत** मुखवचनें सांगतां कळों येईल. बहुत काये लिहिणें लोभ आसो दीजे हें विनंती.

राजश्री **रामचंद्रपंत** स्वामीस साष्टाग नमस्कार विनंती उपरी. येथील वर्तमान **भटजीस** लिहिलें आहे. त्यावरून कळों येईल. आम्ही या प्रातास आलिया ता **कोकणचें** वर्तमान कळत नाहीं. याजकरितां चितास समाधान नाहीं. तर कृपा करून **कोकणचें** वर्तमान मनास आणून सविस्तर लिहिलें पाहिजे. उत्तर लक्षीत आहों. अनमान न करिता उत्तर पाठविलें पाहिजे. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे हे विनंती.

(14) Naro Anant Gadre writes to Vaidya Brothers from Rahatgaon the whereabouts and intended movements of Raghuji Bhosle. Raghuji was at Mahur and made a treaty with Naizam in which he was to get Rs. ten or twenty lacs from Raghuji. The writer has also stated the account of the money dealings with Hansapuri Gosavi, Shiwaji Dadaji, Ramaji Girdhar and Krishnaji Govind. He wanted to know when Vishwanathbhat would go to Berar and also the safety of his men living in Konkan, early.

---

No. 15

१६ जाखर ते ३० सफर
आषाढ व. ४।१६६७ ते चैत्र शु. १।१६६८.
जुलै ६, १७४५ ते मार्च १२,१७४६
झडती सुा सीत

स्वारी **गोवळकोट**
माा **गोपाळराव**
खर्च निा **दामाजी प्रभू**
खासा सरदार
इा छ १६ माहे जमादिलाखर ताा छ ३० माहे सफर येकंदर
माहे कबज रुपये
६।= इा छ. १६ जमादिलाखर ताा छ २९ रजब दरमाहा रु. ४।· प्राॅ
३१॥· इा छ १ शाबान ताा छ ३० सफर दरमाहे रुा ४॥· प्राॅ
३७॥=

खर्च

| | | रुपये |
|---|---|---|
| ४ माहे रजब | ७ माहे रमजान छ ५ | ५ छ १८ जिलकाद |
| ४॥· माहे शाबान | ४ छ १७ सवाल | २॥= छ २४ जिल्हेज |
| ४ छ. १० मोहरम | ११ | ७॥= |
| १२॥ | | ३१।= |
| | | ४ माहे सफर |
| | | ३५।= |
| | | २ माहे जााखर |
| | | ३७।= |

(15) This is an account of expenses incurred by Vishwanathbhat Vaidya when he had been at Govalkot.

---

No. 16

श्री

१० रबिलावल
चै. शु. ११।१६६८
मार्च २२,१७४६

प्रतापजीचा शिक्का अष्टकोनी व
मोर्तब षट्कोनी
तिहेरी

राजश्री **बाळंभट** व **विश्वनाथभट** गोसावी यांसी.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्री **प्रतापजी सोमवंसी** दंडवत. विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन केलें पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. आपलें पत्र येत नाहीं तर श्रेहास उचित नाहीं. आपण तेथें होतों तोपरियेंत तुमच्या आमच्या मायेंत अंतर पडलें नाहीं. सांप्रत **चिरंजीवही** भेटोन गेले. तेव्हांही त्यांनीं कांहीं तुमचा आंतरा मजकूर सांगितला नाहीं. यैसें असतां तुमचें पत्र येत नाहीं. याजवरून अपूर्व दिसोन आलें. तर यैसें न करणें. चिरंजीवाचें वर्तमान तर तपसिलें राजश्री **बाबुराव** यांनीं लिहिलें आहे. **वनजरी** यानीं **सिरपूर, मेहकर** प्रांतें धामधूम केली, येक दो गांवचे पाटील मारिले. यास्तव **चिरंजीव वनजारी** यांच्या गांवास जाऊन मोरचे लावले. एक गढी घेतली. दुसरी घ्यावी तों राजश्री **रघोजी भोसले** यांजकडील सरदार पांचसात हजार फौजेनसी होती, त्यांणीं भेटीचा मजकूर केला. चिरंजीवाचा त्यांच्या(सी) [1]ध्वात जाला. यैसें असोन विश्वासघात करून आठा कोसांवर येऊन राहिले. पाहाटे।दोन घटका रात्र तो येऊन बुणगीयावर घातले. चिरंजीव लोकांसुधा मोरच्यावर होते. सडे फौज नसी **डाणेगांव** प्रां **मेहकर** येथें आले. आपणास कळावें, यैसा विचार जाला. यैसीयासि तुम्ही दरबारीं वकील आहांत. प्रसंग साहित्याचा हाच आहे. तुम्ही तो मागेही साहित्यास चुकला नाहीं. आण आताहि चुकणार नाहीं. आपली निशा आहे. आपणही सत्वरच दरबारांस राजश्री **बाबुराऊ** यैसें येतों. तुमचा कितेक अर्थ असल, तो तुमच्या आमच्या विचारें होईल. संवशय चितांत तिलमात्र न अ(ण)णें. आमची ममता तुमचे ठायीं आहे नाहीं, हे भेटीअंतीं कळेल. रा छ १० रावल. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंती. मोर्तब सुद.

श्री मार्तं
डचरणी तत्पर
संताजी सुत प्रता-
पजी सोमवं
सि निरंतर

---

१ ध्वात = शब्द

(16) Pratapji Somavansi, a son of Santaji and an elder brother of Appaji, writes from Berar the account of the disturbances created by Vanjari at Sirpur in Mehekar district. Appaji bawa, his younger brother, on knowing that Vanjaris killed the patils of some villages, went to the villages of Vanjaris and captured the fortified wall of one village. He intended to invade other Vanjari village and put them to great loss, but in the meanwhile, Raghuji Bhosle's sardars came there with 5 or 6 thousand soldiers and gave him an interview and made a contract that no further attacks should be made on the Vanjaris. But they did quite against what was settled and brought Appaji into trouble. Pratapji therefore, requested Vaidya Brothers to help Appaji in this difficult condition.

---

No. 17 श्री चैत्र शु. ११।१६६८
मार्च २२,१७४६

श्रीमंत राजमान्ये राजश्री **बालंभट** व तथा राजश्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामीचे शेवेसी.

सेवक **बाबुराव रघुनाथ** सां। नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वामींनीं आपलें क्षेम लिहीत गेलें पाहिजे. विशेष. स्वामीस दोन तीन पत्रें पाठविलीं. त्याचें उत्तर वरच्यावर आलीं. **गोलकोंटास** गेला होता म्हणोन येकिलें. यैसी याशी आमचें वर्तमान तर येजमान आपण. **भालवणीहून** गावापावेतों आलों. राजश्री **आपाजी बावा** घारीस गेले. **सिरपूर मेहकर** पावेतों गेले. मेहकर प्रगणियाचे दोन गाऊ **वंजरी** यांनीं लुटले. दोही गावचे पाटील **वनजेरी** यांणीं मारले. यास्तव येजमान **वनजरी** यांच्या गांवास जाऊन मोरचे लावले. येक गढी घेतली. येक घ्यावी तो राजश्री **रघोजी भोसले** यांजकडील सरदार पाच सात हजार फौज होती, त्याचें अनुसंधान भेटीचें आलें. यास्तव येजमानाचा त्याचा सिधांत भेटीचा जाला. आठा कोसावर येऊन राहिले. येजमान मोरच्यावर फौजनसी होते. पहाटे फौजेनें येऊन बुणग्यावर घातले. सड्या फौजेनसी येजमान **डोणगाऊ** प्रा। **मेहकर** येथें येऊन राहले. ये जातीचे वर्तमान आलें. यैसी यास आपण **सातारियास** आलों, ते समई तुमची आमची उभयेतांचीं कितेक प्रकारें बोलणीं जालीं. खासगत देणियाचेंही बोलणें जालें. त्याप्रमाणें निमे यैवज तुम्हांस पाठविला. तुम्हांसी येजमा-

नाचा दुसरा अर्थ नाहीं, हें निश्चा आहे. मर्घेच गोष्टी नासल्या. त्या चितांत न आणें. दोमहिनिया येजमान आपण आलियावर तुमच्या त्यांच्या पूर्वी चालत होत्या प्रमाणें चालतील चिंता नाहीं. परंतु ये समई हें सविस्तर वर्तमान **स्वामीस** व **वाडियात** निवेदन करून तुम्ही आपलीं पत्रें येजमानास सविस्तर लिहिणें. ये समई तुम्ही साहित्या अंतराये येकरूप न करणें. साहित्याचा समय हाच आहे. येसाच प्रसंग यासीही राहणार नाहीं. आपण तुम्हांस लेहूं, तें तुमच्या प्रतियास मागेंही आलें आहे. आण पुढेंही येईल. तर चित्तांत तिलमात्र कांहीं न आणतां वकिलीचा जाब करणें. केवळ **रघूजी** बावांचीच वकिली कराल तर न करणें. पुर्वेत विचार आहे तोच चितांत आणून त्याप्रमाणें जाबसालास न चुकणें. दो महिनियानंतर येजमान आलियावर सांगाल त्याप्रमाणें विल्हे लागेल. पत्राचें उत्तर सविस्तर लिहिणें. बहुत काये लिहिणें लोभ असो दीजे हे विा.

राजश्री **रामचंद्रपंत** स्वामीस साां नमस्कार. येजमानास पत्र लिहिलें आहे. समयें हाच साहित्याचा आहे. तर उत्तर सत्वर पाठवणें. **सैदू**जवळ सुपारी चरला चांगली रु. १ येकाची पाठवणें. पैका पारवता करून बहूत काये लिहिणें हे विनंति.

( 17 ) This letter written by Baburao Raghunath to Vaidya Brothers contains the same matter written by Pratapji Somavansi in his letter No. 16 of the same date. He also requests Vaidya Brothers to be of help to Appaji Somavansi at this critical time.

---

No. 18 श्री १७ सावल<br>चैत्र व ४।१६६८<br>मार्च २९,१७४६

तुळोजीचा शिका व<br>मोर्तब अष्टकोनी<br>दुहेरी

पुरवणी राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यासी.

विनति उपरी. **कर्नाटक** प्रांतीची मामलत विले लागत होती, त्यास राजश्री **देवरायांनीं** राजश्री **जानोजीराव निंबाळकर** यांसी पत्र पाठविलें कीं, राजश्री **स्वामींचे** रुबरो मामलत विलेस लाऊन देऊं त्यावरून मारानिलेकडील वकील **सातारा** गेले आहेत. पूर्वी **देवठी**कडील वकील।नवाबाकडे येऊन बोलीचाली करीत होते, त्यामुळें आजिपर्यंत बलें आतां **देवराव** राजकारण करितात. मोगलाई

दरबारांत बहाणा दिसल्यावर बखेडा होतो, हें वर्तमान राजश्री फत्तेसिंग बावास सांगोन बंदोबस्त करावयाचा तो केला पाहिजे. मामलत दुसरीकडे न जाये तें करणें. याचें उत्तर सत्वर पाठवणें. छ १७ रावल बहुत काये लिहिणें. हे विनंती. मोर्तब सुद.

( 18 ) It is a supplementary letter to Vishwanathbhat Vaidya about securing the Mamlat of Karnatak.

---

छ. १७ रबिलावल
चैत्र व. ४ १६६८
मार्च २९,१७४६

No. 19 श्री

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता। मोकादम मौजे कान्हाटी प्रा। सुपे सु॥ सबा आर्बैन मयाव अलफ. सन खमसांत चिरंजीव सौ॥ बयाबाईचें लग्न जाहालें, ते समईं सामान वगैरे मौजे मजकुराकडे रु. २५ पंचवीस करार केले. ते अद्याप वसूल दिल्हे नाहीं. हे गोष्ट कार्याची न केली. हालीं देखत आज्ञापत्र सदरहू रकम घेऊन पुण्यास येणें. जाणिजे छ १७ रबिलावल.

( 19 ) It seems that Bayabai, the daughter of Chimnaji Appa was married in Magh or Phalgun of Shaka 1667 with Gangadhar Naik Onkar. The Mokadam of Karhati was to supply some things for it, which he did not do. He was therefore called to Poona with the money without delay.

---

२० रावल सीत आर्बैन
चैत्र वद्य ७।१६६८
एप्रिल १,१७४६

No. 20 श्री

तुळोजीचा शिक्का व
मोर्तब वाटोळा
दुहेरी

आज्ञापत्र राजश्री कान्होजी राजे सिर्के तहा मोकदमासी ता। सावर्डे मामले हमदाबाद सुभा प्रांत दाभोळ सु॥ सीत आर्बैन मया अलफ रा॥ माहादाजी रघुनाथ व लक्षुमण विठ्ठल व तुको विठल देशकुलकर्णी गांवकुलकर्णी ता। मा॥र यांणीं हुजूर येऊन विदित केलें कीं, ता। मा॥रचे देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी दोन्हीं वतनें पुरातन आपलीं आहेत, आपले वडील पुर्वापार चालवित आले आहेत, त्यांस शामलाच्या उपसर्गामुळें आपले वडील परागंदा होऊन

श्री
कान्होजी राजे
शिरके देशमु
ख सुभेदार स
मत दाभोळ

देशांत आले. त्यास या प्रांतीं रोजगार करून राहिले, त्यास महाराज राजश्री **छत्रपती** स्वामीनें **शामळ** पराभवातें पाऊन मुलूख हस्तगत केला, त्यास साहेबी कृपाळू होऊन आपलें वतनें आपले दुमाला करून स्थापना करावी, म्हणोन विदित केलें, त्यावरून मनास आणून पेशजीच्या सनदापत्रें थोरले माहाराज राजश्री **छत्रपती** कैलासवासी स्वामीची व आमलाकडील **महाराजांची** व राजश्री **पंतप्रतिनिधी** यांचीं पाहोन याचीं वतने यांचे दुमाला करून हें आज्ञापत्र सादर केलें असे. सदरहू वतनांस हकलाजिमा बा। माजी सनद थोरले माहाराज राजश्री **स्वामींचे** कारकीर्दीचे पाहोन करार करून दिल्हा असे बी तपसील.

हक गावगना दरसदे **लारी दाभोळी**
२॥ अडीच प्रमाणें कलम १
रकम गावगना इनामती
१४१ **कोंकणांतील** गाव ४१, दर गावास रकम लारी ३ तीन प्रमाणें येकूण लारी.

३२ **मुरेंगांव** ता। **बिलेलाबाद** गाव ८, दरगावास टके ४ च्यार येकून टके.

१७३

इनामती
१ इनाम गांव मौजे **तलसर**
५ ठिकाणांतील गावगना
१ कोडवाईगवला कसबा **सावर्डे**
१ मौजे **डेरवण** ता। मार घोडेपटिया २ दोन, यो। ठिकाण येक
१ मौजे **नादगाव** सेतरेव व माणखरी ठिकाण येक.
१ मौजे **आर्वाटगाव** आंबे फणस व नारळ झाडें बाग ठिकाण येक
१ मौजे **खेरसेत**पैकीं सेतमाडप ठिकाण येक

६

## कानुकानुनाती

गोलीयाचे म्हैसीस तूप तानी व पारधी उनाला पावसाला तूप वजन ८८२ दोन सेर कलम १
**खुमखुमारीयाचे** दुकानास **घरास सालिना** लारी ।॥। निम कलम १
उसाच्या फडास हक
१ घाणियासी दररोज उंस ५ पांच प्रा। कलम येक.
१ गुलाचे काइलीस गूळ दररोज ८८५ पांच सेर कलम येक.

२

३

कोष्टी व साळी मागास साहालिना पाटकें १ येक येकून कलम १
सणगराच्या मागास सालिना कांबला १ येक येकून कलम १
तेलियाच्या घाणियासी व दुकानास सालिना तेल वजन ८८२॥ आडिच सेर कलम १
पानारियाच्या नगास पानै सुमारें १०० येकसे येकून कलम १
कापड नगास जकाती। लारी **दाभोळी** १ यो। कलम १

रंगारियाच्या दुकानास सालिना लाहरी १ येक येकून कलम १ ।·
भुसाचे गोणीस दर बैलास रुके ८२ दोन प्रा कलम १
दुकानास सालिना लारी १ येक प्रा कलम १

लोणी जिनसास दरबैलास लारी पाईण प्रमाणें कलम १
खंड व गुन्हेगारी
दरसदे लाहारी दाभोली ५ पांच प्रमाणें कलम १

येणेंप्रमाणें हक व इनाम गाव व थिकाणाती व रकम व इनाम गावगना व कानुकानुनाती पुरातन सनद प्रमाणें करार करून दिली असे. तरी याचे पुत्रपौत्रादि वंशपपरंरेनें चालवीत जाणें. जाणिजे छ २० रावल (मोर्तब सुद).

(20) This is an order to Mokadum of Sawarde of Hamudabad district to execute the conditions of Sanad granted by Raja Shahu for the enjoyment of certain rights of the ancient Vatan of the villages to Khandakars.

---

छ ५ जावल
No. 21 श्री जेष्ट शु॥ ६।१६६८
मे १५,१७४६

हिसेब जाहिमानगीकडे खर्च सनगें वाडा १ छ ५ जावल सन सीत

सौ. बाई, अंबिकाबाई, गोदूबाई, गजराबाई, लक्ष्मीबाई, लाडूबाई अहिल्याबाई, उपाध्येबुवा, हरीबाई, द्रौपदीबाई, आपाई सिर्की, आपाई भाबयाई, कुसाई, जाधवयाची मूल, मोघम दिल्हीं, शिबाजी हरी, बलवंतराव, लखमाजी भो, आबाजी सखदेव, भिवजी कासुर्डे, सुरनिस, चिटणीस, फडनीस, माहादाजीपंत पा, असबादि इा

यादी पोषाख

| राजश्री स्वामी | ताराआईसाहेब | सौ. बाई वाडा १ |
|---|---|---|
| ५ बादली | ४ चांदणी | ४ बादली |
| १ मंदील | १ पातळ | १ पातळ |
| १ चादर | १ चोळीखण | १ खण |
| १ जामेवर | १ किनखाप | १ किनखाप |
| १ पटका | १ शालजोडी | १ चादर |
| १ किनखाप | ४ | ४ |
| ५ | | |

| | |
|---|---|
| ५ निंबळी सदरहू प्रा | ४ कुसुबी सपरहु प्रो |
| ५ कुसुंबी सदरहू प्रो | ४ निबामी सदरहु प्रो |
| ५ चांदणी सदरहू प्रो | ४ कलस पाकीस सदरहु प्रो |
| ५ कलसपाकी सदरहू प्रो | ४ बनासी सदरहु प्रो |
| —— | —— |
| २५ | ५ |
| | सौ बाई वाडा २ सदरहु प्रो |

किता पोशाख बायकांचे

सौ. गजराबाई सणगे ४ प्रा
सौ. अहिल्याबाई
सौ. बच्याबाई
सौ. चिमाबाई

---

१ देहेनगी

(21) In the Daftar there are lists of persons, male and female related to Chhatrapati's family to whom clothes were offered in honour of the thread ceremony of Bhikambhat, Balambhat Vaidya's son. The lists contain the details of the clothes as to their number, kind and names. These lists are useful to those who want to know the relations of females with the Royal family. The details of the number and Kind of clothes are dropped.

---

शनिवार सीत आर्बैन छ. ६ जावल

No. 22 श्री जेष्ठ शु. ७।१६६८

मे १६,१७४६

यादी आहेर व्रतबंध भिकाजी बलाळ सुा सीत आर्बैन छ २ जावल घरचा, दामले, गोविंदभट दाते, माहादाजी कमलाकर, बाळ जोसी, सिवाजी नारायेण, रा। पंतप्रधान, वासुदेव जोसी, माहादाजी कृष्ण कानिटकर, केसो माहादेव, केसो हरी कानिटकर, पुरुषोत्तं भट सेवडे, धोंडो गोपाळ, निळो रघुनाथ, मुधोजी भो, कोन्हेर राम, उधोपंत गो, बाजीपंत, बाबूराव हरी, कान्हाटीकर.

छ ३ रोज, त्रिंबक हरी, नरसीभट फडके, माहादाजी कृष्ण, काणे बावधनकर माहादाजी गणेश, रा पंतसचीव, रा आबूराव, न्होबा ना, यादो गोपाळ, आपाजीराव गाडगीळ, बापूभट वैद्य, राधेराम केळकर, मातुश्री काळी, गोपाळभट नवाथे, रामाजी नाईक भिडे, रत्नपारखी, बाहिरोबा सेणवी, कृष्णाजी नाई(क) जोसी, विसाजी बलाळ जोग, गोविंदराव चिटणीस, दादोबा पुरंदरे, यशवंतराव पोतनीस, आपाजी बाबूराव, गणोबानाई(क) कोलटकर, रा राव प्रतिनिधी, यमाजीपंत, रा गोविंद नाई(क), केशवराव वकील, आपाजी हणमंत, रूद्राजीपंत पुरंदरे, राघोबा राजवाडे, भग नाईक पुरंदरे, बाळाजी शंकर, रंगोबा ना, रा राणोजीबावा भोसले, माणकोपंत, सौ बाईसाहेब वाडा थोरला, सिवाजी हरी, जगोबा नाई(क) गोडसे, केसोबा ना चितळे, खोडदकर कुलकर्णी, खोडदकर पा

छ. ४ रोज गुरुवार, मोरो माहादेव, सिवाजी साळोखी, तुकोराम ( डिंगणकर ), लक्षुमण नानाजी, दुर्गोजी भोईटे, मोरोपंत दामले, नारोपंत फडणीस, नारबा दिा राणोजी बादे, विसाजी आनंत जोग, त्र्यंबक मोरेश्वर प्रभू, रत्नाकरपंत, रा. पंत आमात्य, पुरुषोत्तम वैद्य नगरकर, रा सुमंत, सदासिवपंत वैद्य, सिदभट ठकार, रामाजी मिर्जे रूजु, निबांजी सोमवंसी, बऱ्हाणजी मोहिते, सदासिव ना लिमये, त्रिंबकराऊ धायेगुडे, रा मंत्री, माधवराव बाजीराव, यांचा दाईज आबाजी सखदेव.

छ ५ रोज जावल शुक्रवार जिवराव शिंदे, नरसी शामराज, गोपाळराम, विठोबा ना वाकडे, देवराव मेघःश्याम, सुलतानजी गाढवे, बाळाजी दादाजी फा सिवाजी मोहिते, विनाइक जोसी, रघुनाथभट झिपरे.

छ ६ रोजी दताजीपंत वैद्य, महंमद सफी, नबाब, हरभट वैद्य, बाबदे (व) भट आठले, रा फत्तेसिंग, गोविंद प्रभू, तात्या देशपांडे प्रा पुणें, वाडा २, वासुदेवभट आठले, रा सरलस्कर.

(22) The persons who offered presents to Vaidyas at the time of the thread ceremoney of Bhikambhat, the eldest son of Balambhat, are stated in this list. They are men of Vaidya's thick acquaintance, near relatives and also influential officers, and sardars of the state. The number and Kind of clothes are dropped,

---

श्रीशंकर वरद

No. 23

२६ जमादिलावल
जेष्ठ वद्य १३।१६६८
जून ५,१७४६

श्रीमंत राजश्री **बाळंभट बाबा** व तथा राजश्री **विश्वनाथभट बाबा** स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक **केसो हरी सावरकर** मुा **नागपूर** प्रांत **देवगड** पाणीद्वयें जोडून शिरसा नमस्कार, विनंति उपरी. येथील क्षेम ताा छ २६ माहे जमादिलावल जेष्ठ वदी त्रयोदशी भृगुवार परियंत स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें व प्रांत मजकूरचें व प्राा **भुगावचें** वर्तमान येथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री **रघोजीबाबा ज्येष्ठ वदी दशमी सोमवारीं नागपुरास** येऊन सुखरूप पोहोंचले, व श्रीमंत **राजश्रीपंत** व **विसाजीपंत** समस्त मंडलीसुधा सुखरूप आले. सेवेसी कलावें म्हणोन लिा आहे. वरकड प्राा **भुगावचें** वर्तमान तर राा **विठ्ठलपंत** गेले, त्यांहीं साकल्य सागितलेंच असेल. **विठ्ठलपंतानीं** भुगांवचें कामकाज येथून जात तोंपर्यंत केलें. त्याचा हिसोब आम्हांस दाखविला नाहीं. आम्ही **नागपुरास** होतों, त्याजवल हिसोब मागत होतों; परंतु येकंदर दाखविला नाहीं. आम्हांजवळ बाकी काढून दिली. त्याप्रों बाकीची याददास्त घेतली आहे. बाकी वसूल करावितों. इस्तमोलतीचे दिवस. याजकरितां च्यार दिवस तकूब करून प्राा मजकूरची इस्तमालत केली. कांहीं थोडीबहुत राहिली, तेही करतों. इस्तमालत जाहलियाउपर बाकीचें वसुलाचें काम चालीस लाऊन बाकी वसूल करून सेवेसी रवाना करून विठ्ठलपंती आम्हांजवळ बाकी निर्हेतुक कांहाडून दिली. त्यापैकीं मौजे **जाखेगाव** येथील रुपये ३६ छतीस **मनाजी पांड्या** याचे मारिफातीने वसूल घेऊन गेला आणि त्या छतीस रुपयाची हुजत दिली. आण आमचे हिसेबीं मजरा दिली नाहीं. मोकदम मजकुरास आम्हीं बाकीचा तगादा केला, त्याणें बहुत कजिया केला. राा **विसाजीपंत** दादा पावेतों त्याणें फिराद केली. त्यास **विठ्ठलपंतां**पासून छतीस रुपये घेऊन गांवास मजरा येत असें करावें. त्यामध्यें ज्याप्रों आपण आज्ञा करितील त्या प्रों वर्तणूक करून. वरकड **नागपूर**चे असाम्यांपैकीं यैवज यावा त्यामध्यें साल मजकूरचे यैवजी राा **आपाजीपंत** सुभेदार याजवळ दाजीनें जप्तून च्यारसे रुपयाची वरात घेतली होती. त्यापैकीं रुपये **दीडसे** आम्हाकडेस वसूल आले आहेत. यासिवाय दोन हजाराची वरात सुभेदाराकडून घेतली. त्या वसुलावर **संकराजीपंत** आहेत. बारा चोदासे रुपये वसूल जाहाले आहेत. तो संकराजीपंताचा जिमा आहे. त्यांहीं आठसे रुपयाची हुंडी करून रवाना केली होती, ते **हुंडी फिरली.** ज्याचे दुकानची हुंडी केली, त्याचे दिवाले निघाले. हुंडी फिरोन आली. त्याजवळ रुपियासहि जागा नाहीं. यैसें जाहालें. त्याउपरी सावकाराचे घरीं चौकी बसवून त्याची हुंडी त्यास देऊन रुपयाचा तगादा लाविला. त्यास बहुत हैराण केला. त्याउपरी चौघे भले लोक दरम्यानें येऊन

---

१ लागवडीचें, २ पूर्णपणें.

रा **बापूजी नारायेण** व राजश्री **विसाजीपंत दादा** यांचे साक्षीनें चौघा सावकारांनीं हवाले घेतले. दोहो महिन्यांचा वायेदा केला आहे. दोहो महिन्याउपर रुा येतील. यानंतर **रामटेकचे** हजार रुपये यावे, त्यापैकी रुो ७७४ सातसे चौऱ्याहातर **विठ्ठलपंत** घेऊन गेले. बाकी राहिले ते पंधरा दिवसीं वसूल येतील. वसूल जाहाल्यानंतर सेवेसी पोहोचतील. वरकड रुपया कोणी देत नाहीं. त्यास श्रीमंतही येथें आले आहेत. अशामध्यें स्वाम येथें आल्यास मनोदयाप्रों

२

पुरवणी स्वामीचे सेवेसी.

कितेक कामकाज होऊन येईल. प्रांत मजकूरचे आसाम्याचे रुपये व कर्जवामाचे रुपये आपण या प्रांतास आल्यासिवाय येत नाहींत. यासिवाये कामकाज कितेक प्राचें आहे तेंही अवगत होऊन कार्येसिध होऊन येईल. वरकड ठाणें मजकुरीं २ सिंगे आहेत, ते सुखरूप आहेत व **चिंतोपंता** बराबर लस्करांत घोडीं होतीं. घोड्या ३ व तट्टू २ व तटाणी येक येकूण सा घोडीं येथें सुखरूप आम्हांजवळ आलीं व **बंगालेयाहून** घोडा येक, तट्टू येक येकूण दोन याप्रों दहा घोडीं सुखरूप आहेत. परंतु **बंगालेयाहून** घोडा आला तो प्राणमात्र घेऊन येथें आला. त्याचे बहुत हाल आहेत. त्यास कांहीं आवशेध मसाला चारितों व चाकरीस अंतर करीत नाहीं. महि(ना) दो महिन्यांहीं कांहीं ताजा होईल व घोड्या गंगी व चितोडी येशा सभर आहेत. महिन्या पंधरा दिवसा पसवतील व सुभानजी येथें आम्हापासीं सुखरूप आहेत. त्याचे आईस आश्वासन दिलें पाहिजे. वरकड येथें घोड्यांस **भुगांवीं** दहापंधरा घोड्यांची पागा सचंतर नवी बांधिली. सेवेसी श्रुत होय. यानंतर आमचे घरचें सविस्तर वृत लिहोन सेवकास आनंदविले पाहि(जे). सर्वस्वे सेवक पदरचे आहों. ज्याप्रों स्वामींनीं सेवकाचा अंगीकार केला त्याप्रों परिणाम लाविला पाहिजे. बहुत काये लिा. कृपा निरंतर करून संतोषाभिवृधी केली पाहिजे. हे विनंती.

हो **रामचंद्रपंत दाजी** व **नारोपंत दाजीस** सां नमस्कार, विनंती उपरी. लिा परिसोन कृपाभिवृधी करून सेवकाचा सांभाल सर्व प्रकारें केला पाहिजे. बहुत काये लिा. हे विनंती.

सेवेसी **मोहन्याचे** रामराम सर्व माणसांस राम सागणें हे विनंती.

(23) Keso Hari Sawarkar, Vaidyas' clerk working in Berar writes them from Nagpur much important information on the following points :— (1) Raghuji Bhosle arrived in Nagpur from Bengal expedition on 2–6–1746, with Visaji Govind and Konerpant. (2) Vithal Annaji before leaving for Satara did not give the proper accounts of the revenue collection of Bhugaon and the money yearly to be received (as असाम्या) from Nagpur. (3) Unsatisfactory condition of the horse that returned from Bengal. (4) A new building was erected at Bhugaon for lying the horses.

क्षय संवत्सर

No. 24 श्री आषाढ शु. १।१६६८

जून ८,१७४६

यैवज येणें निा रा **पंतप्रधान** चिठी गुा **देवराव** यैवज पेशकसी नांवें **माहादेव नाा ताबवेकर** रुा १५००० पैकीं मुा ह्मा आषाढ सु १ ताा कार्तिक सु १ मुा माहे १६ नी येणें रुा ५०००.'

सदरहू वसूल क्षय कार्तिक वद्य १ गुा **माहादेव नाा तांबवेकर** रुा ५०००. बाकी०

आदेसुद निा

**गोंविंदराम खांडेकर**

३८८८ यैन चिठी **माणकोजी नाा पाठक** याजवर दिली आषाढ सुध १३ नांवें माानिले

१११२ व्याज ह्मा ताा मुा माहे १५ रोज १८ याो दर सदे॰ रुा २ प्राों रुपये १२१३८— वजा बारोत्रा रुा १०१८— बाकी

५०००

देणें **गोविंदराम खांडेकर.** हा यैवज **पेशवे**पैकीं दरसदे रुा ।-। प्राों याो व्याज १११२ पैकीं अठवा हिसा देणें रुा १३९ वजा व्याज मुा १५८१८ दर २ प्राों रुा ४४८— वजा बारोत्रा ३।।।— बाकी रुा ४०।॰

बाकी देणें रुा ९८।।।॰

२५ आषाढ गुा **तोरापा** माा **रामचंद्र गोपाळ**

(24) This is an account showing a mention of Rs. 15000/—paid by Vaidyas to the Peshwa, Nanasaheb.

---

No. 25 श्री आषाढ शु. ३।१६६८

जून ११,१७४६

राजश्री **सरदार** व **सिलेदार** व **पागा** व **ठाणेदार** व **चौकीदार** व **राहादारांनी** व **मोकदम** गोसावी यांसी.

॥ छ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्ये श्री **आवजी कवडे** दिा राजश्री

˘ श्री ०
मल्लारी च
रणी तत्पर
आवजी कवडे
निरंतर

**पंतप्रधान ठाणें** पाा **उमरखेड** रामराम. सुा समान अर्बैन मया अलफ सन हजर ११५६. राजश्री **हरी कृष्ण** नोकर सरकार याचा कबिला **उमरखेडास** होता तो देसी **पुणियासी** रवाना केला आहे. बरोबर **नारो अनंत** यासी वगैर बितपसील.

३ घोडी तीन २ बैल दोन २ बटकी दोन

६ चाकर साह ३ **खासा नारोपंत** वगैरे

सदरहू प्रों बरोबर देऊन रवाना केले आहेत. अहद **उमरखेड** तहद **पुणें** मार्गीं कोणी दुजाईम न होणें. जेथें राहातील तेथें जागा व चौकी पाहाऱ्यास माणसें व बरोबर हुजऱ्या देऊन आपली सरद पार करून देणें. रा छ २ जमादिलाखर.

( मोर्तब सुद )

---

दुजाईम = शत्रुत्व.

( 25 ) This is a permit given by Awaji Kavade, the agent of Peshwa for the use of the clerk of Vaidyas, Naro Anant Gadre, to take the family of Hari Krishna Kane from Umarkhed to Poona. On this letter of permit there are his round seal and mortab.

---

No. 26 श्री आषाढ शु. ७।१६६८

जून १४,१७४६

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **विसाजीपंत** दादा स्वामीचे सेवेसी.

सेवक **लंबोदर धुंडिराज** सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। आषाढ सुध सप्तमी मुकाम **पवनी** स्वामीचे कृपेंकरून सुखरूप असो विशेष. इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री **बाबासाहेबाचे** पत्रीं व तीर्थस्वरूपाचे पत्रीं लिहिले आहे, त्यावरून कळों येईल. श्रीमंत राजश्री **अपाचें** वर्तमान पूर्वी **विस्कळित** आले होतें. सांप्रत वर्तमान आले आहे कीं, **अपास** तीन जखमा आहेत, **रायाजी पांढरे** व **ऐसाजी अटोळे** व **अबाजी सिंदे** व **हरजी सिंदे** येसे सरदार देखील आहेत, आणखी कितेक लोक त्याजपाशीं जमा जाले आहेत, त्यासी **मुस्तफा-खानाच्या** डेरियामधें आहेत, रोजिना शत रुपये खर्चास देत आहेत, म्हणून वर्तमान आलें आहे. त्याच्या शोधास माणसें बैरागी श्रीमंत राजश्री **तुळजोपंत** दादा यांनीं पाठविले आहेत. ईश्वरीइछेकरून सत्य वर्तमान येईल तेव्हां खरें. कृपा लोभ असो दीजे. हे विनंती.

श्रीमंत राजश्री **बाबूराव** स्वामीचे सेवेसी सा. नमस्कार कृपा लोभ असो दीजे हे विनंति.

( 26 ) Lambodhar Dhundiraj writes to Vishwanathbhat from Pawani that Appaji Somavansi received 3 wounds and he was accompanied by Rayaji Pandhare, Yesaji Atole, Abaji Shinde and Harji Shinde and other Sardars. They are all

arrested and kept by Mustafakhan in his camp, who spends hundred Rs. or so for their daily expenses. In order to verify this news, Tuljopant sent some Bairagis i. e. mendicants. On their return the truth will be out.

---

छ. २ रजब
No. 27 श्री शंकर श्रा. शु. ३|१६६८
जुलै १०,१७४६

यादी जमा सनगे सुा सबा आर्बैन मया आलफ छ २ रजब. आदाये सनगे

विश्वनाथभट
२ पहिलावाडा
१ तिवट कुसुंबी
१ सेला जाफरखानी
—
२
२ राजश्री येमाजीपंत
१ तिवट केशरी
१ सेला खसखसी
—
२
१ ताईकडील पागोटें ताराबाई
२ बाडा दुसरा
१ तिवट
१ सेला जाफरखानी
—
२
२ फत्तेसिंग बावा
१ तिवट
१ सला जाफरखानी
—
२
२ बराणजी मोहिते
१ तिवट
१ सेला अष्टगोली पांढरा
—
२
४

४ पंतसचिव
२ तिवटें
२ सेला जाफरखानी
—
४
१ बापूभट वैद्य तिवट
३ राजश्री स्वामीकडील पोशाख
१ तिवट निंबोली
१ सेला जाफरखानी
१ छीट जोडी
—
३
१ शिलकपैकीं पागोटें
—
२६

| तिवटें | खसखसी | अष्टगोली |
|---|---|---|
| १५ | २ | १ |
| जाफरखानी | छीट जोडी | |
| ७ | १ | |

खर्च
१ बालंभट
१ नागपूर येमाजी खंडोजी बली
—
२

१ सिवाजी मोहिते पागोटें
१ सिदंभट ढकार पागोटें कलसपाक
२ देवराव वजीर
१ तिवट
१ सेला जाफरखानी
—
२
२ राणोजी भोसले
१ तिवट उदी
१ सेला खसखसी
—
२

२ राजगड
१ निंबोली
१ कलसपाकी
—
४
१ विसाजी बावाजी
१ कृष्णा चाकर
१ सदाशिव तांबट
—
७
८ बाकी

(27) This is an account of dresses received by Vishwanathbhat from various well-known persons.

---

No. 28 श्री+रामोजयति श्रावण शु. ४।१६६८
जुलै ११,१७४६

श्रीमंत राजश्री रघुजीबावा भोसले गोसावी यांसी.

स्नो खंडोजी गोगवले हावालदार महालभांडारगृह, राम राम विनंती उपरी. बाा यैवज सरकार दोन लक्षपैकीं देणें. रवानगी खर्च तुम्हांकडे. त्यास रुपये

रा. बालंभट वैद्य ५०००
रा. विश्वनाथभट वैद्य २०००
खरिदी पदक देणें तुम्हांस १५००
गुजारत विश्वनाथभट वैद्य
———
८५००

येकून साडे आठ हजार देऊन पावलियाचें कबज घेतलें पाहिजे. तेणें प्रोंं मजरा असे. छ ३ माहे रजब सुा सबा आर्बैन मया आलफ + हे विनंती.
बार ( मोर्तब सुद ).

---

+ पुढील अक्षर लेखकाचें.

(28) Khandoji Gogawale asks Raghuji Bhosle to pay to the persons mentioned, the money against their names, out of Rs. two lacs to be received from him.

No. 29 श्री भाद्रपद १६६८
आगष्ट १७४६

वेदशास्त्रसंपन्न राजश्री **विश्वनाथ भट मामा** वैद्य स्वामी गोसावी यासी.

पोा **आनंदराऊ सखदेव सेनाकर्ते** साा नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणोन श्वकीये लेखन करित गेलें पाहिजे विशेष. आमचे मामा राजश्री **कृष्णाजी भास्कर** राजश्री **रघोजीबावा** यांजकडे चाकरीस होते, त्यास श्रावणमासीं देवआज्ञा जाली म्हणोन त्यांच्या जावयानीं आम्हांस लिहिलें. त्यांजकडे सरकारचें कर्ज आहे तें आमचे गुजारतीचें आहे. मग आम्ही सौादिसपत्र **बाईसाहेब** यांस निवेदन केलें. त्यावरून त्यांणीं राजश्री **राघो अनंत** कारकून व हुजरे पाठविले आहेत, तरी तुम्ही आमचे आप्त आहा. जैसें कळेल तैसें राजश्री **राघोजी बावास** सांगोन आमचा गला मोकला होये तें केलें पाहिजे. आम्हांस जें संकट तेच तुम्हांस, हे गोष्ट पुर्ती ध्यानास आणून पारपत्य करून रुपया ज्या वाटेनें उगवे, तें केलें पाहिजे. त्यांच्या जावयास चार गोष्टी मामूल करून सांगणें. तुम्ही ही बिशातीचे खावंद होऊन त्यास दुसऱ्याच्या कर्जांत घालावें यैसा स्वधर्म आहे यैसें नाहीं. याजप्रमाणें सांगोन यैवज पदरीं पड तें केलें पाहिजे. विस्तारें ल्याहावें यैसें नाहीं. आमचा मुसनफ व गेंद किरमेजी तुम्ही गेला तेव्हा तुम्हांस सांगितली होती, तर ते याजबरोबर पाठऊन देणें. बहुत काय लिहिणें. कृपा लोभ निरंतर असो दिल्हा पाहिजे हे विनंती.

( 29 ) Anandrao Sakhadeo Senakarte writes to Vishwanathbhat that Krishnaji Bhaskar, a servent of Raghuji Bhosle died in the month of last Shravan. He was his maternal uncle and borrowed some money from Senasaheb Bhosle, through the influence of his son-in-law. The queen is asking him to pay the money. Sakhadeo wants Vishwanthbhat to intervene and get the matter amicably settled. Sakhadeo addresses the addressee as Mama. It seems Vishwanathbhat's wife and Sakhadeo's wife were sisters. Vishwanathbhat's wife belonged to the Patwardhan family of Makhajan.

श्री+शंकर

No. 30 भाद्रपद १६६८
आगष्ट १७४६

राजश्री **मोहनसिंग भोसले** गोसावी यासी.

द्दा अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो **विसाजी रघुनाथ वकील** आसिर्वाद विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणें विशेष. तालुका **छतीसगडचे** यैवजी राजश्री **रघोजीबावा भोसले** यांणीं दरबार खर्चाची वरात रुा २००० दोन हजार रुपयेची वरात दिल्ही आहे. तो यैवज वसूल करावयासी रा पाठविले आहे व राजश्री **सेनासाहेबसुभा** यांचें पत्र आलाहिदा. पाठविलें आहे. तरी सदरहू यैवज यांचे पदरीं घालणें. मार + रुपये १०० देणें. बहुत काये लिहिणें. हे आसिर्वाद.+

---

+ मधील मजकूर खाशाचे हातचा आहे.

(30) Vishwanathbhat Vaidya Vakil of Bhosla writes to Mohansing Bhosle, an illegimate son of Raghuji to pay Rs. 100 to the bearer of this letter.

---

बुधवार

No. 31 श्री भाद्रपद शु. ८।१६६८
आगष्ट १३,१७४६

पुा राजश्री **रघोजीबावा भोसले** सेनासाहेबसुभा गोसावी यांसी.

छ. विनंति उपरी. सौाग्यवती **राधाबाई** यांस बरें वाटत नव्हतें. ती आजी प्रातःकाळीं भाद्रपद सुध अष्टमी बुधवारीं देवाज्ञा जाहली. राजश्री **प्रतिनिधीपंत** बहुत श्रमी जाहले. होणारास उपाय नाहीं. हे विनति.

(31) S. Radhabai, Shriniwas alias Shripatrao Pratinidhi's wife, died on 13-8-1746.

---

श्री भाद्र. शु. १३।१६६८

No. 32 आगष्ट १७,१७४६ रविवार

श्री सकलतीर्थस्वरूप राजश्री **बाबा** वडिलाचे सेवेसी.

अपत्ये **रायाजी भोसले** कृतानेक चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग दंडवत विनति येथील क्षेम भाद्रपद शुध त्रयोदसी रविवार मुकाम मौजे **भांब** वडिलाचे कृपेकरून सुखरूप असो विशेष. सांप्रत आपलें आसिर्वाद पत्र येऊन परामर्ष जाहला नाहीं. याकरितां चित सापेक्षित आहे तरी सर्वदा पत्रद्वारें परामर्श केला पाहिजे. यानंतर आम्ही या स्थलास आलियावर वडिलास पत्र पाठविलें होतें. तें पत्र प्रविष्ठ होऊन वडिली श्रावण शुध पंचमीस उत्तर देऊन जासुदास रवाना केलें. परंतु पर्जन्यामुळें जासूद मार्गीहून आम्हाजवळ पावते व्हावयास पंधरा दिवस लागले. वदी पंचमीस पत्रें पावलीं. सविस्तर वर्तमान कलों आलें. **बंगालियाचे** स्वारीचें वर्तमान लिहिलें तें कळलें. वडिली विदेशांत राहोन श्रम साहास करावयास अंतर केलें नाहीं हें संपूर्ण कलों आलें. आम्हास आपण लिहिलें कीं, रा **गोपाळराम** अथवा रा **राघोसुरो** यांसि पाठवावे. त्यास वडिलीं उत्तमच विचार लिहिला. त्यास **गोपाळराम** यांचे शरीरीं वेथा जाहलियामुळें ते **सातारा** राहिले. पुढें दसरा करून ते येणार. रा राघोसुरो समागमें आहेत. यांस पाठवावें ; परंतु पर्जन्यवृष्टी बहुत. नदीनाले मार्गीं फार. तथापि आठ चार दिवस पर्जन्याची उघाडी नाहीं. याकरितां पाठवावयासी अनकूल पडलें नाहीं. आमचा हेत कीं, वडिलाचे भेटीस बहुत दिवस जाहालें आहेत, आणि विदेशी राहाणें जाहाले होतें, याकरितां आम्हींच वडिलांचे भेटीस यावे हाच विचार आल्या दिवसापासून आहे. परंतु पर्जन्याकरितां अंतराये जाहला आहे. पर्जन्य आठ दिवस उघडलियानें आम्ही व समस्त मंडली येऊन पोहचतों. भेटीनंतर साकल्य वर्तमान विदित करून पुढें जो विचार आम्हांस सांगतील त्याप्रमाणें विचार करूं. आमचा सर्व भार व हेत वाडिलांचे वचनावर आहे. **सताराहून** या प्रांतें यावयाचें कारण हेंच आहे. वडिलांस कललें पाहिजे. प्रस्तुत आपलें सविस्तर वर्तमान लिहावयाची आज्ञा केली पाहिजे. विशेष लिहिणें तरी आपण वडिल आहेत + हे विनति.

---

+ पुढील अक्षर लेखकाचें स्वदस्तुरचें आहे.

(32) Rayaji Bhosle writes from Bham to Raghuji expressing his desire to visit him at an early date. He congratulates him for his safe return from the grand expedition into Bengal and informs that he will see him after the rainy season and settle the further course.

No. 33 श्री १० साबान
भाद्र. शुध १३।१६६८
आगष्ट १७,१७४६

राजश्री **बिसाजी रघुनाथ वकील** गोसावी यासी.

श्री **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा दंडवत. सुा सबा आबैन मया व आलफ. राजेश्री **विसाजी गोविंद** कमाविसदार, दिमत चिरंजीव राजश्री **साबाजी भोसले**, मोकदम गांवगना प्रां **देवगड** यांसी, रदकर्जे वगैरे रुा ३७०० सततीसें देविले असेत. देणें जाणिजे. छ. १० माहे साबान बहुत काये लिहिणें. हे विनंति. (मोर्तब सुद)

बार

(33) This letter is written by Raghuji Bhosle to Vishwanathbhat to Pay Ro. 3700 to Visaji Govind, the agent of Sabaji Bhosle.

---

No. 34 श्री १७ साबान
भाद्रपद वद्य ४।१६६८
आगष्ट २४,१७४६

रघोजीचा सिका व
मोर्तब यावर आहेत.

राजश्री **महादाजी केशव** सुभेदार प्रा **चांदे** गोसावी यांसी.

छ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री **रघोजी भोसले** सेनासाहेब सुभा दंडवत सुा सबा आबैन मया व आलफ. संस्थान मजकूर पैकीं दरबार खर्च मा राजश्री **विसाजी रघुनाथ वकील** यास रुा २००० दोन हजार देविले असेत. तरी सदरहू दोन हजार रुपये मारनिलेकडे देणें. जाणिजे. छ १७ माहे साबान बहुत काये लिहिणें. (मोर्तब सुद.)

बार

(34) Raghuji Bhosle writes to Mahadaji Keshav Subhedar of Prant Chande that he should pay Rs. 2000/–as Darbar expenses to Vishwanathbhat Vaidya, the ambasadar.

---

No. 35 श्री+शंकर आश्विन वद्य ९ शनिवार १६६८
सपटंबर २७,१७४६

श्रियासह चिरंजीव राजश्री **विस्वनाथभट** यासी प्रति **बाळंभट वैद्य** कृतानेक आसिर्वाद. उपरी येथील क्षेम ता। अश्विन बहुल नवमी मंदवार पावेतों समस्त सुखरूप असो. यानंतर तुम्हीं भाद्रपदी आमवाश्येचें पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहाला, व राजश्री **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा यांचेंही पत्र आलें, तें प्रविष्ट जाहालें. त्यास राजश्री **फतेसिंग भोसले** याकडील बोलीचालीचा निश्चय होता. पेसजी त्यांचा व याचा निश्चय जाहाला आहे कीं, **चांदे** राजश्री **फतेसिंग भोसले** यांसी राहावयासी द्यावें. व **वराडचे** वाटनी-पैकीं पाच महाल त्यांनीं राजश्री **रघोजी बावास** घ्यावे, बाकी वराडचे महाल त्याचे वाटणीचे राहिले, त्यांपैकीं निमे महाल राजश्री **रघोजीबावास** व राजश्री **रायाजी भोसले** यासी घ्यावे, बाकी महाल राहिले, त्यांची यांणीं कमाविस करावी. याप्रों बोलीचा सिधांत जाहाला आहे. तरी राजश्री **रघोजीबावांचे** विचारें याप्रों करार होईल. होईल तर करावा, आणि राजश्री **कोनेरपंत** व तुम्हीं यावें म्हणजे यांचा व त्यांचा योग बनेल. कललें पाहजे व **राजश्री रघुनाथ भटजीस** पाठवणें म्हणोन लिहिलेत, त्यास विचारें बोध करितां, यावें हा करार केला आहे. राजश्री **स्वामीची** आज्ञा ही घेऊन दिली, त्यास राजश्री **ब-हा[न]जी मोहिते** भाऊबीज जाहाली म्हणजे त्रितियेस स्वार होतात, त्या समागमें **भटजी** व सौभाग्यवती **ठकाबाई** व **कृष्णाजीपंत** यैसें निघोन येतात, तुम्हीं रा। **पंतासमागमें** याल, त्यास तेथील कामकाज उरकून गुंता वारून येणें. राजेश्री **बाबूजी नाईक** बारामतीस आले. पुढें काय मनसबा होईल तो मागाहून लिहोन पाठवितों. राजश्री **राणोजी भोसले** याकडील येकोणीस हजार रुपयाची हुंडी रा। केली, म्हणोन लिहिलेत. त्यास अद्याप कोणी आला नाहीं व हुंडीचें वर्तमानही कलत नाहीं. कललें पाहिजे. राजश्री **प्रधानपंतही** दिपवाळी जाहालियावर जाणार. वरकड वर्तमान यथास्थित असे. याप्रांतें प्रजन्य नाहीं. त्यामुळें लोक बहुत श्रमी आहेत. कोकणांत आज महिना प्रजन्य नाहीं, भातें तमाम मेलीं. चवथाई पाचवा हिसा पीक होईल यैसें वर्तमान आहे. कललें पाहिजे. बहुत काये लिहिणें हे + आसिर्वाद.

---

+ पुढील मजकूर लेखकाचे हातचा आहे.

(35) This letter gives important details of the affairs of Shahu's court, the settlement of the disputes between Raghuji and Fatesing Bhosle. This dispute was going on ever since the capture of Trichanapaly in whieh Babuji Naik

also was involved. The movements of the Peshwa and other members are essential for clearing the matters of Shahu's declining days. Rayaji Bhosle's portion is also considered. At this time there was no sufficient rain in Konkan and this fact threatened famine in that part.

---

रविवार

No. 36 श्रीशंकर का. शु. ८।१६६८

आक्टो. १२,४६

श्रियासह चिरंजीव राजश्री **विश्वनाथ भट** यासी.

प्रती **बालंभट वैद्य** कृतानेक आसिर्वाद. उपरी येथील क्षेम ता। कार्तिक सुध ८ रविवार जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत जाणें. यानंतर आम्हांकडील वर्तमान तरी यथास्थित असे. तुम्ही आपणाकडील कुशलार्थ लेहून वरचेवर पाठवीत जाणें. विशेष. राजश्री **बऱ्हाणजी** मोहिते सौ **ठकाबाईस** घेऊन आले आहेत, व वा। राजश्री **रघुनाथभट पटवर्धन** ही आले आहेत, व **कृष्णाजी केशव** ही आले आहेत. भेटीनंतर सविस्तर श्रुत करितील. त्यास पेसजी त्यांनीं लिहिलें होतें कीं, कर्जदारीयांचा व दरबारचा बंदोबस्त करून हातरोखे पाठवून देणें, म्हणजे राजश्री **रघोजी बावास** घेऊन येतों. त्यास दरबारचा बंदोबस्त आहे. तो तुम्ही जाणतच आहा. कोणाचा पायपोस कोणाचे पाई नाहीं, यैसा प्रसंग आहे. त्यास सविस्तर वृत **कृष्णाजीपंत** सांगतील तो अर्थ चितांत आणणें. राजश्री **रघोजी भोसले** यांसि हुजूर यावयाचा आग्रह तुम्हीं न करणें. त्याचे विचारें यावयाचा मनसबा जाहला तरी सुखरूप येऊत, परंतु तुम्ही आग्रह करून न आणणें. राजश्री **संताजी भोसले** व **रायाजी भोसले** उभयता येक होऊन पाचच्यार हजार फौज जमा करून **वराड** प्रांतें धामधूम करणार म्हणोन वर्तमान ऐकिलें; परंतु तुम्हांकडील पत्र कांहीं न आलीं, त्यास येथून हातरोखे त्रिवर्गांसही पाठविले आहेत. तरी त्यास तुम्ही घेऊन येणें. वरकड सविस्तर **कृष्णाजी केशव** जबानी सांगतां कळों येईल. तुम्ही तेथील कर्जावामाचा गुंता उरकून घेणें. येथें यैवजाची निकड आहे. हुंडिया करून सत्वर पाठविणें, आणिखी लौकर येणें. पाच।सात वेळां राजश्री **स्वामींही** व सौवती **बाईसाहेब** यांणीं तुमचें स्मरण केलें होतें. तरी गुंतारुता उरकून सत्वर येणें. दिरंग न लावणें. बहुत काये लिहिणें. **आपाजी सखदेव** दि। **माणकोजी कोकरे** येथें आले. **सदाशिव** बलाळ **जोग** याकडे पाच हजार रु। हुंडी पाठविली तीं पावली. पेसजी जासुदाबा। लिहिलें आहे त्याचा जाब सत्वर पाठवणें. हे अशिर्वाद.

(36) There was a severe dispute going on between Rayaji and Raghuji Bhosle, for the settlement of which the services of Vishwanathbhat were employed. The letter throws valuable light on Shahu's affairs, even in declining days (See letter No. 38 of S. P. D. Vol. 20.) As mentioned in letter of 27-9-46 Barhanji Mohite, S. Thakabai, Krishnaji Keshav, and Raghunathbhat Patwardhan arrived in Satara. Santaji & Rayaji Bhosle are jointly preparing, it is heard, to fight against Raghuji in Berar. Shahu & the queen were inquiring about Vishwanathbhat's doings often.

---

श्रीरा+मचंद्र

No. 37

छ. २० सवाल
का. व. ७।१६६८
आक्टो. २५।१७४६

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री **बाळाजी पंडित** स्वामी गोसावी यासि.

पोष्य **चिमणाजी नारायेण** कृतानेक नमस्कार. विनति. येथील कुशल जाणून स्वकुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. आपणाकडील सावोत्रियाचा मख-तियाचा यैवज पेस्तर साल सन समान चे रुपये राजश्री **बाळंभट व विश्वनाथ-भट वैद्य** यांकडे देविले बीा रुपये.

| | |
|---|---|
| १००० | अश्वीन शुध प्रतीपदा |
| १००० | चैत्र अखेर |
| ५०० | जेष्ट अखेर |
| २५०० | |

येकून अडीच हजार रुपये हस्पियाप्रमाणें वैद्य मशारानिलेकडे देविले पाहिजेत. छ. २० सवाल सुा सबा अर्बैन मया अलफ+बहुत काये लिहिणें कृपा आसो दीजे. हे विनति.

+ पुढील अक्षर सचिवाचें स्वदस्तुरचें आहे.

( 37 ) Chimnaji Narayan Sachiv requests the Peshwa Nanasaheb to pay Rs. 2500/- to Vaidya Brothers, out of the instalment due from him on account of Savotra Amal.

---

No. 38 श्री मार्गसीर्ष शु. ११।१६६८
नवंबर ३, १७४६

रा॥ **अंताजी जाधव** दिा **सेनासाहेबसुभा** यासी आज्ञा केली ऐसीजे. पा॥ **अडगांव** सरकार **नरनाळा** प्रां॥ **वराड** हा महाल राजश्री **श्रीनिवास पंडित प्रतिनिधी** यांजकडे दरोबस्त इनाम आहे, तेथें तिळप्राये उपसर्ग न देणें, म्हणून पेशजी आज्ञापत्र सादर केलें असतां, पा॥ मजकुरीं धामधूम करिता, मौजे **सवदले** व मौजे **बातखेड** व मौजे **कारले** व **मौजे हिरवेखेड** येथील माणसें जखमी केलीत व मौजे **बोरवे बुा॥** व **खुर्द** व **चंदनपूर** व मौजे **झरी** व **शहापूर** व मौजे **पिंपरखेड** या सहा गांवचा मुकासबाब आपणाकडे आहे ऐसें म्हणून वसूल नेता. म्हणोन हुजूर विदीत जाहालें. ऐशास आज्ञापत्रें सादर असतां ऐशा बदराहा वर्तणुका करिता, यात तुम्ही आपलें बरें काये पाहिलें आहे ? हे गोष्टी कार्याची नाहीं. पा॥ मजकुरीं धामधूम करावयास तुम्हांस प्रयोजन काये ? ऐसी वर्तणूक कार्यास येणार नाहीं, ऐसें जाणून वर्तत जाणें. याउपरी बोभाट येऊं न देणें. याउपरी देखत आज्ञापत्र सदरहू गांवचा वसूल तटला असेल तो **पंडित** मारानिलेकडील कमाविसदार पा॥ मजकुरीं आहे, त्याजकडे मुकासबाब, बाबती, सरदेशमुखी देखील दरोबस्त वसूल देणें. या कामास **सुलतानजी चव्हाण** व **मल्हारजी पवार** हुजरे पा॥ यांसी मसाला रुा॥ २०० दोनसे देणें. जाणिजे. छ. २९ सवाल सुा॥ सबा आर्बैन मयाअलफ + बहुत काय लिहून +

---

+ मधील मजकूर खाशाचे हातचा आहे.

( 38 ) Shahu issues a strict warning to the agent of Raghuji Bhosle, against recovering the revenue of Pratinidhi's six Inam Villages. The last autograph speaks Shahu's mind on the aggressive attitude of Raghuji.

---

७ जिल्काद

No. 39 श्रीशंकर मार्गशीर्ष शु. ९।१६६८

नोव्हें. १०,१७४६

रघूजीचा शिक्का व मोर्तब
अष्टकोनी दुरेघी
पत्रावर आहेत

राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यासी.

छ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रो **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा दण्डवत. विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन केलें पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्रायें सविस्तर अवगत जाहला. तीर्थस्वरूप राजश्री **राणोजी बावा भोसले** यांकडील माहालाच्या इजारी याचे विशई लिहिलें, येसी यासी त्याचे तक्षमेचे माहाल जे आहेती ते तुम्हांस अवगतच आहेती. ते मनास आणून तदनुरूप सिद्धांत करून त्याकडील सनदा पाठऊन देणें; तुम्ही बोलीचाली कराल त्याप्रमाणें रुपयाचा निर्गम करून देऊन. तुम्ही जें कराल तें आमचे हितावह कराल. हे आमची निशा असे. राजश्री **रायाजी भोसले** याकडील लोक मन मानेसे रोखेपत्र करून मुलकांत धामधूम करितातो. बजिनस रोखे हुजूर पाठाविले आहेती. ते मनास आणून मागती पाठवून देणें, आणि येविशई राजश्री **स्वामीचे** सेवेसी विनंती करून त्यासी ताकीद करवणें जे, आपले माहालांत अमल करोत, याउपरी मुलकांमध्यें त्याजकडील जे धामधूम करितील त्यांचें पारपत्यें करणें जरूर जाहलें. तुमच्या पत्राचें प्रत्योत्तर आलियासारिखें जें कर्तव्य तें करून तेथील प्रसंगांविशई सर्व भरोसा तुमचा असे. तुम्हीही लौकर येणें. येथें आलियानंतर सकल प्रसंग विचार तुमच्या चितानरूप होऊन येईल, येविशई आपलें समाधान असो देणें. जाणिजे रा छ ७ माहे जिल्काद + बहुत काये लिहिणें. लोभ असूं देणें हे विनंती. + ( मोर्तब सुद )

श्री०
श्रीशाहुरा
ज पदाभोज भ्रम
रायित चेतसा बिं
बात्मजस्य मुद्रे
षा राघवस्य
विराजते

---

+ मधील अक्षर लेखकाचें

श्रीशंकर

पुरवणी राजश्री **विश्वनाथभट** वैद्य गोसावी यासी.

विनंति उपरी राजश्री **राणोजी बावा**कडील महालांचा गुंतका राजश्री **स्वामींचे** विद्येमानें सिधांत करून बोलीचाली निश्चयेरूप करून त्यांची निशापत्र करणें, तें करून त्याकडील सनदा घेऊन तुम्ही सत्वर येणें. तुम्हीं आपला खासगत मजकूर लिहिला होता, त्याची ताकीद पत्रें देविलीं असेतीं. राजश्री **रायाजी भोसले** याजकडील लोकानीं मुलकांमध्यें उपद्राप आरंभिला आहे तरी त्यांचें पारपत्यें करणें, याउपरी जरूर जाहलें. तरी हेही गोष्टीचा बंदोबस्त करणें, तो करून तुम्ही सत्वर येणें. जाणिजे रा छ ७ माहे जिलकाद + बहुत काये लिहिणें. हे विनति. + ( मोर्तब सुद )

---

+ मधील अक्षर रघूजींचें आहे.

( 39 ) Further light is afforded on the disputes between Raghuji, Rayaji and Ranoji Bhosle by these two letters from Raghuji. At this time Vishwanathbhat had come to Satara. These letters give exact date to elucidate the account given in P. D. Vol. No. 20, in this connection. Rayaji's disturbance is also referred in this lerter. Raghuji expresses perfect confidence in Vishwanathbhat and requests him to come in Berar soon.

---

No. 40 श्री मार्गशीर्ष वद्य २।१६६८
नोवेंबर १९,१७४६

मोर्तब व शिक्का
अष्टकोनी दुरेघी
यावर आहेत

दस्तक सरकार सेनाधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेब**सुभा ताा ठाणेदार व कमाविसदार व स्वारसिलेदार व पागा व बाजे लोक चौकीदार रहदारी अहद **लस्कर** तहद **सातारा** सुाा सबा आर्बैन मया व अलफ

राजश्री **विसाजी रघुनाथ वकील** यांचें कापड, बैल ५० पनास वगैरे जिनस घेऊन जात असेत, यांसी मार्गी हसिलाचा तगादा न करणें. जाणिजे. छ १६ माहे जिलकाद. ( मोर्तब सुद )

(40) This is a permit issued by Raghuji Bhosle to Vishwanathbhat Vaidya, ordering the officers, not to levy any money and obstruct the taking of oxen with cloth from Laskar to Satara.

---

No. 41 श्री मार्गशीर्ष वद्य ३।१६६८
नवंबर २०,१७४६

श्रीमंत राजश्री **बाळंभट** व ता। राजश्री **विश्वनाथभट** वैद्य स्वामींचे सेवेसी.

स्नो॥ **नारो अनंत गद्रे** कृतानेक सां। नमस्कार. विनंती. येथील क्षेम ता। मार्गसीर वद्य तृतिया मुा। **नागपूर** जाणून स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विषेश स्वामीकडून बहुत दिवस कागद येऊन परामृष होत नाहीं, याकरितां चित्त सापेक्षीत आहे, तर येसें नसावें. हरघडी आलिया माणसाबा। पत्रीं कुषलार्थ लिहोन संतोषवीत असिलें पाहिजे. विषेश.श्रीमंत राजश्री **रघोजीबावा चांदेयांसी** जुजत आहेत, मोर्चेबंदी केली आहे; परंतु प्रस्तुत **चांदेकरां**नींही जोर फार धरिला आहे. से–दोनसे माणूस **चांदे**कराचे किलेयाबाहेर येऊन श्रीमंतांचे मोरच्यावरी घालतात. **चांदे** महिना दोन महिने येत नाहीं. हल्लीं रा। **शामजी रायाजी** यांस **नागपूरचा** सुभा रा. **नरहरपंताकडे** होता तो दूर करून **शामजीपंताकडे** सांगितला आहे. त्यास **देवगड** प्रांतें मुलकांत **स्वारीपटी** दरसदे रुा, ३६ प्रों यैवज नेमून दिल्हा आहे, त्याची कर्यात **भूगावावरी** पटी रुा। आठसे आठावन घातली आहे. कर्यात मजकुरास दोन स्वार दररोज दोन रुा, शिवाय खुराक, करून पाठविले होत. त्यांजवरी आम्ही सुभेदाराचे भेटीस आलों. त्यांनीं रुपयांकरितां फारसा तगादा केला आहे. त्यास आम्हीं त्यासी करार केला आहे जे, **श्रीमंताकडे चांदेयास** जाऊं, तेथें जे आज्ञा होईल त्याप्रों. वर्तणूक करून. त्यास सुभेदारांनीं आठा रोजाचा करार करून वरातदार उठविले आहेत. आम्ही वद्य पंचमीस स्वार होऊन **चांदे यास** जाऊं. सेवेसी कळावें म्हणून लिहीलें आहे. कर्यात मजकूरचा गुदस्ता प्रों निमे तीन हजार रुा पाटिलाचें रोखेपत्र करून उगवून घेतले आहेत. **टेकाडी**चें वर्तमान पेसजी सेवेसी लिहीलें होतें. त्यावरून विदीत जाहालेंच असेल.

**गोपाला**चा हुंड्या साडे एकविसशाच्या पेसजी पाठविल्या. त्या पावल्याच असतील. वरकड वर्तमान येथास्थित असे. रा **केसोपंत** व **संकराजीपंत** यांस बरें वाटत नाहीं. ज्वर येत आहे. **चांदे**यास रा **कासीराव भास्कर** आहेत, परंतु निर्माल्य आहेत, त्याजवरी इतराजीच आहे. ऊर्जिताचा प्रसंग दिसत नाहीं. श्रीमंताजवळ कारभारीही कोणी नाहीं. जो कारभार पूर्ववत् आहे त्याचप्रों आतांही आहे. कळले पाहिजे. बहुत काय लिहीणें, लोभ असो दीजे. हे विनंति.

राजश्री **रामचंद्रपंत** स्वामीस साष्टांग नमस्कार. विनति उपरी. येथील कुषल जाणून स्वकीये लेखन करणें. या प्रांतीचें वर्तमान श्रीमंतास लिा आहे. त्यावरून कळों येईल. या पत्राचें उत्तर रा **रघुनाथभट पटवर्धन** यांचे तरफेन येथून **रामजीपंत** गेले आहेत, याजबरा पाठविले पाहिजे. उत्तर लिहोन त्यांचे घरीं आपले माणसाबरा पाठविले पाहिजे. आमचे घरचें वर्तमान सविस्तर लिहोन पाठविणें. बहुत काये लिहीणें लोभ असो दीजे. हे विनति.

चिरंजीव राजश्री **लक्ष्मणपंतास** आसिर्वाद. उपरी आपणाकडील व कोंकणचें वर्तमान सविस्तर लिहोन पाठविणें. बहुत काये लिहीणें हे आसिरवाद.

( 41 ) The disorganised affairs of Raghuji are here well evidenced. The details and dates are important.

---

No. 42 श्री

सबा आर्बैन १९ जिल्काद
मार्गशीर्ष वद्य ५।१६६८
नवंबर २२,१७४६

वैद्यांचा शिका व
मोर्तब लंबगोल
तिरेघी

अज स्वारी **विसाजी रघुनाथ वकील** ताा मोकदमानी मौजे **राहाटगांव** पाा **नांदगांव**पेठ प्रांा **वराड** सुाा सबा आर्बैन मया अलफ. मौजे मजकूरची कमावीस साल मजकुरीं राजश्री **गोपाळ अनंत** यासी सांगोन पाठविले आहेत, तरी तुम्ही रुजू होऊन मौजे मजकूरचा कारभार यांचे मारफतीनें करीत जाणें, आणि मारनिलेचे पोटाचा खर्च, गांवखर्चेपैकीं देणें आणि किरकोळ बाबतीचा अमल मारनिलेकडे देणें. जाणिजे. छ. १९ माहे जिल्काद ( मोर्तब सुद. )

० ‿
श्री राजा शाहु च
रणी तत्पर रघुनाथ सुत
वीस्वनाथ नीरं
तर.

(42) This is an order by Vishwanathbhat to the Mokadam of Rahatgaon that the revenue collection of the village of this year will be done by Gopal Anant, with whom he should co-operate and get all the work done. He is to be paid for his own expenses from the village money ( गांवखर्च ).

---

No. 43 श्री मार्ग. व. ७।१६६८
नवंबर २४,१७४६

तीर्थरूप सौभाग्यादिसंपन मातुश्री **बायासाहेब** साहेबांचे सेवेसी.

आपत्येसमान **उदतसिंग सिरके** चेरणावर मस्तक ठेऊन सां दंडवत विनंती. विज्ञापना येथील कुशल जाणून स्वकीये लेखन आज्ञा केली पाहिजे विशेष. आम्हांकडील वर्तमान मार्गेश्वरे वद्ये सप्तमी परयेंत साहेबाचे आसीरवाद करून समस्त सुखरूप असो. राजेश्री **रघोजीबाबा** व रा **रायाजी भोसले** यांच्या भेटी जालिया, त्यांस चिरंजीव **रतनसिंग सिर्के** यास रा **रायाजी बावांनीं** पनास स्वार बोली करून समागम घेऊन गेल व आम्हांस राजेश्री **रघोजीबावा** यांनीं आपणापासीं ठेऊन घेतलें आहे. साहेबांस कळावे म्हणून लिहिलें असे. प्रा **पातूर सेखबाहाडीचे** येथील नजर घासदाणा व मोकासा देखील सनदा आम्हांस दिल्हे. देऊन आपणापासीं ठेऊन घेतले असे. वरकड वर्तमान सविस्तर अर्थ रा **विस्वनाथ भट वैद्ये** सेवेसी निवेदन करतील. व राजश्री **रघोजीबावा** यांनींही आपलें वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. हे आपल्या पायाखेरीज यांस दुसरा आसरा नाहीं. याचा सर्व अभिमान साहेबी धरिला पाहिजे. रा **विस्वनाथभटही** यांचें वर्तमान सविस्तर सेवेसी श्रुत करितील. राजश्री **बऱ्हानजीबावा मोहिते** व राजश्री **विस्वनाथभट वैद्य** यांनीं आम्हांविसीं बहुतसी खटपट करून त्यांस सांगोन आम्हांस ठेविले असे. साहेबांस कळावें म्हणून सेवेसी लिहिलें असे. बहुत काये लिहिणें कृपा लोभ करीत गेले पाहिजे + हे विज्ञापना. +

---

+ मधील लेखकाचें स्वदस्तुरचें अक्षर आहे.

(43) This letter requires more consideration. It is written by Udatsing Shirke to his mother or queen Sakawarbai informing that after the meeting of Raghuji & Rayaji, Ratansing Shirke joined Rayaji with 50 soldiers and went

with him and the writer was kept by Raghuji for himself. At this time Vishwanathbhat and Barhanji Mohite were at Satara to tell all the details. Both tried best to keep the writer with Raghujibawa who was pleased to give him the sanads of, Sekh-Bahadiche for Najarana, Ghasdana and Mokasa. The writer expresses perfect confidence of Raghuji in the King and the Queen.

---

No. 44 श्री मार्ग. व. ७।१६६८
नवंबर २४,१७४६

तीर्थरूप राजश्री **बावासाहेब** व राजश्री **बापू** वडिलांचे सेवेसी.

अपत्येसमान **उदतसिंग सिर्के** चरनावरी मस्तक ठेऊन सां दंडवत. विनंती विज्ञापना येथिलें क्षेम ता मार्गेश्वरे वद्ये सप्तमी परयेत वाडिलांचे कृपाद्रिष्टी करून समस्त सुखरूप आसो विशष. राजश्री **रघोजी बावा** व राजश्री **रायाजी-बावा** यांच्या भेटी जालिया, चिरंजीव **रतनसिंग सिर्के** यास रा **रायाजी-बावांनीं** पनास स्वार बोली करून घेऊन गेले. आम्हांस रा **रघोजीबावा** यांनीं आपल्यापासीं ठेविले. पा **पातूर** येथील नजर घासदाणा, मोकासा, यांच्या सनदा दिल्हे. वडिलांस कळावें म्हणून सेवेसी लिहिलें आसे. आम्हांसाठीं रा **विश्वनाथ-भट वैद्य** यांनीं व राजेश्री **बऱ्हानजीबावा मोहिते** यांनीं फरसी खटपट करून साहित्ये करून यांजपासीं टेविलें. यांनीं बहुत कृपा करून ठेऊन घेतले आसे. वरकड वर्तमानही आम्हांकडील राजश्री **विश्वनाथबावा** मुखी निवेदन करतील, त्या वरून विदित होईल. बहुत काय लिहिणें कृपा करीत गेले पाहिजे. हे विज्ञापना + हे विज्ञापना. +

---

+ मधील अक्षर लेखकाचें आहे.

( 44 ) This letter is written by Udatsing Shirke probably to Shahu and hia father with the same contents as given in the previous letter.

---

२२ जिलकाद
No. 45 श्री मार्ग. व० ८।१६६८
नोव्हेंबर २५,४६

शिक्का वाटोळा
तिरेघी

श्रिमंत महाराज राजश्री **छत्रपति** स्वामीचे सेवेसी.

विनंति सेवक **आपाजी सोमवंशी सरलस्कर** कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ता. छ २२ जिलकाद **स्वामीचे** कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विज्ञापना **महाराजांचें** आज्ञापत्र सादर जालें, तेथें आज्ञा कीं, पा। **सुपें** येथें खेडीं राजश्री **बाळंभट** व **विस्वनाथ भट** यांजकडे आहेत, त्यांस तुम्हीं उपसर्ग न देणें म्हणून आज्ञा. येसी यास मारनिलेनें **स्वामी** जवळ कर्जात खेडीं दिल्हीं आहेत, म्हणून विदित **करून हें** आज्ञापत्र घेतलें आहे. तरी **त्यांजकडे** आम्हीं कर्जाचे पाच सातसे रुपये होते, त्यांपैकीं च्यारसे रोख दिल्हे, बाकी राहिले तेही पावते होतील. खेडियांची बोली किमपि नाहीं. ऐसें असोन सेवेसी निवेदन करितात, थोर आहेत. सरंजामाचा अर्थ आहे तो विदितच आहे, त्याहीमध्यें चहूंकडे चार खेडीं गेलिया मामलियाचा अर्थ राहात नाहीं. सेवकाचा अभिमान सर्व प्रकारें **स्वामीस** आहे. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना. ( मोर्तुब सुद )

(45) On receipt of Shahu's order, Appaji Somavansi, Santaji's son, informs him of the incorrect complaint of Vaidya Brothers against his obstruction to them to enjoy the villages given to them in payment of money borrowed from them. Rs. 400 were paid and the balance would be returned soon.

---

No. 46 श्री + शंकर मार्ग. वद्य ८।१६६८
नवंबर २५,४६

तीर्थस्वरूप राजश्री **बाळंभट बावा** वैद्य वडिलांचे सेवेसी.

अपत्येसमान **विश्वनाथभट** वैद्य कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता। मार्गशीर्ष वद्य अष्टमीपर्यंत मु॥ **वैरागड** नजिक **उंदेरी** येथें जाणोन तुम्ही आपला स्वकुशलार्थ लिहित असिले पाहिजे विशेष मार्गसीर सुध (स)प्तमीचें पत्र पाठविले तें पावोन साकल्यवृत अवगत जाहालें. येसेंच साकल्य वर्तमान दरबारचें वगैरे वरचेवर लिहित असिले पाहिजे. यानंतर या प्रांताचें वर्तमान तर राजश्री **रघोजी**बावांनीं गांवच्या ताकिदी दिल्या आहेत, **भुगांवाहून** घोडीं लस्करांत आम्हांजवळ येऊन पोहचलीं. रा। **नारोपंत** आठापंधरा दिवसीं येतील. आम्ही सत्वरच येणार होतों, परंतु पंधरा दिवस राहाऊन घेतलें आहे, कामकाज तो आद्याप कांहीं जाहालें नाहीं, तुम्हांस कळावें. वरकड मौजे **कारा़टीकर** माहार येथें आले होते, त्यास कर्ज रु॥ १०० सेंमर दिले आहेत. त्याचा रोखा **खंडोजी** जासूद दि॥ राजश्री **(स)चिव** याजबराबर पाठविला आहे. व्याजसुद्धां रुपये घेणें व जासूद मजकुराबरोबर म्हसी दुभत्या ५ पांच व गाई येक पाठविली आहे. **काराटीकर** माहार व जासूद व **भिव्या** पोरगा म्हसीबराबर पाठविले आहेत. म्हसी बागेंत **सोनगांवास** ठेवून **भिव्या** पोरासह दोघी कुणबिणी **कासीनवसीस** ठेवणें. तेथें म्हसींची निगादास्त करतील. . दुभतें आणून पोहचावितील. वैरणकाडींची बेगमी तेथेंच करवणें. **भिव्या** पोराची पोटापाण्याची बेगमी करणें. गाई **करा़टीकर** माहारा(बरा) बर पाठविली आहे. याजपासून घेणें. आम्ही सत्वरच येऊन सविस्तर वर्तमान वरचेवर लिहून पा॥. तुमचे शरीरीं आरोग्य नाहीं तर औषधी वगैरे उपाय करून आरोग्य होये ते केलें पाहिजे. राजश्री **रायाजी भोसले** व राजश्री **रघूजी भोसले** यांची समजाविसी जाहाली आहे. कळलें पाहिजे. दरबारीं बहुत सावधपणें राहाणें + सविस्तर वर्तमान लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंती.+

---

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा.

(46) The reconciliation of Raghuji and Rayaji Bhosle is reported in this letter. It was creditable to Vishwanath Bhat, who was employed by Shahu for that purpose.

No. 47 श्री शक १६६८
सन १७४६

श्रीमंत राजश्री **विश्वनाथभट** वैद्य स्वामींचे सेवेसी.

सेवक **महादाजी कृष्ण** सां नमस्कार विनंती उपर. तुमचा निरोप घेऊन स्वार जाहलों तो **पवनीस** पावलों. येथील कुली मजकूर मनास आणून टेविला आहे. परंतु त्यांनीं मुहूर्त पाहिला त्याजला फार दिवस लागले आहेत. हलीं राजश्री **बयाजीपंत सुरंजीस बावांनीं** चाकर कोणी ठेविले होते. ते **बंगालियांत** श्रीमंत **जानोजीबावा**बराबर आहेत. चाकरीहि बहुत प्रकारें करितां आहेत. **सुरंजी** परगणियाच्या सनदा **सिरके** यांजकडे दिल्हा आहेत, या ग्रहस्ताकडे **गोसावी** यांचें कर्ज हवाले देऊन **बंगालियात** गेले आहेत. याची काहीं स्थित **गोसावी** राहूं देत नाहीं. याजला **गोसावी** घेऊन जात होते, तेव्हा आम्ही **सुरंजीस** आलों. तेव्हां आम्ही पाहिलें, ब्राह्मण गाय विकत आहे, यास्तव त्याचें समाधान करून श्रीमंताकडे आले आहेत. आपण याचा अभिमान धरून कार्या करून घ्यावे. याची बोलीचाली येथें करून घेतली आहे. आम्ही आलियावरी निर्गम होईल. यासी अंतर कराल तर आमची आण आसे, आणि बंगालियात चाकर असोन यावर परगणियासी घालमेली जाहाली. हे तो अैकोन उटोन येणार. तेव्हां उत्तम नव्हे. यास्तव श्रीमंता विचार करून सांगोन आणिखी कोठें जागा लावून देणें. अथवा **सुरंजीची** सनद करून देवणें, अनमान कराल तर तुम्हांस **भास्करबावाची** आण असे. हे विनंती.

( 47 ) Mahadaji Krishna Kane requests Vishwanathbhat that Bayajipant of Suranji is in need of his help. He has gone with Janojibawa in Bengal after arranging to pay the debt through Gosavi and Shirke by mortgaging the Suranji Paragana. He is required to sell the cow. Vishwanathbhat is, therefore requested, to help Bayajipant.

---

NO. 1 श्री शके १६६८
सन १७४७

राजश्री कोनेरपंतबावा गोसावी यांसी,

दा। अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नों पदमोजी जाचक कृतानेक दंडवत बिनंती. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें बहुत समाधान जालें. तेथें लिहिलें कीं, तुम्हाकडील अर्थ राजश्री विस्वनाथभट वैद्य व राजश्री सिवरामपंत यांणीं सांगितला, तो साविस्तारें कळो आला. श्रीमंत राजश्री बाबासाहेबांस विदित करून त्यांचें व या उभयतांचें समक्ष बोलणें करून तुम्हांस पत्र लिहिलें आहे, त्याप्रमाणें मनास आणून विचार करणें हा जागा पुरातनपासून तुमचा आहे, पुन्हा जो जागा गेला तो जागा जोडावा, यांत उचित आहे, आम्हां पासून तुमच्या कार्यास अंतर होणार नाहीं, ऐसें लिहिलें. त्यावरून लिहिला अर्थ कळो आला. यैसी यासी आम्ही औधे जाचक *नवाजी, सवें वाढविले व आदर सन्मान व आम्हा लोकांच्या अडी तुम्हीच चालविल्या आणि आम्ही वडिलावडिली भोसले यांची शेवा निष्ठेनें केली. आता त्याप्रमाणेंच आम्हांस पदरीं घेऊन आमचा सरंजाम चांगला नेमून देऊन व नालबंदीची बेगमी व पुणियांतील कर्ज देणें आहे त्यांचा निर्गम करावा. आम्हांवर आदर बहुमान करावा. पुर्वील कित मनांत खावंदानें व आम्ही न आणावा. शफतपूर्वक चालावें. ऐसें जालिया आपण तुम्हांजवळ येतों, याप्रमाणें आपण करून द्यावें. अतःपर जें करणें तें तुमच्या भरवसियावरी व तुमच्या वचनावरी नजर देऊन करितों. तुम्ही भले आहा. यशश्वी आहा. येकटे आम्हीच येऊन. चिरंजीव राजश्री. मानापाचे पुत्र आहेत त्यांस टाकितां येत नाहीं. यास्तव त्यासही पदरीं घ्यावें. त्यास सरंजाम द्यावा आदर सन्मान करावा. आतां परगणे आहेत ते झाडींतील आहेत. तेथें तूर्त च्यार टके वसूल होत, ऐसें नाहींत. यास्तव अलीकडे देशाच्या लक्त्यांत चांगले खुलासा वसुली द्यावे. येविसीचा सविस्तर अर्थ राजश्री विश्वनाथभट वैद्य व राजश्री सिवरामपंत यांसी लिहिला आहे, तो

मनास आणावा आणि तुमचीं पत्रें व या उभयतांची पत्रें आलीं म्हणजे दर्शनास येतों. आपले ऊर्जित करावें. कुटुंबादाखल तुम्ही चालवावें. ह्या गोष्टी मन:पूर्वक तुमच्या व खावंदाच्या मनांत आलिया तरी आपण येतों. संशय नाहीं. तुमच्या भरवसियावरी येतों. आमचे सर्व प्रकारें चालवावयासी धणी तुम्ही आहात. बहुत काय लिहिणें स्नेह असो दीजे + हे विनंती.

* नामांकित, प्रख्यात + पुढील अक्षर लेखकाचे स्वतःचें.

(1) Padmoji Jachak writes to Konnerpant Kolatkar, who knew from Vishwanathbhat and Shivram Tukadao Katmarkar what he intends, that if Raghujibawa is ready to give his family the former, old position under him, by giving the Saranjam, naltundi allowance, and paying off debt of Poona Sawakars, he is surely ready to go to him. He is expecting Konnerpant's Vishwanath-bhatt's and Shiwarampauth's letters after this settlement with Raghuji.

No. 2 श्री. शके १६६८ सन १७४७

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री विश्वनाथभट वैद्य स्वामी गो.

सेवक रामचंद्र कोनेर कृतानेक नमस्कार, विनाति उपरी तुम्ही गेलियापासून तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर हरघडी पत्र पाठवून संतोषवीत जाणें. इकडील जें वर्तमान होतें तें वारंवार तीर्थरूपास लिहितां आणि तुम्हीहीं श्रीमंता जवळ बोलिलेस जें, एका दो दिवसीं राजश्री पंतास घेऊन येतां, त्यास येथील गोष्टी येथेंच विसरला. तेथें गेलियावर इकडील तुम्हांस स्मरण होत नाहीं. यैसें दिसोन आलें. या उपर तुम्ही तीर्थरूपाबरोबर सत्वर येणें. यावयासी विलंब न लावणें. राजश्री पद्मोजी जाचकाचा कागद आला आहे तो बजिनस तीर्थ-रूपाकडे पाठविला आहे व तुमचा कागद तुम्हांकडे पाठविला आहे. त्याजवरून सविस्तर वृत्त कळेल.* बहुत काय लिहिणें हे विनंती.

(2) Ramchandra alias Baburao Konher Kolatkar writes to Vishwanathbhat that Padmoji Jachak's two letters—

one addressed to dear father and the other to you—are sent herewith. He also shows the necessity of both coming to Satara soon.

---

* पुढील लेखकाचें स्वतःचें हस्ताक्षर.

---

No. 3 श्री. शके १६६८ सन १७४७

राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यासी

दा. अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नों

**पदमोजी जाचक** दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणौन स्वकीयें लेखन केलें पाहिजे. विशेष तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. तेथें लिहिलें कीं, पूर्वील कित टाकून एकनिष्टेनें वर्तणूक केलिया तुमचे चालवावयासि राजश्री **रघोजीबाबा** व राजश्री **कोनेरपंत** अंतर करणार नाहींत, ऐसें कितेक सविस्तारें पत्रीं लिहिलें. येविसीं राजश्री **बाजी विठल** यांसि जबानी सांगणें तें सांगितलें आहे व राजश्री **रघोजी-बावा** व राजश्री **कोनेरपंत** या उभयातांचीं पत्रें पाठविलीं आहेत, तीं मनास आणणें व राजश्री **सिवरामपंत** यांणींही तुम्हांस लिहिलें आहे त्यावरून कळेल, तरी ये गोष्टीचा सिधांत लेहून पाठवणें, म्हणोन लिहिलें. यैसीयासी आपले वडिलावडील यांणीं भोसल्यांची सेवा निष्टेनें केली. आम्ही औघे जाचक नवाजीन भोसले यांचे. ऐसें असतां **लक्षुमणजी खंडागाळा** याणें खावंदास कितेक वदगोईच्या गोष्टी समजाऊन आम्हांत व खावंदांत विरुध पाडिलें. आम्ही गेलियावरी मागें धाणियावरी निमित्य घालून आपला भाऊ **चिरंजीव राजश्री मानाजी जाचक** यासि मारिलें. त्या उपरी आपण कांहीं दिवस त्या प्रांतेंच होतों, आलीकडे आजि पाचसा वर्षे राजश्री **पंतप्रधान** या समागमें आहों. तेही आपले बरेच रीतीनें चाळ-विताती. परंतु आपण पुरातन चाकर भोसले यांचे, ते त्यांचे त्याजपासीं राहून निष्टेनें शेवा करून आपले सरंजाम करार करून घ्यावें, आणि आपलें ऊर्जित खावंदापासून करून घ्यावें, हा मनोदय आपला आहे. दुसरा अर्थ आपणांस किमपिही नाहीं. या करितां आम्ही आपणाकडील निश्चय

जो आहे तो तुम्हांस लिहिला आहे. या प्रमाणेंच त्यांच्या मनांत असिलें तरी बरेंच जालें. यास्तव तुम्ही राजश्री रघोजीबाबा व राजश्री कोनेरपंत यांसि पुसोन निश्चयरूप आम्हांस पदरीं घेऊन सरंजाम नेमून देऊन आदर सन्मान करून आपलें ऊर्जित निःकपटपणें करितील, तरी शोध मनास आणणें आणि निश्चयाचें पत्र त्या उभयतांचें व तुम्ही आपलें यैसीं पत्रें राजश्री सिवरामपंत याजकडे देणें. ते तीं पत्रें व आपलें पत्र आम्हांकडे पाठवितील. दर्शनास दिनशुध लिहितील, त्या प्रमाणें आपण येऊन. दुसरें पुर्वणीचें पत्र आहे व यादी आहेत, त्या प्रमाणें कार्य करून पाठवणें. बहुत काय लिहिणें स्नेह असो दीजे हे विनंती.

श्री

पुरवणी राजश्री विश्वनाथभट वैद्य गोसावी यासि.

विनंति उपरी पहिले पत्रीं सविस्तर अर्थ लिहिला आहे तो अक्षरशाहा ध्यानांत आणून उतर पाठवणें, बोलिस तफावत नसावी. ज्या प्रमाणें करार करावा त्या प्रमाणें खावंदानें चालवावें व आम्हीही करारा प्रमाणें चालोन निष्टेनें शेवा करून. आपला दुसरा विचार नाहीं. चिरंजीव राजश्री मानाजी जाचक याचे पुत्र शेवेसी उमेदवार आहेत, त्यास टाकून आम्हीच आलियानें आम्हांस उचित नाहीं. या करितां पुरातन मानापाचा सरंजाम आहे तो त्यांच्या पुत्रास करार करून द्यावा. सरंजामाची यादी व बहुमानाची व भेटीचा सिधांत व हालीं नालबंदी व पुणाचें कर्ज वारावें, यांचा करारनामा तहबंद सिकियानसी पाठवणें. ते आलियावरी आपण भेटीस येतां. वरकड कितेक मजकूर राजश्री सिवरामपंत यांचे पत्रीं लिहिला आहे व राजश्री बाजीपंत यांस मुखवचनें सांगितलें आहे, त्यावरून कळेल.+ बहुत काय लिहिणें स्नेह असो दीजे हे विनंती.

---

+ पुढील मजकूर पद्मोजीच्या हातचा.

(3) These letters are written to Vishwanathbhat by Padmoji Jachak. asking him to do his best to get back their old family saranjams &c in the name of Manaji's son from Raghuji Bhosle, whose ears were poisioned by Laxmanji Khandegale against his family resulting in

Manaji's death. He assured that he will leave the services of the Peshwas and join Bhosle's services on receipt of his letter with Raghuji's consent to fulfil the conditions proposed.

---

No. 4 श्री शके १६६८
सन १७४७

राजश्री विश्वनाथबावा गोसावी यांसी

दा. अखंडितलक्षुमी आलंकृत राजमान्ये स्नेहांकित मानाजी जाचक दंडवत. विनंति उपरी, येथील कुशळ जानऊन स्वकीयें लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. तुम्हांकडून रा रामाजीपंत आलेत त्यांहीं कितीक वर्तमान सांगितलें, त्याजवरून तीर्थरूप रा पदमोजीबावा यांचें बहूत समाधान करून ठेविलें आहे. यैसीयास श्रीमंताचें येन येथ अद्याप होत नाहीं, तेथील काये वर्तमान आहे तें कळत नाहीं. यैसीयास रा पंत मजकूर तुम्हांकडे पाठविले आहेत तरी अती सत्वर श्रीमंतास घेऊन आलें पाहिजे, वरकड वर्तमान रा रामाजीपंत जबानी सांगतां कळूं येईल. बहुत काये लिहिनें. हे विनति.

(4) Manaji Jachak requests Vishwanathbhat to come with Raghuji as early as possible. Unless they come, Padmoji, his father, will not find satisfaction, notwithstanding his attempts to do so, from the account given by Ramajipant.

---

No 5 श्री शके १६६८
सन १७४७

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळंभट व विश्वनाथभट वैद्य स्वामीचे सेवेसी.

पो गोविंद सामराज व रामचंद्र सामराज कृतानेक सां नमस्कार विनति, उपरी स्वामींचे आम्हांस अंदुरच्या रसदेमा यैवज देणें होतें, त्यांपैकीं कर्ज वजा करून कुसाजी [illegible] व [illegible] पाठविले,

यांजबराबरी रुपये ५००० स्वामीकडे पाठविले आहे. हे घेऊन पाव-लियाचें उतर पाठविलें पाहिजे. रुपयास बटा सहसा केला न पाहिजे. आम्ही स्वामीच्या पदरांचे असो. सर्व संकट आमचें स्वामीस आहे. रुपयास बटा न करावा. कर्जाचे रुपये काढून पाठविले आहेत, तरी सदरहू रुपये घेऊन जाब पाठविला पाहिजे. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे हे विनति.

---

(5) Govind and Ramchandra Samraja had borrowed money for securing the mamlat of Andur. They sent Rs. 5000 to Vaidyas out of debt, incurred from them

---

No. ७ श्री

माघ व. ६।१६६८
जानेवारी २१।१७४७
ते ज्येष्ठ शु. १५।१६६९
जून ११।१७४७

हिशेब राजश्री बाळाजी बाजिराव प्रधान झा सन सबा क्षय ता प्रभव जेष्ठ सुा १५ सुा तिसा आर्बैन मया आल्फ.

—— यैन —— व्याजदर,

क्षय

| | | | | |
|---|---|---|---|---|
| माघ वद्य ६ | तागाईत | प्रभव | ५००० | १९० |
| जेष्ठ सुा १५ मु | माहे | ८३ ८२४. | | |
| माघ वद्य ११ ता मु माहे | | ८३ ८१९. | ९२५ | ३३॥≈ |
| माघ वद्य ९ ता मु माहे | | ८३ ८२१. | ७२७५ | २६९८= |
| फाल्गुन सुध १ ता मु माहे | | ३ रोज ८१४. | १२२५ | ४२।।। |
| फाल्गुन सुा ६ ता मु माहे | | ३ रोज ८९. | ५७५ | १९ |
| | | | १५००० | ५५४॥- |

—— प्रभव संवत्छरे

गुजारत वेंकाजी नाा पोतदार
जेष्ठ सुा १५ रुा १५०००

बाकी व्याज प्रभव जेष्ठ ७५ ११

विनसूट येणें, रु ५५४॥-

(6) An account of Nanasaheb Peshwe for money borrowed from Vaidyas in 1747 from January to June.

No. 7 श्री फाल्गुन शु. ५।१६६८
फेब्रु. ३, १७४७

श्रीमंत राजश्री **बाळंभटबावा** ता। राजश्री **विश्वनाथबावा** स्वामीचे सेवेसी.

पो। **महादाजी कृष्ण व हरी कृष्ण** सां। नमस्कार विनंती. येथील कुशल फाल्गुन शुद्ध पंचमी जाणून स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष राजश्री **रघोजीबावांनीं** रा। **रामचंद्रपंता** कडून नालबंदीचा यैवज देविला, त्यासी चार महिने सेपनास स्वारानें सेवा घेतली; परंतु यैवज द्यावयास न फावलें. रा। **रघोजीबावा** व रा। **कोन्हेरपंत** यांची भेट जाहली. महिनाभर त्यांची सेवा केली; परंतु आनकुलता न जाहाली. समागमें जावें तर पुढेंही जानीचेमार्गीं साकडें, पाचसे रु॥ नकदी खर्चास तरी देणें, तेंही न जाहालें. गुदस्ता तीनसे रुपये नकदी समागमें होते, त्यांतें ठिकाणीं लाऊन सेपनास कर्ज घेतलें. सारांश पोटाचेच आनकूल न जाहालें. दूर देश, खर्चाविना पंथ न चाले. उपवासी लोक न येत. नालबंदी तो राहिली. पोटास न मिळे. सविस्तर वृत्त राजश्री **नारोपंतांनीं** व **शंकराजी कान्हो** वरकड ग्रहस्त आपणांकडील होते. रा। धोंडोपंत, जाचकासमागमें होते. त्यांणीं रुबरू पाहिलें. यैसें साकडें जाणून निदानी जाहालें यैसें आनकुल आसतां जिवाचा नाश जाणून घरास आलों. लस्करास येतो म्हणून पत्रें आलीं होतीं. **बंगाले** यासि फौज गेली, आठ दिवस घाट झाडीचा. लस्कर जाई तोंवरी होतो. मार्गप्रतिक्षा पहात राहिलों. येणें न जाहालें. परस्तुत यावें तर गैर हंगाम. पुढं अखेरीस येऊन पोहचतों. ज्याचे सोबतीस कर्जदार जाहालों ते तो **बंगालेयासि** राहिले. भरंवसा जिवंत आहे म्हणान सैन्य आणावयासी गेले आहे. आलिया उत्तम आहे. याचा भरंवसा

दिसोन येत नाहीं. प्रहस्तपणापासून दूर दिसते. स्वामीचा भरवसा आहे, हरएक धंदा करून. देणेयापासून मुक्त करणार समर्थ स्वामी आहेत. पत्राचें उतर आलिया वर्तणूक करून. रा. कोनेरपंत देणेयाचें पुसतात, परंतु त्याचा निरवाह करून देणें, हा प्रसंग स्वामीवाचून होत नाहीं. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

---

(7) Mahadaji & Haripant Kane write to Vaidya brothers that they do not intend to proceed with Raghuji in his invasion of Bengal as they are not getting the necessary money for meeting his own expenses and those of soldiers etc. They relied on Vaidya brothers for paying off the debt of Konerpant and other sawakars.

---

No. 8

श्री.

४ सफर
फाल्गुन शु. ५।१६६८
फेब्रुआरी १, १७४७

मोकदमानी कसबे भोरे ता रोहिडखोरें यासी.

आज्ञा केली येैसी जें कसबे मजकूर, रा वेंकटराव गंगाधर याजकडे दुतर्फा मुकासा आहे त्यास त्यांणीं राजश्री बाळंभट व विस्वनाथ भट वैद्य यांजपासून कर्ज घेऊन यांस कर्जाचे येवज फारिक होय पावेतों, कसबे मजकूर लेहून दिल्हा आहे, तरी मानिलेसी रुजू होऊन कसबे मजकूरचा दुतर्फा मुकासबाबेचा आकार होईल तो यांजकडील कमाविसदाराकडे सुरलीत वसूल देणें. वेंकटराव यांजकडे अगर त्यांणीं कोण्हासही येवज दिल्हिया, येकंदर येक रुपया त्यांजकडे न देणें. जाणीजे छ ४ सफर सुरु सबा आर्बैन मया आलफ. याकडे वसुल देणें.

---

(8) It is an order to the Mokadam of Bhore of Bhor state that as the revenue of the Village is given to Vaidya brothers by Vyankatrao Gangadhar Hanumante till the debt borrowed by him from them is wholly paid, the revenue should not be given to him or his agents but to Vaidya's men, sent for collection. It is to be seen when this village was granted by Sachive to this family.

No. 9 श्रीशंकर फाल्गुन वा ५।१६६८
फेब्रुआरी १८, १७४७

राजश्रियाविराजित राजेश्री **नारोपंत** व **केसोपंत** का **भुगांव** गोसावी यासी.

सेवक **विश्वनाथभट वैद्य** नमस्कार. उपरी येथील क्षेम ताा फाल्गुन वद्य पंचमी पावेतों समस्त सुखरूप असो. यानंतर तुम्हांकडील वर्तमान कलत नाहीं, तर सविस्तर लिहिणें व राजश्री **रघोजीबावा** कडील सविस्तर वर्तमान लिहिणें. तुम्हांस सांगितल्या प्रों कामकाज करून व यादीप्रमाणें रुपये वसूल करणें. राा **आपाजीपंत** सुभेदार यांजकडील व **सदासीव हरी** कडील व लोकाकडेस येणें आहेत ते वसूल करून सत्वर घेऊन येणें व **पोतदारीचा** यैवज वसूल करणें. राा **संकराजी कान्हो** यांजकडील रुपये आले नाहींत, तर त्यास ताकीद करून रुपये सत्वर पाठवणें. गांवची लावणी करणें. राा **दुलभराम** याचा मजकूर कसा काय जाला तो लिहिणें. राजश्री **रघुनाथभट पटवर्धन** यांजवल रुपये **दुलभरामाबा** पचतीस हजार मागणें. त्याजवर वरात आहे. मागोन घेणें. रुपयाचे जरूर फार आहे, तर रुपया यादीप्रों निकड करून वसूल करणें आणि हुंडिया सत्वर पाठवणें. तुम्हीही सत्वरच येणें. आमचीही रवानगी **स्वामींनीं** केली आहे. त्यास उष्णदेश व **श्रीमंतांचे** आगमनाचा विचार सत्वरच आहे, असें परस्पर वर्तमान येथंभूत ठीक नाहीं. याजकरिता हें पत्र तुम्हांस लिहीलें आहे. तर **बावांस** पुसोन कधीं येणार व आम्ही कोठें यावें यैसें पुसोन सविस्तर वर्तमान लिहीणें. बहुत काये लिहीणें हे विनंती. आमचे नांवाचे कागद **बावांस** पाहिजे तर लिहोन देणें.

पैवस्ता चैत्र अधिक सुध येकादसी बुधवार.

---

(9) Vishwanathbhat was trying his best to improve Raghuji's relations with Shahu. The details given in this letter are very valuable. It seems, out of the money recovered as fine for Dulabharam, Vishwanathbhat was to receive Rs. 35000 through Raghunath bhat Patwardhan. Vishwanathbhat was asked by

Shahu to go to Raghuji in Berar at this time. But Raghuji intended at this time to go to Satara. He wanted to know the exact information about the departure of Raghuji as he was to avoid to go as far as Nagpur, the days being very hot. The whole letter is in the hand of Vishwanathbhat.

---

No. 10

श्री

४ रबिलाखर
चैत्र शुद्ध ५।१६६९
मार्च ४, १७४७

चिरंजीव राजश्री **बाळंभट व विश्वनाथ भट व बापू भट वैद्य** यांसी. **केसो बहिरव वैद्य** आसिर्वाद उपरी. येथील कुशल ता। छ ४ रबिलाखर मु॥ **पुणें** समस्त सुखरूप आसो विशेष. **गवाहागर प्रांत शामला** कडील **तुलाजी आंगरे** यांजकडे जाला आहे. त्यांस **नरवणच्या** वतनाविसीं या समई खटपट केल्यास हस्तगत होय यैसें आहे, त्यास **गवाहागरच्या माहाजन कुलकर्णी** यांसी पुसिलें, त्यास त्यांणीं सांघीतलें कीं, आम्ही साक्षी जसी म्हणाल तसी देऊं. जें पूर्वी **वैद्यांचें** वतन होतें तें आम्हांस सर्वांस ठावकें आहे, तरी तुम्हास वेदमूर्ती राजश्री **नारायेणभट** यांसी लिहिणें कीं, नरवणकर माहाजन व ग्रामस्त व ब्राह्मण यांसी पुसोन प्रेत्न करणें. तुमचे विचारें जर हें वतन हस्तगत, खटपट केल्यानें हाये यैसें आसिलें तरी आम्हांस बोलवाल तरी निरोप घेऊन येऊं. बहुत काये लिहिणें. हे गोष्टी विसीं अनमान करूं नये. हे आशिर्वाद. सौ **सरस्वती व उमास व लक्ष्मीस** आशिर्वाद. मातुश्री **सकुबाई** वहिनीस सा॥. नमस्कार.

---

( 10 ) Keso Bahirav Vaidya requested Vaidya brothers to try to secure the Vatan of Narawan as the territory of Guhagar, in which it is situated, has come under the rule of Tuloji Angre. Bapubhat is the grandson of Shidambhat. Keso Bahirav is the grandson of Tanbhat.

---

No. 11 श्री अधिक चैत्र शु. ८,९।१६६९
रविवार मार्च ८, १७४७

श्रीमंत राजश्री **बाळंभटबावा** व राजश्री **विश्वनाथबावा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक **केसो हरी सावरकर** कृतानेक सिरसाां नमस्कार. विनति उपरी येथील क्षेम ताा चैत्र अधिक सुध नवमी रविवार पर्येंत स्वामीचे कृपावलोकनें करून सुखरूप असे विशेष. ये प्रांतींचें वर्तमान तर श्रीमंत **बाबासाहेब** यांचे **नागपुरीं** मुकाम आहे. आठा दिवसीं **चैत्रवदी प्रतिपदेस** स्वार होऊन **सातारेयास** येणार आहेत, यैसा करार आहे. वरकड श्रीमंत राजश्री **जानोजीबावा**बरोबर फौजा देऊन **बंगालेयास** रवाना केले, तें आपणास विदीत जाहालेंच असेल; परंतु सूचनार्थ लिहीलें आहे, यानंतर मौजे **टेकाडीचें** वर्तमान तर आपण च्यारसे रुपये त्यास देविले, त्याप्रों त्यास पावते करून कबज घेतलें. साल गुाापैकीं बाकी पाटील मजकुराकडेस होती, ते बाकी च्यारसे रुपये त्याजपासून **रामटेककरांनीं** घेतले व सालमजकूरचे यैवजी रा **नाईकांची** वरात सातसे रुपयाची होती, त्याकरितां गावावर बहुत उपद्रव केला. त्याविसीं **श्रीमंतापासी** विनति केली. त्यांहीं जबाब दिला जें, ते वरात मागील आहे, ते रुपये देणें. त्यावरून **नाईकाचे** चौघे माणसें गावावर येऊन बहुत दंगा केला. आण रुपयेयाची निशा करून घेतली. येकूण अकरासे रुपये त्याकडेस मौजे **टेकाडीपैकीं** वसूल गेला. बाकी राहिला तो सरकारांत येईल; व काा **भुगांवचें** वर्तमान तर गुााप्रों रुपये वसूल होत नाहीं. पाच हजार रुपये पावेतों वसूल होईल. जाजती वसूल होत नाही, आण हजार पाचसे वराल अधिक घेतालियानें पुढें इस्तमालत होणार नाहीं. पस्ट स्वामीस लिहीलें आहे. याजकरितां स्वामींनीं रागास न यावें. हे जागा स्वामींची आहे. ज्याप्राां स्वाम आज्ञा करितील, त्याप्रों वर्तगू(क) करून. परंतु पुढें काा मजकूरची इस्तमालत जाहालियानें साल मजकुरी वसूल कमी आला तर पेस्तर सालीं स्वामीची जागा राहोन येईल, याविसीं जे आज्ञा करणें ते केली पाहिजे. आम्ही सेवक आहों. जे गोष्टीनें साहेबांची किफाईत होईल तें करणें. यांजकरितां वारंवार विनंती

लिहितों. पुढें रयेत राहोन आली, लावणी उतम जाहाली, हें ही खावंदांची किफायतच आहे. त्यामध्यें जे आज्ञा येईल त्याप्रों वर्तणूक करून. वरकड सविस्तर दरबारचें वर्तमान रा। नारोपंतांनीं लिहीलें आहे, त्यावरून सेवेसी विदित होईल. पोतदरीचें काम प्रस्तुत सुरू होण्यामध्यें आहे. स्वामीचे पुण्यप्रतापें करून पोतदारी चालती करीतच आहों. वरकड सविस्तर याप्रांतीचें वर्तमान राजश्री विठलपंत मुखवचनें सांगतां कळों येईल. बहूत काये लि॥ कृपा निरंतर कीजे. हे विनंती.

---

(11) The movements of Raghuji towards Satara and of Janoji into Bengal are available in this letter and explain the situation as narrated in the Peshwa Daftar. Keso Hari Sawarkar, a Vaidya's clerk, has written all this information from Nagpur and explains how the revenue of Tekadi and Potadari amal can be recovered.

---

(शिक्का चौकोनी दुरेघी) श्री ९ रावल सबा आर्बेन

No. 12 अधिक चैत्र शु. १०।१६६९

मार्च १०, १७४७

तदा. मा.अनाम देशमुख व देशपांडे प्रों सुपे यांस चिमणाजी नारायेण सचिव सुहुर सन सबाःआर्बेन मया आलफ मौजे काराटी पा।

| श्री<br>शंकराजी<br>नारायण |
|---|

मा।र सुहूर हा गांव राजश्री स्वामींनीं पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हालीं वेदमूर्ती राजश्री बालंभट बिन रघुनाथ भट वैद्य गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायेन यास स्वराज्य-व मोगलाई दुतर्फा, देखील इनाम तिजाई व बाबती कुलबाब, कुलकानू, हालीपटी व पेस्तरपटी, खेरीज हकदार कदीम इनामदार करून, गांव यांस इनाम करून दिल्हा आसे. ये विशीं पत्रें सादर केली आहेत, तरी तुम्ही मौजे मजकूर वेदमूर्तीस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम सनदेप्रमाणें चालवणें. दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन आसल पत्र भोगवटीयास मा।रानिले जवळ परतोन देणें. जाणिजे छ ९ रबिलावल पा। हुजूर. (पत्रावधिरयं भाति) (मोर्तब चौकोनी दुरेघी) सुरूसुदबार.

(12) This is an order of Sachiv to Deshmukh and Deshpande of Paragana Supa to execute the terms of the Inam Sanad of Karhati granted to Vaidya brothers by Shahu Chhatrapati. The Sachive has used the seal of Shankaraji Narayan. There is a similar order to the mokadam of Karhati which is not printed.

---

No. 13 श्री वै. शु. ३ शके १६६९
मे १, १७४७

राजश्री **विसाजी रघुनाथ वैद्य** यांसी आज्ञा केली ऐसीजे, राजश्री **रायाजी भोसले** व **संताजी भोसले** हे उभयतां **वराड** प्रांतीं धामधूम करणार म्हणून हुजूर विदित जाहलें. त्याजवरून त्या उभयतांस हुजूर यावयाविसी आज्ञापत्रें सादर केली आहेत. तरी तुम्ही त्यांस सागणें तें सागून स्वामीसंनिध घेऊन येणें, व राजश्री **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा यांसही यावयाविसी आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी त्रिवर्गास घेऊन तुम्ही हुजूर येणे. त्रिवर्ग आलियावर जे आज्ञा करणें ते केली जाईल. वरकड लिहिणें तें आलाहिदा पत्रात लिहिले आहे, त्यावरून कळेल. सत्वर त्यास घेऊन येणं. + त्रिपरघास घेऊन येन. बहुत काय लिहिन.

---

+ येथून पुढे शाहू महाराजाचे हातचे अक्षर आहे.

(13) This letter proves Shahu's concern in the family dissentions of Raghuji, Rayaji and Santaji. He orders Vishwanathbhat to bring to his presence all the three at Satara. The last sentence which ends the letter is written by Shahu himself.

---

No. 14 श्री वैशाख शुद्ध १०।१६६९
मे ८, १७४७

श्रीमंत राजश्री **बाळंभटबावा** व तथा राजश्री **विश्वनाथबावा** स्वामीचे सेवेसी,

आज्ञाधारक **संकराजी कानो** साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील वर्तमान ता। वैशाख सुध दशमी मु॥ **नागपूर** जाणोन यथास्थित असो विशेष. स्वामीनीं कृपादृष्टी करून, पत्र राजश्री

**विसाजीपंत खासनीस** यांच्या जाबुदा बराबरी पाठविलें, तें उतम समई प्रविष्ट होऊन बहुत संतोष जाहला. यैसाच सेवकाचा परामृष हरघडी घेत आसिलें पाहिजे, विशेष. येथील वर्तमान श्रीमंत **राजश्री बाबासाहेब वैशाख सुध** पंचमीस स्वार होऊन **वराड** प्रांतास गेले. तेथून **सप्तऋसीस** जाणार. त्यांस **पोतदारीचा** व रा **दुलभरामाकडील** वरातेचा मजकूर तरी रा **नाना** व आम्ही दोन महिने **श्रीमंतापासीं** संध्याकाळीसकाळीं हटकीत होतो जें, **दुलभरामाकडील** रुपये मना केले त्याची वाट काय? त्यास **श्रीमंत** बोलत जे, आज उद्यां विलें लावितों. यैसें बोलत. त्यास काम विल्हें लागेना. मग राजश्री **नाना** स्वार होऊन गेले. मग आम्ही **पंधरावीस** रोज हमेशा दरबारास जात असतां, आतां घटलों यैसें म्हणत होते. मग पंचमीस स्वार होऊन गेले; ते समयीं बराबरी **व्याहाड** पावेतों समस्त मुछेदी गेले, त्याबराबरी गेलों. साऱ्यांस आज्ञा होऊं लागली, ते समयीं पुसिलें, तेव्हां हातीं धरून राजश्री **बगोजीपंताचे** हातांत हात व राजश्री **तुळजोपंतदादाचे** हातांत हात घालून सांगितलें जें, सेकडा येक रुपया प्रमाणें **पोतदारीचा** अमल खामखाय चालीस लावणें. त्यांस मी अर्ज केला जे, सनद सेकडा रुा. २ प्रमाणें आहे. त्यास सनद पाहूं यैसें बोलिलेवरी सनद रा **केसोपंतापासीं** कुल सनदा आहेत, त्यांस **भुगाव** सुटत नाहीं, सनदाही आम्हापासी देत नाही. तेव्हां आम्ही श्रीमंतापासी बोलिलों जें, सनद बिराडीं राहिली. मग बोलिलें कीं, अमल चालीस लागो दे, मग आम्ही **सातोरयासीं** जातां, मग **विरोबांची** भेट घेऊन मागून दोन रुपये सेकडा यैसी सनद पाठवून देऊन. यैसें बोलिलें. मग **दुलभरामाचे** रुपयाचे पुसिलें, ते [व्हां] जाब दिला जें, राजश्री **विसोबाची** भेट घेऊं आणि रुपये तेथंच देऊं. तू [तीं] **पोतदारीचा** अमल सेकडा रुपया प्रमाणें करणें. यैसें वर्तमान जालें. **भुगावचें** वर्तमान तरी राजश्री **केसोपंती** खाचर नेविलान रुा ५० पनासाचें व बइल रुपये पंच्यासी व सामानसुधा दीडसे रुा लावून खाचरांत बसोन गांवास विडे धावयास जात होते; त्यास खाचर उलटलें, आणि मोडलें, खालें पडलें हात मोडला. यैसें वर्तमान गावचे लोक *हाटास आले, ते सांगत होते. **झुलार्जीचे** येकच लेक होता तो देवींनी मृत्य पावला.

पुा।र श्रीमंतांचे सेवेसी,

विनंती उपरी. त्यामुळें **झुलाजी** बहुत श्रमी आहे. त्याचे समाचारास गेलों. येकादसीस गेलों. स्वामीस विदित व्हावें, याकारितां सेवेसी लि।। आहे. **नागपुरची** सनद दरबार खर्चाची फिरली. हिसेबी मजुरा दिली नाहीं. राजेश्री **आपाजीपंत सातारा** बराबरीं गेले आहेत. **चांद्याच्या** सनदा अगदीं फिरल्या. हिसेबी मजुरा नाहीं दिल्या. **मोहनसिंगाकडीलही** फिरल्या. जेवढी सनद आपण दसर्यांत घेतली. तेवढी सनद गैरमजुरा पडली आणि फिरफिरो(न) टाकिल्या. मागाहून जाबुदाहार्ती पाठऊन देतों. आम्हांस यंदा कांहीं पावलें नाहीं. आपणावरी स्वामींची गैरकृपा व चाकरी तो मजवरी पडते. तें सर्वांस ठाऊक आहे आणि आपणांसही विदित आहे. मी बहुतदां लिहीलें जें, आमिली असामी **भुगावची** नाहीं. हमेशा **भुगांव** सुटत नाहीं. ख्याल तमासे होत असतात. आम्ही तो **भुगांव** टाकिलें. तें वर्तमान **नानास** विदित आहे. याप्राती आपणांकडील **काबील कोणी नाहीं. या करितां राजश्री **नानास** **भुगाव**, **टेकाडी**, **मवाड** सर्व धंद्यावरी पाठविले पाहिजे. तेणेंकरून हजार दीड हजार रुपये ज्याजती पैदास्त होईल, आणि बंदोबस्त अगदी होईल. स्वामींच्या विचारं होईल तरी बरें, नाहींतरी स्वामी खावंद आहेत. स्वामींनीं आपणास जे आज्ञा केली आहे, त्याप्रमाणें करीत आहो. **देवगड प्रांत** व **वराड प्रांत** राजश्री **तुलजोपंताचे** हवाले केले आहे. आमच्या आसाम्या तीन आहेत, त्या दोन खर्या करून घेतल्या. वकिली व दप्तरदारी दोन्ही घेतल्या. **चांद्याच्या** असाम्या अगदीं दूर जाल्या. राजश्री **नेगीकडील** वर्तमान पत्रीं स्वामींनीं लिहीलें जें, हुंडनावळ खेरीज **नेगीनें** देऊं केली व व्याज रुपये **सातारा** पोंचेतों पावेतों, येसें लिहिलें. तरी राजश्री **नाइकाचें** पत्र नाइकास दिलें. त्यांणीं जाब दिला, जी, दुबारा हुंडनावल कोण देईल ? हे कोठील सावकारी ? व व्याज येथें रुपये जमे करून देतील. **सातारा** पावेतों कोणी देणार नाहीं. त्यांणीं इस्तकबील पासून व्याज धरिलें. तुटमुदतीनं दिलें. रुपये त्यापासून ६७२ साहासें बाहातर रुा व्याज केलें. त्यापैकीं च्यारसे रुा पावले. बाकी रुा २७२ दोनसें बाहातर राहिले. ते घेऊन खत रुा [illegible]

नाहीं. त्यास स्वामींनीं काय आज्ञा ते केली पाहिजे. बहुत काये लिहीणें. सेवकावरी लोभ असो दिला पाहिजे. हे विज्ञापना.

राजश्री रामचंद्रपंताचे सेवेशी संकराजी कान्हो साष्टांग नमस्कार. लिा परिसिजे, लोभ असो दीजे हे विनंती.

---

* बाजार. ** कर्तबगार, हुशार.

(14) Raghuji Bhosle starts for Satara with his son Mudhoji as explained in another letter. There was a move on Shahu's part, to adopt him. The letter also contains information about the management of inams by Zulajipant, Keso Hari Sawarkar, Tuljopant and the recovery of money from Negi and the news of the death of the only son of Zulajipant.

---

No. 15

शके १६६९
सन १७४७

श्री

तहनामा सरकार राजश्री फत्तेसिंग भोसले सुरु समान आर्बैन मया व आलफ

प्रा वराड येथें आमचे वाटणीचा सरंजाम आहे त्यापैकी रा रायाजी भोसले याच्या वाटणीचा सरंजाम आहे तो वजा करून बाकी महालामध्यें पादशाहे आम्हीं द्यावें बाकी राहिले महाल निमे तुम्ही द्यावें, निमे आम्ही द्यावे. क़लम १

\+ + + +

जामाचे द्या + + +

निमे आम्ही घेऊं कलम १

संस्थान चंद्रपूर यापैकीं महाल तुम्हांकडे राहिले मुकरार बीा तप शील.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पा पैरागड | १ | पा ब्रम्हपुरी |
| १ | पा उमरेड | १ | पा चांदूर |
| १ | पा पवनी | १ | पा प्रतापगड |
| १ | | १ | |
| १ | | १ | |

१०

राजश्री **कानोजी भोसले** यांचे कारकीर्दीस कदीम संस्थानें मजकूर दफ्तरीं वाटण्या आहेत. बी॥ ता॥ १ प्रांत **गढे** १ सरकार **बांदिया** १ पा॥ **वाडीचेनसें** १ सा॥ **गणोरें** १ संस्थान **मांडवगण** १ संस्थान **धामोणी**

एकूण दहा माहाल वजा करून बाकी संस्थानेंदिकांचा तह चालत आहे त्या प्रमाणें चालवावा. बाकी संस्थानसुधां **गढ्या** व **कोट** व **किल्ले** जे संस्थानाखालें राहिले असतील ते आम्हांकडेस द्यावें. कलम १

तुमचा **सरंजाम** संस्थानें बी तपशील.

१ सुभा **बंगाला** देखील **मकसुदाबाद**

---

(15) This is a treaty between Fattesing Bhosle and Raghuji Bhosle in which the territories assigned to them are given.

---

No. 16

ज्ये शु. १।१६६९
मे २९,१७४७

श्री

राजश्री **बाळंभटबावा व राजश्री विश्वनाथ** वैद्य गोसावी यांसि

दा॥ अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री॥ **पदममोजी जाचक** दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करवीत गेलें पाहिजे. विशेष आपण पत्र पाठविलें तें प्रा॥ होऊन लेखनार्थ सविस्तर कळोन बहुत समाधान जाहालें. लिहिलें कीं, चिरंजीव राजश्री **आनंदराव** यास कोण्हीकडे हेलपट्यास पाठवावयाचा॥ आणविलें नव्हतें. **सेळके** यांच्या कजियाबद्दल आणविलें होतें. त्यास कजियाचा निर्गम जाहला व राजश्री **रघोजीबावा भोसले** यांसही श्रीमंत महाराज राजश्री **स्वामींनीं** आज्ञा देऊन वस्त्रें दिल्हीं. हेही जेष्ठ सुध प्रातिपदेस स्वार होणार,

येथून स्वार जाहल्यावरी तुम्हांस पत्र जाईल. तेणं प्रों विचार करणें म्हणोन लिहिलें तें कळलें. यानंतर राजश्री **रघुनाथजी भोसले** यांचे नालबंदीचा यैवज रुपये दोन हजार आद्याप हातास येत नाहीं हालीं रा **बाजी विठल** यांणीं लिा कीं, एका दोन राजीं चिठी द्यावयाचा करार जाहाला आहे म्हणोन. तरी आपणासारिखे आमचे मुरबी असतां दोन हजार रुपये ते काय? आणि येवढे मातबर दरबार व आपणही मातबर. मातबर कामें कितेकांची करीत आले व पुढेंही याजहून अधिकोत्तर करणार यैसा विचार असोन, लघु कार्याची तर्तूद होऊन न ये हे गोष्टी अपूर्व आहे व तुमच्याच भरवसेयावरी आम्ही बेफिकीर राहिलो. व आजि उद्या यैसें म्हणतां, तीन महिने जाहाले. तरी हालीं आपणास लिा आहे तरी जैसें कळेल तैसें युक्तीनें यैवज हाताखालें घेऊन मारनिलेस मार्गस्त होत, तें केलें पाहिजे व आमचेही नालबंदीचं कापड दोन हजार रुपयांचं येणं आहे तरी राजश्री **बाबा साहेबांस** सांगोन सदरहू कापड करारा प्रों देविलें पाहिजे. आमचा वोढीचा प्रसंग आहे, कापड कोठें मिळत नाहीं. यैशा प्रसंगीं कापड देविल्यानें लोकास द्यायास कार्यास येईल, हें जाणोन लिहिलें आहे. तरी लिाप्रमाणं रुपये दोन हजार व आमचे कापड पदरीं पडे, ते गोष्टी केली पाहिजे. विस्तार ल्याहावा यैसें नाहीं. सर्व आपणांस विदित आहे. बहुत काय लिहिणं. कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

(16) Padmoji Jachak writes to Vaidya brothers to pay to Raghunathji Bhosle Rs 2000/- the nalabundi allowance as early as possible and so also to ask Raghuji Bhosle to pay the writer his nalabundi amount in the form of cloth. In this letter it is stated that Raghuji was allowed permission by Shahu to go to Nagpur. He means to start on 29th of May. It should be determined how the Jachak family was related to Shelke family

No. 17

जेष्ठ शक १६६९
जून सन १७४७

श्रीरामचंद्र

सकलगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री **बाळंभट** व **राजश्री विस्वनाथ भट वैद्य** स्वामी गोसावी यांसि.

पोष्य **भगवंतराऊ रामचंद्र** कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष राजश्री **सिवाजीपंत** याबो पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान भावार्थ कळो आला. यैसीयासी **थोरले माहाराज** हिंदुपदपादशा समर्थ, राजेलोक आहेत. आम्ही ब्राम्हणलोक च्यारपाच पिढ्या या राज्यांत वडीलवडिलां तो माहाराजांचे पाय, हें वतन जोडलें. याजस्तव वारंवार अर्जे विनंती लिहीत आलों. दोनच्यार वेळा भेटीस सनिध गेलों; परंतु **महाराजांनीं** कृपा करून आमची दाद केली नाहीं, अथवा अर्ज विनंती चालविली नाहीं. वरकड सरकारकून आहेत ते श्रीमंत लक्ष्मीवंत आहेत. त्यांस आम्हांलोकांचें आगत्य नाहीं. **माहाराजांस** करुणा येईल तरीच आम्हांस अन्नवस्त्र देऊन सांभाळ करितील. तुम्ही आमचे दरबारीं मध्यरत आसोन कांही कार्यभाग करून दिल्हा नाहीं. यंदा लोकापवादास्तव **थोरले माहाराज** यांणीं व दिवाणांनीं **कोलापूरचे माहाराज** यांसि उपदेश केला, यामुळें आमच्या घरास **येऊन श्री** देवाच्या उत्छाहांत बोलीचाली करून शफत देऊन, *मेहमानी घेऊन आदरें समागमें **कोलापुरास** घेऊन गेले. दीड माहिना **धा या** संनिध राहिलों. दरबारचा रंगरूप वास, येश, कीर्ति विचार पाहिला. खासा **धणीयांसी** व **साभाग्यवती बाईसाहेबांस** घोडे दोन व वस्त्रंभूषणें दिलीं. कर्जदार जाहालों. अर्जविनंती करणें ती केली, वडिलार्जित सरंजाम, बाबती व खेडीं, वतनी द्यावी आणि वडिलाप्रमाणें दया करून सेवा घ्यावी यैसी विनंती केली. राजश्री **गंगाधर पंडित विशाळगडाहून धणीयांनीं** बोलाऊन आणिलें होतें. आठपनर दिवस राहिले, उभयता सरकारकून मेळऊन धणीयांनी आज्ञा केलीजे, **कागल** घ्यावें. **चिकोडी** घ्यावी. ****काटक** मोडावें, **घोरपडे** मोडावें,

---

* पाहुणचार, आदरातिथ्य, ** गळेकापू, बेरड.

मनसबे करावे, यैसा हुकूम जाहाला. आम्ही उतर दिलें जें, वडील वडिलांपासून येख्तीयार देऊन दया करून चालविलें, त्याप्रमाणें साहेबीं सेवा घेतलिया कालानरूप सेवा घडेल. त्यास हजीर आहों. त्यास **सौ. बाईसाहेबांस** ती गोष्ट मानली नाहीं, बोलीप्रमाणें परिणाम नाहीं. मग राजश्री **आपा प्रतिनिधी** यांस शरीरीं बरे वाटत नाहीं, यामुळें राजश्री **गंगाधरपंत** निरोप घेऊन **विशाळगडास** गेले. आम्ही दरबारीं मागें राहिलोंच होतों. आम्हांकडील बोलीचालीचा प्रसंग, सरंजाम खेडीं देत नाहीं, यैसें जाहालें. मग निरोप घेऊम आम्ही घरास आलों. आवघें राज्य, कोट, किले व ठाणीं राजश्री **अर्जोजी यादव** यांचे स्वाधीन आहेत. राज्यभार **यादवावर** आहे, ते करितील तें होईल. आम्ही ब्राम्हण लोकीं काय करावें ? धणियांसी स्वार्थापुढें परमार्थ आठवत नाहीं. येशकीर्तीचें आगत्य नाहीं. राज्यांतील कदीम पाया मोडिला. राजधर्म मोडले. स्वधर्म बुडाले. आम्हा लोकांचा कंटाळा **सौ बाईसाहेबास** आला आहे. द्वेष करून इतराजी धरिली आहे. राजश्री **आर्जोजी यादव** *इतबारी, विश्वासू जाहाले आहेत, खासा महाराजांचें कांहीं सत्तास्वामित्व चालत नाहीं. यैसी बेदाद जाहाली आहे. राजश्री **गंगाधरपंतीं सातारियासी** बोलीचाली करून राजश्री **श्रीपतराऊ** यांचे विद्यमानें मनसबा केला. **सिरोळचें** ठाणें मागोन घेतलें. राजपत्रें व हुजरे आले. सेवटी फजित पावोन माघारे गेले. लोकोत्तर अपकीर्ति जाहाली. तैसी गत आमची होईल. यैसा विचार पाहोन आपली इजत राखोन काळ घालवीत आहों. सविस्तर **थोरले माहाराजांस** येकांतीं विदित करणें. राजश्री **अपा प्रतिनिधी** यांणीं कैलासवास केला. राजश्री **श्रीपतराऊ प्रतिनिधी वारणे** पर्यंत येऊन माघारे गेले. क्रियाकर्म जाहालियावरी राजश्री गंगाधरपंत **सातारियासी** राजश्री **राऊ प्रतिनिधी** याकडेस येणार आहेत. तेथें बोलीचाली होऊन काय मनसबा होईल तो पुढें कळेल. **कोलापुराहून** धणियांचीं पत्रें घेऊन **रखोजी जाधव**, थोरले **महाराज** यांकडे गेले आहेत. त्यांचा भावार्थ तुम्हांस कळलाच असेल. आलीकडेस **कागलकर घा** यांणीं +आंगेजणी करून **यादवांचें** ठाणें मौजे **रुई** येथें होतें, तें घेतलें-

---

* प्रामाणिक + उठावणी, पराक्रम

कोलापूर हवेलीतर्फेची गुरें नेलीं, यैसा रयतेवर कहर जाला आहे. कागलकर घाटगे वतनदार. यांचीं खेडीं ठाणीं देत नाहीं, यामुळें अपाय होत आहे. किरकोळ वतनदार यांचे उछेद जाले. वतनें दिवाणांत ठेविलीं. सागितलें यैकत नाहीं. दरबारीं अर्ज चालत नाहीं आम्हांजवळ राजहौंस किला सौ बाईसाहेब मागत आहेत. रांडा पोरें ठेवावयासी कोठें जागा नाही. भूदरगड, समानगड, वलभगड, तोरगल आदिकरून सिंदे यांचे स्वाधीन आहेत स्वराज्य यादवांचे स्वाधीन आहे. आमचा × × × + करतील तें होईल. कृपा करणें हे विनंतीपूर्वे विदित करून उतर पो. आज्ञा होईल त्या प्रों राहाटी केली जाईल. आम्ही ब्राम्हण लोक अनाथ जालों. पोटास नाहीं. हुजूल.

+ पुढील अक्षर भगवतरावाचे आहे.

(17) Bhagwantrao Amatya writes to Vaidya brothers that Sambhaji Raje of Kolhapur attended the Ramnavami festival at Bawada and took him to Kolhapur. But he was not given his vatan. S. Jijabai, the queen, asked Gangadharrao Vishalgadkar to capture Kagal and to defeat Ghorpade. In the meanwhile Tryambakrao alias Appa Pratinidhi died. Kagalkar Ghatge took the village of Rui of Arjoji Yadav and greatly troubled Kolhapur subjects. He was predominant at the Kolhapur Darbar. S. Jijabaj was demanding from Amatya the Rajahansa fort. (राजहंस किल्ला) (see in P. D. 26 Arjoji's letters.)

---

No. 18 श्री+रामचंद्र जेष्ठ १६६९
जून १७४७

सकळगुणपरिपूर्ण राजमान्य राजश्री बाळंभट व राजश्री विस्वनाथ भट वैद्य स्वामी गोसावी यासी.

पोष्य भगवंतराऊ रामचंद्र कृतानेक नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे विशेष. आलीकडे तुमचें पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. यैसें नसावें. निरंतर पत्र पाठवीत असिलें पाहिजे. चिरंजीव रा सोनोपंत व रा संभाजी पडवळ तुम्हांकडे व राजश्री बाबूनाईक श्रीमंत रा रघोजी भोसले याक-

डेस पाठवीले होते. नालबंदीच्या, × × × दरबारीं तुम्ही × × × आगत्य कोणास नाहीं. कर्जदार जाहालों. सर्वेम्वी आ × केला + दुख कोणास सांगावे ? अन्नवस्त्रांस माहाग जालों. तुमचे वडिली इनाम शफत दिली, व तुम्ही दिली, त्याचा विसर पडला. या राज्यांत आंधार पडला. **बाईसाहेब** व **यादव** करितील तें होईल. आवघे भिकेस लाविले. रा **रघोजी जाधव सातारा माहाराजाकडे** पा आहेत. तेथून आज्ञा आलिया **खासा राजे** भेटीस जाणार. आजम **निजाम किलीजखान** यांजकडे पत्रें वस्त्रें देऊन **दत्तप्रभू** व **मानाजी लिंथे** पा आहेत. खल राजकारण होत आहे, अवघा कारभार कपटी आहे. **माहाराजांस** श्रुत येकांतीं करणें, आमचा धावा करवणें. **माहाराज थोरले** भोळे आहेत. दयेनें कल्याण करावें, हें आमचें मनोगत आहे. विश्वासघात त्याचा मनांत नाहीं. या राज्यांत अपायाची गणना धरीत नाहीं, येसें आहे. हें पत्र वाचून फाडणें हे विनंती हुजुल.

+ पुढील मजकूर भगवंतरावाच्या हातचा.

(18) Bhagawantrao Amatya writes to Vaidya brothers the activities of Sambhaji of Kolhapur, S. Jijabai and Arjoji Yadav. They are securing the cooperation of Naizam and Raghuji Bhosle. Sonopant appears to be the nearest relative of Bhagwantrao. (See letters in P. D. vol. 26)

No. 19 श्री २१ जाखर

जेष्ठ वा ८।१६६९

पेशव्यांचा शिक्का व मे।तेबपिपळपानी जून १९, १७४७




दस्तक सरकार राजश्री **पंतप्रधान** ता कमाविसदारान व ठाणेदारान व चौकीदारान व नदीउतारेयान व बाजेलोकान, जकातीमहालानिहाये सुा समान आर्बैन मया अलफ. राजश्री स्वामींनीं राजश्री **विश्वनाथभट** वैद्य यांस राजश्री **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा यांजकडे रवाना केलें

असेत. या समागमें हत्ती १ व घोडीं व पालख्या व *पडतलें वगैरे+ भारबारदारी आहे, त्यांस मार्गी कोणी मुजाहिम न होणें. ×बादरका देऊन आपलाले हदेनें पोहचावणें, हरयेक जागा नदी नांव *टोकरीयावर उतरून पार करणें. जाणिजे छ २१ जमादिलाखर पा। हुजूर. (लेखनसिमा)

* बाडबिछायत + लवाजम्यासह × संरक्षणासाठीं शिपाई * पलीकडे.

(19) Elephants were sent to bring Raghuji and Mudhoji in procession to Satara for which this permit was granted by Peshwa to Vishwanathbhat Vaidya.

---

No. 20

श्रीरामोजयति

२७ जा। खर
जेष्ठ वध १४।१६६९
जून २५, १७४७

श्रीमंत राजश्री **रघुजीबावा भोसले** गोसावी यांसी.

श्री॥ **खंडोजी गोगवले** हवालदार माहालभांडारग्रह रामराम विनति उपरी. बा। यैवज प्रांत **मकसुदाबाद** वगैरे सालिना तीन लक्ष. पैकीं देणें अनुष्ठान **आचरे** नि॥ राजश्री **बालंभट वैद्य** रुपये ३६०० छतीससे देऊन पावलियाचें कबज घेतलें पाहिजे. तेणेंप्रों। मजरा असे. छ २७ माहे जमादिलाखर सुा। समान आर्बैन मया अलफ हे विनाति (लेखनसिमा).

(20) Khandoji Gogawale an officer of the Maharaja's Khajgi (private) treasury, asks Raghoji Bhosle to pay Rs. 3600 to Balambhat Vaidya who was asked to perform Anusthan at Achre in Konkan, out of the 3 lacs due from him as a yearly payment for the Murshidabad province etc.

---

No. 21

श्री

छ. १० रजब
आषाढ शु. १३।१६६९
जुलै ८, १७४७

राजश्री **विस्वनाथबावा वैद्य** गोसावी यासी.

दा। अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री॥ **शाबाजी भोसले**

दिा पागा राजश्री **सेनासाहेबसुभा** दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १० माहे रजब परियंत मुा **नागपूर** जाणून स्वकीयें स्वानंद लिहीत असिलें पाहिजे. विशेष कृपा करून पत्र पाठविलें तें उत्तम समई पाऊन, लिहिला आर्थ विदित जाहाला. **नरखेडच्या** रुपयाचा मजकूर लिहिला. तेथील वर्तमान कीं, ये प्रांतांस **आलजपूरचे** सुब्याची फौज आली ते समई त्या **येवनांनीं नरखेडचें** ठाणें घेतलें. जमीदार **दलेलभोर** स्थळ भ्रष्ट केला, तो आद्याप बाहीर बाहीर फिरत आहे. ज्याचे नांवें कारभार करून चुकोती केली, त्याचें स्थळ उछेद जालें, याजमुळें आम्ही तुमचे रुबरू **गोसावीयाचें** कर्ज काहाडून तीन हजार रुपये राा **बनाजीपंत बर्क्षास** दिधले होते, ते उगवणी जाहाली नाहीं. **गोसावी** प्रत्यक्ष आहेत. त्याजवर ते स्थळीं **बहादुरजी भोर** आला आहे. ठाणें तो **मोगलाचें** आहे. त्यास आम्ही येते वेळेस त्यांची भेटी घेतली. त्यानीं करार केला कीं, लावणी जालियावर हंगामी निरगत करून देऊं, याजकरितां तुम्ही आपले कमविसदारास येक पत्र लेखन करणें कीं, फुरसतीणें इलाजें कार्य उगऊन घेणें. रोज तगादा करितां, ती तें न करितां तुम्ही लिहिल्यावर फिकीर करावी यैसें नाहीं. पूर्वस्मरण आम्हांस दृढतर आहे; परंतु यैसा प्रसंग त्याचा जाहाला, म्हणून दिवसगत लागली आहे. +सेवेसी विदित जालें पाहिजे. बहुत काय लिहिणें. हे विनंती.

---

\+ येथून पुढें लेखकाचें अक्षर आहे.

(21) Shabaji Bhosale, an officer of Raghuji, managing paga of horses, writes to Vishwanathbhat Vaidya, that Dalel Bhor, Jagadeorao, the Jamındar of Narkhed, was ousted by the Mohamedan army of the Subhedar of Ellichpur and he did not return yet. Bahadurji Bhor is in management of his property. He promised Shabajı to pay the amount in the reaping season.

No. 22 श्री आषाढ शुध १२।१६६९

जुलै ८, १७४७

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **विश्वनाथबाबा वैद्य** स्वामीचे सेवेसी.

सेवक **तुळजोराम** सां नमस्कार विनंती. उपरी येथील ता। आषाढ सुध १२ मु॥ **नागपूर** जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष बहुत दिवस स्वामीकडील पत्र येऊन वर्तमान कळों येत नव्हतें. ते त्यास हालीं राजश्री **चिंतोपता**समागमें कृपा करून पत्र पाठविलें, त्याजवरून व मा॥रनिलेचें मुखोतरावरून सकल अर्थ कळोन बहुत समाधान जाहालें. तेथें आपले रुपयाचा व **पोदारीचा** वगैरे कितेक अर्थ लिहिला. यैसीयासी गतवर्षी वोढीचा प्रसंग जाहाला. तो स्वामीस विदितच आहे. येदंनिमित्य यैवज राहिला. यंदा रा॥ **संकराजी कानोचे** मा॥तीनें गतवर्षीचे रुपयांच्या वराता करून दिल्या आहेत. वसुलाचा हंगाम समीपच आला आहे. त्यास ते रा॥ सत्वरच वसूल होऊन सेवेसी पोचतील. यंदा श्रीमंत राजश्री **बाबासाहेबीं** राजश्री **साबाजीबावा**पासीं ठेऊन येथील कामकाज गला घाढून कितेक लोकाचे हवालेटवाले करून वोढीमध्यें घातले; आणि आपण कूच करून गेले. यैसी यासी **श्रीमंतांच्या** आपल्या भेटी होतील परस्परें सकळ अर्थ कळो येईल. तदनंतर जें साहित्य करून अभिमान धराल तो थोडका आहे. सर्वस्वें स्वामींचा भरवसा पूर्ण चितांत धरून निश्चित असो. द्वैतता न धरावी. यानंतर **पोदारीच्या** गुदस्ता व सालमजकूर यैश्या दुसाला ताकिदा पाठविल्या पाहिजेत. त्याप्रमाणें कार्यभाग होऊन येईल. दरबारचे कामकाजाविसीं स्वामीचे भरवासियावरी निश्चित असो. वरकड तपसील वर्तमान राजश्री **केसोपंतांनीं** लिहिलें आहे, त्याजवरून कळों येईल. विशेष काय लिहिणें लोभ असो दीजे. हे विनाति.

---

(22) Raghuji's movements and doings are herein stated to Vishwanathbhat by Tuljoram from Nagpur.

No. 23 श्री+बालकृष्ण छ २० साबान

मोर्तब वाटोळा श्रावण वद्य ७।१६६९

दुरेघी आगष्ट १६, १७४७

श्रीमत् सौभाग्यादिसंपन्न मातुश्री **बाईसाहेब** यांणीं राजश्री **विश्वानाथभट वैद्य** यांसी आज्ञा केली यैसीजे, तुम्हांस हुजरून राजश्री **रघूजी भोसले सेनासाहेबसुभा** यांजकडे रवाना केलें, तेव्हां राजश्री **सुलतानजी देशमूख पाा मान** याचे विसी जे आज्ञा करणें (ती) करून **फकीरजी** बराबरी दिल्हा, आणि काम विल्हें लावणें, म्हणून सांगितलें असोन त्याजकडील गुंता माारनिलेचा अध्यापी विल्हें लावीत नाहीं म्हणून हुजूर विदित जाहालें, त्यावरून त्याला आलाहिदा आज्ञापत्र सादर करून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे. तरी पंशजी त्याला पत्र सादर केलें आहे त्याप्रमाणें देशमुखाचे गुंते विल्हे लाऊन देवणें. वारंवार त्याचा बोभाट राजश्री **स्वामी**कडे जातो आणि राजश्री **स्वामी साहेबांस** आज्ञा करितात. आणि ते साहेबाचे आज्ञेप्रमाणें विल्हें करीत नाहीं. येणें करून राजश्री **स्वामीस** विषाद येईल. या गोष्टी त्याला बरें रीतीनें मायावादाच्या सांगोन त्याजकडील जे मुदे असतील ते फैसल करून देवणें. फिरोन याचा बोभाट आलिया कार्याचें नाहीं ये विषई राजश्री **स्वामींनीं** तुम्हांसही रुबरू सांगितलें होतें, तेणेंप्रमाणें त्याचा गुंता विल्हें करून देवणें. जाणिजे. + छ २० शाबान बहूत काये लिहिणें. ( मोर्तब—लेखनावधि )

---

+ पुढील मजकूर राणी सकवारबाईचे हातचा असावा. पत्राच्या मागें 'सही' असा शब्द लिहिलेला आहे. असाच तिच्या इतर पत्रावर आहे

( 23 ) The queen, S. Sakwarabai, orders Vishwanathbhat Vaidya to recover money from Sultanji Deshmukh told by Maharaja at the time of his departure to a Ngpur. The last line of the letter seems to be written by S. Sakwarbai and also the word 'सही' on the back of the letter.

No. 24 शिक्का व मोर्तब वाटोळा दुरेघी फारसी — श्री — छ. २ रमजान भाद्र. शुध ४।१६६९ आगस्ट २८, १७४७

रोखा धनिको नाम **विस्वनाथ वैद** यांसि उधारनिकोनाम शा **राजे बुऱ्हानशाहेजी राजे** पाराती **देवगड** सा १८०३ वो करने यैसाजे रोखा लिहून दिधल यैसाजे. आपन तुमचें कर्ज मागितलें मुदल रुपये नाने पाच हजार ५०००८ हे सा येका महनयात रुपये आपन देऊन. हा रोखा आपली सही **धर्मा बगूजी नेगी** ता स्वयानक. तो छ २ सुध भाद्रपद ( मोर्तब ).

(24) This is a conveyance deed passed by Burhan Shaha Raje of Deogad in favour of Vishwanathbhat for a debt of Rs. 5000 to be returned in a month.

No. 25 — श्री — छ. ७ रमजान भाद्र. शुध ९।१६६९ सपटंबर २, १७४७

श्रीमंत सौभाग्यादिसंपन्न **बाईसाहेब** यांणी राजश्री **विश्वनाथ भट वैद्य** यांसी आज्ञा केली ऐसिजे. राजश्री **आबाजी सखदेव** याचे मामा राजश्री **कृष्णाजी भास्कर** यांजला मशारनुलेनीं मधस्त होऊन सरकारांतून कर्ज घेऊन रुपये मामल्याबद्दल दिल्हे आहेत. ते अद्याप न उगवतां **कृष्णाजी भास्कर** यांसी देवआज्ञा जाहाली. त्यांचें घर **नागपुरीं** आहे. त्यांची वस्त्र भाव घरची आणावयास हुजुरून **राघो अनंत व रामचद्र काले** त्यांचे भाऊ, व सरकारचे हुजरे पाठविले आहेत. कर्जाविसी व वस्त्रभावेविसीं राजश्री **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा यांसीं पत्र सादर आहे. तरी तुम्ही प्रसंगीं आपले आहां, तरी त्यांस विचारे करून सांगोन कर्जाचा ऐवज खताप्रमाणें निकाल करून पाठवणें. त्याची घरची वस्त्रभाव सुतळीचा तोडा * जराबाजरा पाठविले आहेत. यांचें स्वाधीन करणें. सरकारचा ऐवज **सेनासाहेबसुभा** यांजकडून उगवे तें करणें. जाणिजे. छ ७ माहे रमजान बहुत काये लिहिणें. सही. रजू. सुरूसुदबार.

* किरकोळ वस्तु. + पुढील मजकूर राणीचे हातचा.

(25) The queen S. Sakawarbai asks Vishwanath-bhat that Krishnaji Bhaskar, the maternal uncle of Abaji Sakhadeo had taken loan from her but he died. Hence his property, a house at Nagpur and other sundry articles will have to be attached and sold for the recovery of the money with the help of Raghuji. The money was advanced, as Abaji Sakhadeo had recommended to help him.

---

No. 26 श्रीसांबसिव भाद्रपद १६६९
सपटंबर १७४७

विनंती उपरी चिटी पा। ते पावली. कालचें वर्तमान कलावें हा आशये. यैसी यास काल रात्रौ श्रीमंत राजश्री **मुधोजीबावास** घेऊन दरबारास गेलों होतों. कितेक प्रकार बोलण्याचे बोलोन सेवटीं पक्षाकरितां **देऊरास** जाणें आगत्य लागतें, निरोप आज, हाच आग्रह असतां **मुख्यांनीं** उभयतांनीं बहुताप्रकारें समाधान केलें. निरोप देत नाहीं, दो रोजांत तुम्हांस परिछिन्न सांगतों, शंशये नाहीं. यैसें म्हणोन वाटेस लाविलें. कलावें. यैवजाचा मार आपणासी बोलिलों, आणि आपण बोलिला त्याप्रमाणें रा। **आपास** विदित केला. आज सारे दिवस वाट पाहिली. परंतु **रामचंद्रपंत** आले नाहींत. जर परिछिन्न कर्तव्य आहे, तरी प्रसंग रक्षावा. आजचे उद्यावर न टाकावें, म्हणजे सर्व प्रकार उभयपक्षीं उपयोगी आहेत. येथं तुम्हासिवाय कांहीं नाहीं. उतर पा। हे विनंती. कर्त(व्य) नसिलें अथवा शंशये आसिले तर परिछिन्न जाणवावें चिता नाहीं, हे विनंती.

---

(26) This letter confirms the Bakhar's mention of Shahu's desire to adopt as his heir Mudhoji Bhosle, son of Raghuji, born of his wife, who was a cousin sister of Shahu's Rani Sagunabai. Mudhoji, is here mentioned as having been brought of Satara for inspection in the Bhadrapad month of 1747, when in

the preceding Magh Raghuji is known to have visited Satara. Mudhoji wanted to go to Deur (near Wathar) for the anniversary but was detained for two days more by the King and his queen, when they promised to give their final decision. Raghuji who then possibly was at Deur and was trying for monetary help from the Vaidyas to whom the letter seems to have been addressed by one of Raghuji's agents. Appa must be Vithoji Naik Wakde and Ramchandrapant is probably Baburao Malhar Barwe. Both were bankers of Satara, cooperating with the Vaidyas.

— — — —

No. *27*

अश्वीन १६६९
सपटेंबर १७१७

( पत्राचा वरील भाग नाहीं )

राजश्री **फत्तेसिंग भोसले** येथेंच आहेत. विचार मनसबा कांहीं नाहीं. राजश्री **बाबूजी नाईक** यांचा व **राजश्री मुरारजी घोरपडे** याचा हर्षामर्ष जाहाला, त्यामुळें **बाबूजी नरगुंदीं** येथें राहिले. त्यास **सावनूरकर मोगल** व **मुरारजी** पाचसा हजार फौजेनिसी **बाहेर** × × दोन कोसावर येऊन राहिले, त्यास आठा पंधरा दिवसा त्यांची यांची झिडबीड होतच होती. त्यांस महाराज राजश्री **स्वामी कोलापूरवासी** येथें राहिले की, **बाबूजीनाा** आमचे मुलुकांत उपद्रव करितों, त्यांस **महाराजांहीं** आपणापासीं आणावें आणि आपले पायावर हात ठेऊन ××× कडे पाठवावे. ×××××. बाहीर निघोन येतील त्याचे वाटेस न जाणें व तुम्ही उठोन आपल्या मुलुकांत जावें, व याकडील सरदार त्यांणीं धरिले आहेत ते समागमें घेऊन यावें. म्हणोन उभयतांकडून दोघेजण गेले. त्यांस **बाबूजीनाा** याणीं××× **माहराजांस** सांगितलें की, आपण **नरगुंदाहून** येक मजल निघोन आलों, पुढें मजलदरमजल येतों. त्यावर राजश्री **कोलापुरवासी स्वामी** यांहीं येके दिवसीं उपोषण केलें व यांहीहि केलें. साईकाली त्याणीं सांगोन पाठविलें कीं, **बाबूनाा** याणें आमच्या मुलुकांत खंडाणियाकरून खतें घेऊन ( अपूर्ण )

(27) The trouble that Babuji Naik was creating in the Karnatak, is well explained in this letter, referring to Murarrao Ghorpade, Sambhaji of Kolhapur and others. ( See letters on page 330 in P. D. Vol. 26. )

---

No.28 श्री ५ शैवाल

आश्विन शुध ७, १६६९

सपटंबर २९, १७४७

श्रीयासह चिरंजीव विजईभव राजश्री **साबाजी भोसले** यांसी प्रति **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा आसिर्वाद. उपरी मामले **रामटेक** प्रां देवगड येथील फडनिविसी राजश्री **विसाजी रघुनाथ** वकील यांजकडे सालगुदस्तां सांगितली आहे, त्याप्रमाणें सालमजकुरीं करार असे. तरी यांचेतर्फेनं राजश्री **राघो बलाळ** यांसी पाठविलें असत, तरी यांचे हातें मामले मजकूरचे फडनिविसीचें कामकाज घेत जाणें, यांसी वेत [न] पेशजीचे सनदे + बमोजीब पावतें करणें. जाणिजे. छ ५ माहे शौवाल सुा समान आर्बैन मया आलफ. *हे आसिर्वाद. (मोर्तबसुद) मोर्तब अष्टकोनी दुरेघी.

---

* पुढील मजकूर रघूजीचे हातचा. + प्रमाणे

(28) Raghuji writes to Sabaji that as Vishwanathbhat Vaidya is to recover the revenue of Ramatek for the current year like the last one, his agent Ragho Balal Bhogale should be allowed to do the same and remuneration should be paid to him as before.

---

No.29 श्री छ १७ सवाल

आक्टोबर ११।१७४७

आश्विन वद्य ४, १६६९

राजश्री **बाळंभट** तथा राजश्री **विस्वनाथभट वैद्य** गोसावी यासि

दाा सकलगुणा अलंकारण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नाों **बुबाजी नाईक कदम** नामजाद प्रांत किले **गोपाळदुर्ग** राम राम. विंनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें लेखन केलें पाहिजे. विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन कुशल वृत कलत नाही. तरी सर्वदा पत्र पाठवित असिलें पाहिजे. सांप्रत दरबारचें वृत्त कलत नाहीं, यास्तव **तानजी नलवडे** आपणाकडे कागद देऊन पाठविला असे. साकल्य वृत्त तत्वता लेहून पाठविलें पाहिजे. बहुत काये लिहिणें, लोभ असो दीजे. राा १७ सौवाल हे विनति. आपणाकडील कागदपत्र हुजूर जावयाचा असिला तर पाठऊन द्यावा. हुजूर रवाना करून. कललें पाहिजे हे विनंति.

---

(29) Bubaji Naik Kadam, an officer in charge of the fort of Gopalgad sends Tanaji Nalawade to Vaidya brothers to know the news of Shahu's Darbar and assures to send to Angre the letters, addressed to him by them.

---

No. 30 श्री १५ जिलकाद

का. व. २।१६६९

शिक्का व मोर्तब अष्टकोनी दुरेघी नोव्हेंबर ८,१७४७

राजेश्री **विश्वनाथ भट वैद्य** गोसावी यासी.

दाा अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रोाा **रघोजी भोसले** सेनासाहेब-सुभा दण्डवत. विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष चाकरीचे **रवारा**विसीं हुजुरचे चोपदार राजश्री **जिउराव मोहिते** यांचे घरी येऊन बैसले आहेत, म्हणोन कळों आलें.




तरी स्वारांचा विचार सत्वरच होऊन येईल, ऐसें असतां **चोपदार** कैशास बैसवावें ? येकादो रोजीं स्वार येऊन पोहोचतील. तरी तुम्ही राजश्री **स्वामीस** विनाति करून मारनिलेकडे चोपदार बैसले आहेत, त्यांस उठऊन नेणें. मारनिलेस उपद्रव न येई तो अर्थ करणें. अनमान न करितां चोपदार उठवणें. रा छ १५ जिलकाद बहुत काये लिहिणें हे विनाति. (मोर्तबसुद)

(30) Raghuji Bhosale asks Vishwanathbhat to induce Shahu Chhatrapati to withdraw the Chopdars from Jivarao Mohite's house The soldiers will in a day or to be sent. Chopdar is a servant walking in front of the king & a Swar is a mounted soldier.

——

No 31 श्री ८ जिल्हेज

साबाजीचा शिक्का — मार्ग. शुद्ध १०।१६६९

व मोर्तब अष्टपैलू तिरेघी — नवंबर ३०, १७४७

राजश्री **नारो अनंत** कमाविसदार दिमत राा विश्वेनाथ **वैद**

॥ श्री ॥ — कर्यात **भुगौऊ** गोसावी यासी.

रघुवीर चर — दाा अखंडित लक्षुमी आलंकृत्य राजमान्ये स्नों **साबाजी**

णी तत्पर सा — **भोसले** दंडवत सुरुसमान आर्बैन मया आलफ, मौजे

बाजी भोसले. — मजकूरचे पटीबाा रसद व पाटील यैसें घेऊन हजूर

निरंतर — येन. या कामास मावळे आसामी, १ **हरिबाजी नाईक**

जमातदार तोाती किले **भागदूर** यांसि, शिवाय खुराख रुा ३ तीन देणें. जानीजे, ताा छ ८ माहे जिल्हेज बहुत काये लिहिणें. ( मोतबसुद )

बार रुजू दफतर सेनासाहेब.

(31) Sabaji Bhosle asks, Naropant Gadre, agent of Vaidyas, of Bhugaon to come early with Rasad and Patil of the place. In P. D. Vol 20, a photo of Sabaji's handwriting & seals is given

---

१० जिल्हेज

No 32 श्री मार्ग. शुा १२।१६६९

डिसेंबर २, १७४७

चिटी माहाल जामदारखाना दिमत राजश्री **सेनासाहेबसुभा** सुा समान आर्बैन मया अलफ. राजश्री **विस्वनाथभट वैद्य** यांजकडे सरकारची कडी सोन्याची सुमार १२ बारा होतीं, तीं मारफात **मल्हारपंत** दिमत **गणोबा नाईक कोलटकर,** सदरहू बारा कडीं सरकारांत पावली. छ १० माहे जिल्हेज.

(32) This is a receipt given by the Jamdar officer of Raghuji Bhosle that twelve golden rings (कडीं) were received from Vishwanathbhat Vaidya through Ganoba Naik Kolatkar.

---

१४ जिल्हेज

No 33 श्री मार्ग. वद्य १।१६६९

डिसेंबर ६, १७४७ नक्कल

शके १६६९ प्रभवनाम सवत्छरे मार्गसीर वद्य प्रतीपदा तदिनीं राजश्री **विस्वनाथ भट वैद्य** यांसि **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा सुा समान आर्बैन मया व अलफ. तुम्हांपासून घेतलें कर्ज रुपये १३०५९॥ तेरा हजार साडेयेकूणसाठ, यांसि व्याज दरमाहे दरसदे रुपये २ दुवोत्रा प्रों करार केले असे. जाले मुदतीचे व्याज व मुदल हिसेब करून देऊन. छ १४ जिल्हेज. हें खत लिहोन दिलें सही.

(33) This is a copy of the conveyance deed, passed between Vishwanathbhat Vaidya and Raghuji Bhosle of a sum of Rs. 13059 and annas 8, at 2 Rs. interest p. c. p. m.

*No 1* श्री अ. श्रा. १६६३

जुलै १७४१

याद़ी जमा कारकुनी प्रो बीड-आंबड सु॥ इहिदे रु. २०० वजा गु सदाशिवभट दिक्षित परभारें रुा १००. बाकी येणें रुपये १००. इसनेचा यैवज येणें आसे रुा २००

आदा सन इसनेंत

१०० श्रावण अधिक

६१ शालजोडी रा बाजीपंत गु दामले.

२५ शाल गु गणोबानाा नि गोपालबा.

१० नारायेण जोशी गु बाजीपंत ब नातवर.

४ गु पांडबा लश्करांत घेतले. रुा ५ पैकीं वजा माहुलीस घेतला रोख १, बाकी.

१००

४९ सन इसने पैकीं आदा गु गोपालजी बाबा, हवाला गोविंद नरहरी साबणे मा नारोपंत पोतनीस

१४९

बाकी० फाजील येणें ४९, सन इसने पैकीं आदा.

(1) This gives the yearly pay of the clerk who was working in the district of Beed Ambad The table of Adhik months given in वैद्य द. पु. ख १ was useful in determining the date of the paper.

---

*No 2* छ १५ मोहरम

श्री पौष वद्य १।१६६९

जाने ५, १७४८

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालंभट (व) विश्वनाथभट वैद्य स्वामी गोसावी यांसी.

पो बाळाजी बाजिराव प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथिल कुशल जाणोन

ोये कुशल लिहित जाणें. विशेष संक्रमणाचे तीळशर्करायुक्त थैली पाठविली ो. ते घेऊन उत्तर पाठविलें पाहिजे. रा। छ १९ मोहरम *बहुत काये हेणें हे विनति.

*पुढील मजकूर नानासाहेबांच्या हातचा.

(2) Nanasaheb Peshwa sent to Vaidya brothers the sugar-ated sessamum [तिळगुळ) of Sankrant.

---

3 श्री २४ मोहरम

घुजीचा शिक्का मोर्तब पौष वा॥ १०।१६६९

ोनी दुरेघी यावर आहेत जाने १४, १७४८

राजश्री **कृष्णाजी रामचंद्र** दिमत राजश्री **विसाजी रघुनाथ**

गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नें॥ **रघोजी भोसले सेनासाहेबसुभा** ात सुहूर सन समान आर्बैन मया आलफ. तुम्ही उमेदवार होता. कामाचे ने पाहोन तुम्हांस चिरंजीव राजश्री **मुधोजी भोसले** यांची **सिकेनिविसी** ोन पाठविले आहे. इमानें इतबारें स्वामीसेवा करीत जाणें. तुम्हांस वेतन ेना रुपये १००० येक हजार केलें आसेत, घेऊन साहेब कामकाज करणें. ाजे छ २४ मोहरम *बहुत काये लिहीणें. ( मोर्तब सुद )

*पुढील अक्षर रघूजीचें.

(3) The appointment of Vishwanathbhat Vaidya as Sikkenavis Mudhoji Bhosle, is mentioned in this letter. His agent was shnaji Ramchandta.

---

.4 श्री २५ मोहरम

घूजीचा शिक्का व मोर्तब पोष वद्य ११।१६६९

ोनी दुहेरी पत्रावर आहेत. जाने. १५,१६४८

राजश्री **विसाजी रघुनाथ** वकील गोसावी यांसी

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नों **रघोजी भोसले सेना साहेब** । दंडवत. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत जाणें. विशेष प्रांत डाई येथील कमावीस तुमच्या मारफातीनें सांगितली, त्यासी माहाली आमल ऊन राजश्री **शामजी फुलाजी** आले. त्यासी तीर्थस्वरूप राजश्री **राणोजीबाबा**

यांच्या सनदेचा करार द्यावयाचा होता, त्याजबद्दल मशारनिले तुम्हांकडे पाठविले आहेत. तरी मामलितीच्या सनदा कुली पाठऊन देणें. मकडाईचा मामला राजश्री सिवभट साठे यांच्या मारफातीनें करून रसदेचा अैवज तुम्हांस देविला. तरी आधीं आधीं मशारनिलेच्या हवाला सनदा करून अति सत्वर मार्गस्त करणें. जबानी सविस्तर सांगतां कलो येईल. जाणिजे. रवाना छ २९ माहे मोहरम. *बहुत काये लिहिणें हे विनंती (मोर्तब सुद)

* पुढील मजकुर रघुजीचे हातचा

The revenue collection work of Prant Makadai was given to Shamji Phulaji at the request of Vishwanathbhat but as the territory belonged to Ranoji Bhosle, he had to receive the rasad Raghuji therefore asked Vishwanathbhat to give to Shamji, the written documents of the terms of Rasad Shiwabhat Sathe had already paid the Rasad amount to Vishwanathbhat who had therefore no reason to detain Shamji any longer.

---

*No 5* श्री माघ शु. ५ १६६९
जाने २३ १७४८

श्रीमंत राजश्री बालंभट बाबा व ता। राजश्री विश्वनाथ बाबा
स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक राघो बलाल भोगले मुक्काम रामटेक कृतानेक सां। नमस्कार. विनंती येथील क्षेम ता। माघ सुध ९ पंचमी चंद्रपुराहून रामटेकास दाखल जालों. तेथील वर्तमान, येक महिना चार दिवस श्रीमंताजवळ होतो, रा। रघुनाथजी देशमुख व आपण यैसें होतो. चांदे सर जालें, रा। नीलकंठ-शाहाराजे बलालपुरीं ठेविले, चांदियाचा सुभा कृष्णाजी नारायेण, बिंबाजी वंजाल यांजकडे देवगडीं होते, त्यांस दिल्हा. किल्यांत ठाणें आपलें बसविलें रा। जानोजी भोसले यांची रवानगी बंगाल्यास जाली. वस्त्रें दिलीं. रा। मुधोजी भोसले यांस पटवणें दिल्हें, त्यांची बिदा केली. रा। रघुनाथभट पटवर्धन हे रा। सुराराऊ निर्मळकर यास घेऊन चांदियासि आले होते. त्याच दिवसीं रा। बऱ्हाणशाहा राजे व रामाजी नाईक, जानीभाई वगैरे

देवगडची मंडळी बिदा केली. त्यासमई जानीभाई व यादोजीपंती देशमुख व देशपांडिये रामटेक परगणियाची आज्ञा काये? श्रीमंती उत्तर दिलें कीं, तमाम वतनें खालसा केलीं. कलंबेस्वर व उमरड वामनाजी देशपांडीये यैसें पुरातन तेवढे त्यास देणें. वरकड तमाम खालसा केलीं. त्याजवरी देशमुखाची रदबदल यादोजीपंतानें केली. कीं, देसमुखीची कमाविस त्यांचे हातें घ्यावी. त्याप्रमाणें कबूल केलें. मी यादोजी पंताजवळ विचारिलें, त्यांहीं उत्तर दिल्हें कीं, तुमचें काम होत नाहीं. त्याजवरी मी श्रीमंतास विचारलें कीं, साहेबी देशमुखाच्ये वाटेनें तुमची वाट, यैसें आज पावेतो म्हणा, त्यास आज्ञा काये? श्रीमतीं उत्तर दिले कीं, वैद्य येतील तेव्हां वाट होईल, तुम्ही जाणें. फडनिसीचें वतन पाचसे समये नविसिदें केलें. आपण आले तरी बरें आहे, नाहीं तर आपणास काये आज्ञा करावयाची ते केली पाहिजे. उत्तर येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. तुम्हांकडील यैवज येत नाहीं, म्हणून स्वामीनें लिहिलें, तरी नारोपंतनाना जवळ रुा ३७९ पावणेच्यारसे रुपये दिल्हे, ते प्रविष्ट होतील. पेसजी तीनसे पाठविले त्याचें उत्तर आलें. दुसरे हिसेब नारोपंता–जवळ समजावून देणें, त्यास दुसाला आज ताा हिसेब समजाविला. त्याची नकल राा झुलाजीपंत देशमूख यांजपासीं दिल्ही आहे. हें सेवेसी निवेदन करितील, मजला आज्ञा येईल तरी मीच सेवेसी येईन. येथें स्वामी आलिया वगल कांहीं बरें नाहीं. आवघ्या कोकणस्तास श्रीमंत भाषण करितात, तें पत्रीं काये ल्याहावें. महादाजीपंत फडनिविस म्हणाले कीं, फडनिसी दूर करून दुसरा ब्राह्मण पाठवितों, तेव्हां पनास रुये देऊन तूर्त आहे सारखी आहे, पुढें काये होईल तें पाहावें. वरकड वर्तमान राा नारोपंती लिहिलें आहे व राा झुलाजीपंत स्वमुखें निवेदन करितील, त्यावरून विदित होईल. बहुत काये लिहिणें हे विज्ञापना.

राजश्री रामचंद्रपंत दाजीस साां नमस्कार विनंती. येजमानाच्या पत्रा–वरून इकडील वर्तमान कळों येईल. हे विनंती.

(5) Ragho Ballal Bhogale, Kamavisdar of Ramtek writes to Vaidya brothers in detail, what he found in the administration of Raghuji at Chandrapur Krishnaji Narayan and Bimbaji Vanjal were made the Subhedars of Chanda & Deogad respectively, Janoji was sent to Bengal Mudhoji Barhansha Raje, Ramaji Naik,

Janibhai were also sent them Raghunathbhat Patwardhan and Surerao Yelabhya Narmalkar were brought at Chanda probably for some money Raghuji was all along unsympathetic towards Kokanasthast in fall अवघ्या कोकणस्तास क्षीमत भापणे करितात But he showed confidence in Vaidyas

Torsurerao and Bumbaji Vanjal see V D vol 20,38,41

---

*No. 6* श्री माघ १६६९

फे, १७४८

राजश्री बाळंभट व विश्वनाथ भट वैद्य गोसावी यासी—

द्रा सकळगुण आलंकर्ण अखंडितलक्षुमी आलंकृत राजमान्य श्री बुवाजी नाईक कदम नामजाद किले गोपाळदुर्ग रामराम. विनंती उपरी. येथील कुशळ जाणऊन खकीयें स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे विशेष. आपणाकडील कुशल वृत व बातमी बहुत दिवस कळो येत नाहीं. या करितां मुजरद जोडी आपणापासी रवाना केली आहे, तरी आपणाकडील कुशल वृत लेखन आज्ञा वरून संतोषविलें पाहिजे वरचील दरबारची बोलीचाली व पेशवेयाकडील वगैरा साकल्य बातमी लेहून पाठविली पाहिजे. आपणाकडून बातमी लिहून आलेयावर हुजूर लेहून पाठवणें असावें, यास्तव जोडीची रवानगी अविलंबें केली पाहिजे. रा। मानाजी आंगरे सातारा येणार होते म्हणऊन वर्तमान कळों आलें तरी राजश्री मानाजी आंगरे ते जागा आले कीं नाहीं, राज्श्री पेशवे कोणे जागा आहेत, साध्यांत वर्तमान आसेल तें लेहून पाठविलें पाहिजे. आपणाकडील तांदूळ जाऊन प्रविष्ट होणेयाकरितां बैल चिपळुणास रवाना केले आहेत. तिवरे घाटानें आपणाजवळ येऊन प्रविष्ट होतील, बहुत काये लिहिणें कृपा निरंतर असो दिली पाहिजे. हे विनंती.

(6) Bubaji Naik Kadam (Satum), an officer of Gopaldurg writes to Vaidya brothers to inform him of the political news of the Darbar He wanted to know whether Manaji arrived at Satara and the whereabouts of the Peshwa He sent rice for them from Kokan to Satara

*No 7* श्री माघ १३६९
फे. १७४८

साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करित गेलें पाहिजे. विशेष बहुत दिवस दरबारचें वर्तमान कांहीं कळत नाहीं. याजकरितां हलीं येथून रा। **गणेश महादेव** यास पाठविलें आहेत. याजबरोबरीं सविस्तर वृत्त लेहून पाठविलें पाहिजे. यानंतर **शिर्के** लष्कर घेऊन आले आहेत, याचा मतलब काय आहे तेंही वर्तमान लेहून पाठविलें पाहिजे. सर्वप्रकारें आपला भरवसा धरिला आहे. जें वर्तमान होईल तें आम्हांस वरचेवरी कळवीत गेलें पाहिजे, बहुत काये लिहिणें. कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विनंति.

Bubaji Kadam sends Ganesh Mahadeo to Vaidya to know what is the object of Shirke's coming with the army, in the Konkan.

---

*No 8* श्री फा शु ५। १६६९
फेब्रु २२।१।१७४८

राजश्री याविराजित राजमान्य राजश्री **रामचंद्रपंत करकरे** स्वामी गोसावी यासी.

सेवक **महादजी कृष्ण** व **हरी कृष्ण** साष्टांग नमस्कार, विनंती उपरी. येथील कुशल फाल्गुन शुध पंचमी जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष राजश्री **रघोजी बाबांनीं** रा। **रामचंद्रपंता** कडून **नालबंदी** देविली. त्यांणीं च्यार महिनें सेपनास राउतांनीं सेवा घेतली; परंतु यैवज न दिला. रा। **बाबाही** आले. **चांदे** पावेतों समागमें होतों. आनुकूल देणेयासि न जाहलें. पांचसे रुपये खर्चास गुदस्ता समागमें होते. सेपन्नास कर्ज खाऊन आलों. पुढें जावें तर पोटाचें साकडें जाणून रजा घेऊन घरास आलों. राजश्री **वैद्य** बाबांचे भेटीस न आलों. **बाबांनीं** लि।म्हणून इकडे राहिलों. त्यांचे सार्थकता न जाली. कांहीं यैवज नालबंदीस येते, तर हजार दोन हजार यैवज दिल्हा असतां. चौहूंकडून गलाठा जाहला आहे. परस्तुत यावें तर हंगाम नाहीं. ×× हंगामसीर येऊन रा। **वैद्यबावा** समाजावसि येत होते दर्शन घेऊन पुढें कोठें धंदा करून. × × त्यासि त्यांचे येणें न जाहलें. ज्या प्रसंगास येत होते, तेव्हां ते बंगालियाल गेले. भेट न होती. आमचा प्रसंग यैसा जाहला आहे. आपणास कळावें म्हणून लि। आहे. कृपा लोभ असा दाज हे विनंती.

(8) The affairs of Bengal were still on Raghuji's hand. Kane brothers, who had accompanied Raghuji for the Bengal compaign, describe why they had to return home, owing to the failure of the supply of money by Raghuji last year. It seems Vishwanathbhat had gone to Bengal and hence the Kale brothers could not see him. They expected that he would make Raghuji to pay them the required money.

---

*No. 9* श्री फा. १६६९
मार्च १७४८

हिशेब मुंज व लग्न सुा समान आर्बैन मया व अलफ खर्च रुा
२४७॥-॥ खा कापड

१२ सुा जखापा कोबडा
२॥ खण पाटाउ १
९॥ अवरंगजर्बी १

१२

१२२॥=॥ सुा गणेशपंत दामले
१०९॥। सुा गोविंद ना भुरे
२॥= सुा रंगोबा ना देऊसकर

२४७॥-॥

१८ खा सोनें व रुपें सुा कृष्णा सोनार
१९ सोनें वजन ८८८१ येकून जानवी व पवित्रकें
३ सा रुप्यें फणी करंडा पाटराकडी

१८

---

पाटाउ=रेशमी

(9) The thread ceremoney of Rambhat and the marriage of Bhikambhat took place about this month. This account gives the expenses incurred for जानवे, पवित्रक and फणीकरंडा required for the ceremonies.

*No 10* श्री फा वद्य १।१६६९
मार्च ५, १७४८
नकल

रोखा शके १६६९ प्रभवनाम संवछरे फाल्गुन वद्य प्रतीपदा धनकोनाम राजश्री **विसाजी रघुनाथ** वैद्य यांसि **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा तुम्हांपासून घेतले रुा ८५०० साडे आठ हजार, यांसि व्याज दरमाहे दरसदे रुा २ दुहोत्रा प्रों व्याज सुधां हिसेब करून देऊन जाणिजे. छ १४ रबिलोवल. हें खत लिहिलें. सही

(10) This is a coveyance deed passed by Raghuji to Vishwanathbhat Vaidya for Rs 8500 at Rs 2 p. c. p m.

---

*No. 11* श्री १९ रावल समान आर्बैन. ११
सिका फा व. ५।१६६९
रघूजीचा मार्च ८, । १७४८

आज्ञापत्र सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेबसुभा** ता **मोकदमानी** मौजे **बोरगांव** पा **नांदगावपेठ** सुहुर सन समान आर्बैन मया आल्फ. मौजे **राहाटगांव**च्या सिवेवर आऊतें धरून सेतें करीत होते, त्यांसि तुम्ही त्यांचीं आऊतें घेऊन गेला कीं, जमीन आपले गांवची आहे. ऐसी यासि आउतें न्यावयासि हरकत आहे ऐसें नाहीं. तुमची सीव असेल तर तुम्ही कसबे मजकुरास जाऊन जमीदाराचे व हरदो गांवचे मोकदम ऐसें मेलऊन सिवेचा कजिया फैसल करणें. दरम्यान **राहाटगांवची** सीव तुम्ही पंचाइतीनें तुम्हांकडे खरी जाली तरी उत्तम. नाहीं तरी जमीनीचा वहिताप्रों पैका देणें येईल. ऐसे समजोन लिहिल्याप्रों वर्तनुक करणें. जाणिजे. छ १९ माहे रबिलोवल. यांचें आऊत फिराउन देणें. या कामास जासूद पा आहे. यासि मसाला रुो १० दाहा देणें. हा मजकूर (मोर्तब सुद).

+ जरूर गरज.

(11) This Shows the compromising attitude of Raghuji with the agriculturists. This is an order to the Mokadam of Borgaon village.

*No. 12* श्री फाल्गुन वद्य १२।१६६९
मार्च १५, १७४८

राजश्री **बालंभट** व राजश्री **विश्वनाथभट** वैद्य गोसावी यांसि—

दा। अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रो **बुवाजी ना। कदम** **नामजाद** किले **गोपालदुर्ग** राम राम विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय **कुशल** लिहित गेलें पाहिजे. विशेष **तानजी नलवडा** या समागमें पत्र पाठविलें, पावोन समाधान जाहलें. **सिर्के** पाचसे राऊत व पाचसे पाईचा जमाव, हजार लोकांनसी निघोन खालीं यावयासि **निनामपाड(ळी)वर** मुकाम केला असे व **भगवंतराव** व **घाटगा** हजार जमावानसी **माहाड** प्रांतीं जाणार, तयार जाहले असेत म्हाो लिहिलें, सविस्तर कलों आलें. **घाटामे**टाची खबरदारी करावयाची ते केलीच असे. **सिर्के** यांनीं कोकणांत यावयाचें न करावें. दया(यदा) कदाचित् दुर्बुद्धि धरून मुलुकास उपसर्ग करावयासि आले तर **महाराज स्वामींचे** पुण्यें होणें तें होईल. **सिर्के** यांचा मुकाम कोणे ठिकाणीं आहे, कोणे मार्गे येणार याची बातमी तत्वता कळावी, याजकरितां जागोजाग फौज्या पाठविल्याच असेत. आपण ही सविस्तर वृत्त लेहून पाठविलें पाहिजे, **माहाड** प्रांतीं **भगवंतराव** जाणार होते ते निघोन गेले न गेले याचें वृत लेहून पाठविलें पाहिजे. राजश्री **मानाजी आंगरे** यांच्या भेटी जाहल्या म्हाो कलों आलें मुकाम किती दिवस आहे, कोणे मनसबेयासि आले आहेत ? मनास आणून लेहून पाठविलें पाहिजे. आपले तांदूळ **चिपळुणाहून** रवाना करावयाचें होते तें मागेंच रवाना केलें. जाऊन पावलेंच असतील. बहुत काये लिा रा। छ २६ रबिलोवेल हे विनति. लोभ आसो दिल्हा पाहिजे हे विापर.

(12) Bubaji Naik Kadam of Gopaldurg (अजनवेल) was informed by Vaidya brothers of the activities of Shirke Bhagwantrao & Ghatge. He took the necessary precautions to oppose them. He wished to know how Manaji Angre was received at Satara by Shahu. To receive this news he had sent specially his servant Tanaji Nalawada.

———

No. 13 श्री फाल्गुन १६६९
मार्च १७४८

श्रीमंत राजश्री **बालंभट व विश्वनाथभट वैद्य**

स्वामी गोसावी यांसी.

सेवक **महादाजी अनंत** नामजाद किले **गोविंदगड** कृतानेक सां नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष सातारीहून लस्कर **नारळेयासी** आलें म्हणऊन वर्तमान आलें आहे. त्यासी कोणींकडेस जातें, काये वर्तमान, तें लिहून पाठविलें पाहिजे. आपण आहेत तेथें लिहावें ऐसें नाहीं. परंतु वर्तमान आइकिलें, याजकरितां **येसजी गाड्या** पाठविला आहे. सविस्तर वर्तमान लिहिलें पाहिजे. सर्व भरवसा आपला आहे. कोणेक अधिकोतर होईल तें वरचेवर सुचें करावें व आपण करतीलच हा तो निशा आहे. बहुत ल्याहावें, ( तर ) आपण सर्वज्ञ आहेत, हे विनंतीपर

(13) Mahadaji Anant Godbole of Govindgad asks Vaidya brothers whether the news that the army has come up to Taraee is true and requests to write the worth knowing activities with Yesaji Gadya who was sent to Satara.

---

No. 14 श्री चैत्र शुध २। १६७०
मार्च २० १७४८

**नेमणूक** नि। राजश्री **नारो अनंत** मुकाम **भुगाव** सु।। समान आर्बैन मया व अलफ द्रमाहा रुपये

२९ **नारो अनंत**
९ कारकून लिहिणार
१८ प्यादे
१५ **भुगाव** ५ दर ३
३ **टेकाडी** १
१८

२ दिवट्या १
२ खिजमतगार १
८।। भोजन खर्च सालिना
बारमाही रुपये
१०० पैकीं द्रमहा.

६०।।

येकून येणें प्रों साडे साठ रुो दरमाहा घेत जाणें आणि इमानें इतबारें वर्तणूक करीत जाणें. नेमणुके सिवाय खर्च न करणें इा मार्गसीर्ष सुध १ प्रतीपदे पासून माहादरमहा घेत जाणें. जाणिजे छ १ माहे रबिलाखर. ( मोर्तबसुद )

(14) This letter gives the remuneration given to an honest and clever clerk like Naro Anant Gadre per month though he had to farwork off from the Kokan where his family lived.

---

*No. 15* श्री चैत्र शुद्ध ८।१६७० मार्च २६।१७४८

राजश्री **बाळंभट वैद्य** गोसावी यासी

दंा अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रों **रघोजी भोसले सेना-साहेब सुभा** दंडवत विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष **नबाब निजामनमुलुक फडदार** येथें येऊन मुकाम केला आहे. ऐसी यासीं त्याकडे आमचें काजकाम आहे, यास्तव तिकडे मातबर माणूस पाठवावा लागतो. प्रस्तुत आम्हांकडून कोणी रवाना करावयासी कार्यास येत नाहीं, तरी राजश्री **महिपतराव** याविसी राजश्री **स्वामीस** विनंती करून आज्ञा घेऊन यासीं आम्हाकडे रवाना केलें पाहिजे. येविसीं पूर्वी तुम्हांस सागीतलें आहे, व हल्लींही लिहिलें असे, तरी अविलम्बें आम्हांजवळ येत तो अर्थ केला पाहिजे. तिकडील कार्यभाग जालियावर सत्वरच **सातारेयासी** येऊन पोहोचतील. +राजश्री **महिपत राऊ** यास निरोप राजश्री **स्वामीजवळून** निरोप देवणें. पुढें रवाना करावे लागते, कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ असू दिला पाहिजे हे विनंती. ( मोर्तब सुद )

---

+पुढील मजकूर रघुजीचे हातचा असे.

(15) In this letter Raghuji Bhosle is asking Balambhat to request Shahu to lend him the services of Mahipatrao Sumant, Shahu's foreign minister Raghuji had some political business with Nizam, who was at Fardapur (on way to Burhanpur) Nizam anmuluk died on 21th May 1748 and this letter is dated 26th March 1748. and See P. D. 25. 74, 20 47,& 71.

*No. 16* श्री चैत्र शुद्ध १०।१६७०
मार्च २८, १७४८

राजाश्रियाविराजित राजमान्य राजश्री विश्वनाथबाबा वैद्य याप्रती. स्नेहा (भिला)सी सदासिव दिक्षित ठकार नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित असिलें पाहिजे. विशेष आम्ही चैत्र शुद्ध दशमीस सोमयागास प्रारंभ करितों. तरी आपण येक दिवसाचा अवकाश करून येऊन येज्ञ संपादिला पाहिजे ×बहुत काय लिहिणें. लोभ आसो देणें हे नमस्कार.

---

×पुढील मजकूर लेखकाच्या हातचा बालबोध लिपीत असे.

(16) Sadashiv Dixit Thakar requests Vishwanathbhat to find out time to attend the Soma Yag which he was going to perform on Chaitra Sudh 10

——— |

*No. 17* श्रीशंकर २१ रबिलाखर
चैत्र वद्य ७।८, १६७०
एप्रिल ९, १७४८

राजश्रीं विश्वनाथभट वैद्य गो॥

श्रीं राणोजी भोसले दंडवत सु॥

समान आर्बैन मया आलफ आमचे यैवजी महंत मुलुकगीर यासी रु॥ ५० पनास देविले आहेत ता॥ ईश्वरगीर देणें. छ २१ माहे रबिलाखर +बहुत काये लिहिणें. ( मोर्तब सुद )

---

+पुढील मजकूर राणोजीचे हातचा असे.

(17) In this letter there are new names of Gosavi's viz Mulukagir (महंत मुलुकगीर) and Ishwargir (ईश्वरगीर) with whom Ranoji Bhosle had money dealings.

——...——

*No. 18* श्री

छ ९ जमादिलावल
वैशाख शुद्ध १०।१६७०
एप्रिल २७, १७४८

राजश्री **बालंभट** वैद्य तथा राजश्री **विस्वनाथभट** वैद्य
मुा सातारा गोसावी यांसी.

दाा अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित **बुबाजी नाईक कदम** नामजाद किले **गोपालदुर्ग** रामराम विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लेखन केलें पाहिजे विशेष श्रीमंत महाराज **छत्रपति स्वामीकडे** नारलाचीं शाहाळीं संभर रवाना करावयाचीं **हुजूरची** आज्ञा. त्यापैकीं पनास शाहाळीं पेशजी रवाना केलीं. बाकी पनास राहिलीं, तीं हालीं पाठविलीं आहेत. तीं **स्वामीकडे** पावती करून पावलेयाचे पोहच पेशजी, हालीं देखील **छत्रपति स्मामीकडील** पाठविली पाहिजे. वरकड दरबारचें वर्तमान नकल विशेष लेहून पाठविलें पाहिजे. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे. रवाना छ ९ जमादिलोवल. × हे विनंति.

---

× पुढील अक्षर लेखकाचे

(18) Bubaji Naik Kadam, an officer of Gopaldurg (अंजनवेल) sent 50 raw coaconuts (शाहाळी) to Vaidya brothers at Satara in order to present them to Shahu Maharaj. He wanted an acknowledgment from the king for both

---

*No. 19* श्री

५ जाखर
जेष्ट शुद्ध ६।१६७०
मे २२,१७४८

राजश्री **बालंभट** व राजश्री **विश्वनाथभट** वैद्य
गोसावी यांसि

दाा सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेाा **बुबाजी नाईक कदम** नामजाद किले **गोपालदुर्ग** रामराम विनंती उपरी. येथील कुशल

जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असले पाहिजे. विशेष पेशजी राजश्री **स्वामीकडे** शाहालीं पाठविलीं होतीं तें प्रविष्ट करून जाब पाठविला तो पाहोन बहुत समाधान जाहालें. वरकड बहुत दिवस दरबारचें व +सामादिकांकडील वर्तमान कलत नाहीं, याजकरितां हलीं मुजरत जोडी आपणाकडे पाठविली आहे. याजबरोबरी दरबारचें व **प्रतिनिधींकडील** व राजश्री **यमाजीपंत** हलीं **सातारास** आले आहेत यांजकडील सविस्तर वर्तमान लेहून पाठविलें पाहिजे. दरबारचें व सामादिकांकडील वर्तमान वरचेवर आणवणें, म्हणून आम्हांस **हुजूरची** आज्ञा आहे यांजकरितां आपणांस लिहिलें आहे तरी अधिक आगलें वर्तमान जें असो, तें लेहून पाठविलें पाहिजे. दरबारीं सर्व प्रकारें भरवसा आपला आहे. तेथें विस्तार ल्याहावासारिखा नाहीं. कळलें पाहिजे. बहुत काये लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे रा। छ ५ जमादिलाकर. आपणा कारणें फणसपोली वजन ८। दाहा सेर पाठविली आहे. घेऊन पावलियाचें उत्तर पाठविलें पाहिजे. हे विनंति.

---

\+ शत्रूकडील

(19) Babuji Naik Kadam of fort Gopalgad elicits news from Vaidya brothers for the use of Tuloji Angre about the whereabouts of Pratinidhi and Yamajipant Mutalik and also about the Darbar activities.

---

No *20* श्री जेष्ठ वा॥ ५।६।१६७० रविवार
जून ५, १७४८

राजमान्य राजश्री **बालंभट** व ता।
राजश्री **विश्वनाथभट** वैद्य

स्वामीचे सेवेसी.

सेवक **नारो अनंत गद्रे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ता। जेष्ठ वद्य पंचमी रविवार मुक्काम कर्यात **भुगाव** जाणून स्वकीयें लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विपश स्वामीकडील कागदपत्र येऊन सांभाल होत नाहीं. याजकरितां चित उद्दास आहे, तर आपणांकडील सविस्तर वृत

संतोशांचें लिहोन संतोशवीत असिलें पाहिजे. यानंतर श्रीमंत राजश्री **रघोजीबावा** **जेष्ट सुध** त्रयोदसीस **नागपुरास** आले, येथील कामकाजाचा बंदोबस्त करीत आहेत. आपले कन्येचें लग्न करणार आहेत, आणि आपलेंही लग्न करणार **यैसें** वर्तमान आहे. कर्यात **भुगांव** व **मवाड** व **राह्यटगांव** आपणाकडील दूर करून खासगीस ठेविलें, हें घर्तमान पेसजी सेवेसी लिहिलें होतें, त्यावरून विदित जाहलेंच असेल. कर्यात **भुगांवचे** × × यैवजीं आठनवसे रुा × × यांजकडे कांहीं × रा **भुलाजी**पंताकडे × × × यैवज प्रस्तुत रुा दोनसे आम्ही घेतले × × × × आहे **जानमहमद** यांनीं शंभर रुा आम्हांपासून फिरवून घेतले. येणेंप्रों येथील वर्तमान आहे. कर्यात **भुगाव** पैकीं च्यार साडेच्यार हजार रुा वसूल आम्हाकडे जाहला. वरकड यैवज **देवडीकड** त्यांनीं घेतला. आम्हाकडे वसूल जाहला त्यापैकीं **पटी** व **पेशकसीचा** यैवज नेला. वरकड रुा येक कोनाकडील आला नाहीं. **नारोजी नेगी** वगैरा, कोणाकडे यैवज येणें होता त्याचा फार यत्न केला, परंतु कोणी पैसा येक देत नाहीं. रा **वेंकाजी नाईक गडकरी** यांचे च्यार पाचसे रुा × × × त्याचा × × येणें लोकाकडे आहे तो × × × पटीची × स्वकरून रा **राघोपंती** × × घेतले आणि यैवज बाकी येणें आहे. परंतु तो **देवढी**पैकीं × येत नाहीं. तेथीलही काम विह्कर जाहालें आहे. रा **कृष्णाजीपंत** व **सेखजी** ढालाईत याजबा कर्यात **भुगांव** पैकीं हुंडी च्यारसे रुपयाची व **राहटगांव** (व)गैरा येथील हजार रुपयाची येकून चौदासे रुा हुंड्या पाठविल्या. त्याचें उत्तर न आलें व **कृष्णाजी** पंतासही बहुत दिवस जाऊन जाहाले तर त्यांची रवानगी केली पाहिजे. येथील प्रसंग दिवसेंदिवस विपरीत आहे. याजकरितां आपलें येणें होईल तर उत्तम आहे. येते समई श्रीमंत राजश्री **पंतप्रधान** यांजकडील व **बाईसाहेबा**कडील कामकाज कांहीं घेऊन आलेयानें उत्तम आहे. येथें तो **श्रीमंतास** माणूस भेटत नाहीं. याजकरितां दरबारचें कामकाज असिलियानें सर्व गोष्टी होऊन येतील. वरकड दरबारचे जे ग्रहस्त आहेत ते आपणांस ठावकेच आहेत. सर्व प्रकारें **रा महादाजीपंत** आपणाविसीं साहित्यास चुकत नाहींत. हें स्वामीस विदितच आहे कीं, **कमलाई ठाकरिणीचा** दाड केला × × **श्रीमंताकडे** फिर्याद होणार आहे. तिचा × × × × स्वामीचें येणें या प्रांतें होईल तर

उत्तम आहे. नाहीं तर आम्हांस आज्ञा करा × × × केली पाहिजे. त्याप्रमाणे वर्तणूक करून कालोजी बाा पत्रें आलीं, तेथें आज्ञा जे, तुम्ही भुगावीं राहाणें याजकरितां राहिलों. असो कळलें पाहिजे बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे हे विनंतीपर.

---

*अव्यवस्थित.

(20) Naro Anant Gadre writes to Vishwanathbhat a detailed account of the Raghuji's activities After his arrival at Nagpur he was going to marry his daughter and to marry himself again. He deprived Vaidya of their villages viz. Bhugaon, Mavad & Rahatgaon and kept them for his private use Naropant requests Vishwanathbhat to come there soon with some political business with Raghuji and to set right all the irregularities

---

*No 21* श्री छ २७ जाखर

ज्येष्ट व. १४।१६७०

जून १३, १७४८

राजश्री **विसाजी रघुनाथ** वकील गोसावी यांसी

दाा अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नों **रघोजी भोसले सेना साहेब सुभा** दण्डवत. विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लेखन करीत जावें. विशेष. तुम्हांस जातेसमयीं राजश्री **येमाजीपंताच्या** अैवजाविसीं व पाा आंकोल्याच्याविसी सांगीतले होतें. तुम्ही मान्य करून सांगितलेत कीं, या गोष्टीचा बंदोबस्त करून लेहून पाठवितों. त्यास अद्यापि तुम्ही गेलियादारभ्य यागोष्टींचें विस्मरण पडोन कांहीं उत्तर आलें नाहीं. यावरून अपूर्व दिसोन आलें. हुजरे येथें हातरोखे घेऊन आले. त्यांस येविसीं पेशजी तुम्हांकडे लेहून पाठविलें आहे. त्याचाही जाबसाल अद्यापि आला नाहीं. येथील वोढीचा प्रसंग जो आहे, तो तम्हांस ठावकाच आहे **बंगालीयासी** फौज रवाना केली, याजमुळें व गुदस्तांचे राजश्री **स्वामीचे** देण्याच्या अैवजाबाबत राजश्री **रघुनाथ भटजीचें** देणें आहे, याजमुळें त्यांची धरणीपारणी नित्य होतात. यावोढीमुळें अैवजास दिवसगत लागली. याजकरितां राजश्री

स्वामीचे सेवेसी पत्रें देऊन हुजरे यांची रवानगी केली आहे, ये गोष्टींचा जाबसाल करून बंदोबस्त करून लेहून पाठविणें. रा छ २७ माहे जमादिलाखर ऐसी दर कामास राजपत्रें येऊं लागली तरी येथें स्थित राहिली पाहिजे. याचा बंदोबस्त केला पाहिजे.

×तुम्ही आम्हांसी काये बोलून गेला, अन तुम्ही कांहींच जाबसाल पाठविला नाहीं, अन मनमाणेसी दरबाराचीं झटें येतात, तर आम्हांसी बोलून गेला त्याप्रमाणें महाराज राजश्री स्वामीचें पत्र व तुम्हचें पत्र सत्वर पाठविणें. आम्ही तुमच्या भरोश्यावर बेफीर असूं. कळल पाहिजे. बहुत काये लिहीणें. लोभ असूं देणें हे विनंती ( मोर्तब सुद )

(21) Owing to Shahu's urgent demand for money, Raghuji was upset and blamed Vishwanathbhat for not doing what he was told to do at the time of his departure from Nagpur to Satara Raghuji expected him to give the King reasonable excuses for not sending money. The letter has a usual seal and mortab.

---

*No. 22* आषाढ शु॥ ४। १६७०

श्री जून १९, १७४८

श्रीमंत राजश्री बाळंभट व विश्वनाथभट

स्वामीचे सेवेसी.

सेवक नारो अनंत गद्रे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ता आशाढ सुध चतुर्थी मुकाम नागपूर जाणून स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष स्वामीकडून बहुत दिवस कागदपत्र येऊन वर्तमान कळों येत नाहीं, याजकरितां चित उदास आहे तर ऐसें नसावें. आलिया माणसाबा पत्रीं संतोषवीत असिलें पाहिजे. विषेश इकडील वर्तमान तर प्रा केळवद येथील ठाणें आद्याप आमचे स्वाधीन जाहालें नाहीं. रा गणेश गोजदेव (जोगदेव) यांचें कर्ज परगणेयांत अडीच हजार रुा आहे, ते रुपये रा बगोजीपंत व जगोजीपंत व नादरखान यांचे विचारें आहे जे, सालमजकूरचे ऐवज पैकीं आम्हांकडून रुपये देवावे, रुपयाची निशा जाहालियावरी ठाणें आमचे हवाले

करावें, यैसा त्यांचा विचार आहे. प्रो मजकुरीं आम्ही येक कारकून व दाहा प्यादे पाठविले आहेत. ते कसबेयांत आहेत. उठवून आणावे तर बदनश होईल. याजकरितां तेथेंच ठेविले आहेत. सालमजकूरचे पांढरीचे यैवजीं साडेतीनसे रुा **गणेशपंता** पासून घेतले आहेत, ते आम्हांस मागत आहेत. पुढें पट्टी पडेल तोही यैवज वसूल सुभेयाजकडे घेणार, यैसें प्रा मजकूरचें वर्तमान आहे. त्यास तुम्ही आपणाकडे परगाणा घेतलात आहा, तर सुभेयाचा रोखापत्र प्रगणेयावरी न होय, यैसी सनद **श्रीमंतांची** राजश्री **साबाजी बावास** व **बगोजी** व **जगोजी** यांसी **बावांचे** हास्ताक्षर लिहोन पाठविल्या पाहिजेत जे प्रा राजश्री **विसाजी रघुनाथ** यांजकडे दिल्हा असे, तेथील जो आकार होईल (तो) त्यांजकडील कमावीसदाराकडे देणें, तुम्ही काडीमात्र दखलगिरी न करणें, तेथील हिसेब हुजूर घेतला जाईल. कर्याति **भुगाव टेकाडी** येथील आठाविससे रुपये पटी मागत आहेत, आज दोन रोज दोघे जासूद आमचे घरी बसविले आहेत, रोज च्यार आणे करून दिल्हा आहे, येथील कारभारीयांसी रजबदल करुन पाहिली; परंतु आइकत नाहीं. पेसजी श्रीमंताच्या ताकिदी आणिल्या आहेत, तेही मानीत नाहीं ते म्हणतात आम्हांस श्रीमंतांनीं लिहिलें आहे जे, आम्ही सनद पाठविली ते तुम्ही न माननें पैका घेणें म्हणून म्हणत आहेत. रजबदल करून पाहातों. आईकली तर उत्तम आहे. न आईकितील तेव्हां कर्ज काढून रुाद्यावें लागतील. येथें यैवजही नाहीं. प्रा **रामटेक** येथील कामकाज अद्याप कांहीं नाहीं ताकिदीही देत नाहीं आणि सनदाही मात्राच्या देत नाही, याप्रमाणें **रामटेक** चें वर्तमान आहे मौजे **टेकाडी** येथें कौली बाजार गतवर्षापासून आहे. तेथें आम्हांस तो कांहीं प्राप्त नाही. कौल भरलेयावरी कांहीं येईल ते खरें. त्यास बाजाराकारितां **जानीभाई** रोज उठोन उपसर्ग करितो जे, पेठ **नागपूर** व **रामटेक** येथील जकात तुमचे गावचे बाजारामुळें बुडाली. याप्रमाणें रोज उठोन त्याचें बोलणें आहे. त्याचा काय ते आज्ञा केली पाहिजे, **पेठ नागपूरचे** च्यार हजार रुपयाचें वर्तमान पेसजी **राणोजी जासुदा** **बो** पेसजी लिहिलें आहे, त्याजवरून विदित जाहालेंच असेल. कर्यात **भुगाव टेकाडी** येथील इस्तमालत जाहाली आहे. हिसेब मागाहोन लिहोन पाठवून देतों, त्याजवरून कळों येईल. पेसजी **काळोजी** जासुदा बो **विसाजीपंत खासानिस** याजवरी दोन हजार रुपयाची हुंडी पाठविली ते पावलीच असेल. **केळवदाविसीं** व **रामटेकाविसीं** व कर्यात **भुगावाविसीं** व **टेकाडीविसीं** व

**पोतदारीविसीं** **वरातेविसीं** ताकिदी पाठवाल त्या **श्रीमंताचे** स्वस्ताक्षरच्या पाठविल्या पाहिजेत. **बावा** बो आपलें आगमन जाहालें तर उत्तमच आहे. राजश्री **रघुनाथ भटजीनें** पटीचे ह्या मुलकांतील तमाम वसूल घेतला, सालमजकूरचाही मालाचा तमाम वसूल घेणार आहेत. राजश्री **जानोजीबाबा बंगालेयाहोन** माघारे फिरले, म्हणून बाजारी वर्तमान आलें आहे. **चांदेयाचें** वरातेचें अद्याप कांहीं काम चालीस लागलें नाहीं. रा. **संकराजीपंत** तेथें आहेत, सरकारची जासुदाची जोडीही आहे. इस्तमालत जाहालियावरी पटी घालु म्हणून तेथील सुभेदार व **गंगाजीपंत** म्हणत आहेत. कळावें म्हणून लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री **रामचंद्रपंत स्वामीस** साष्टांग नमस्कार. विनंती, आलिया माणसा बो पत्रीं सांभाळ करीत असावें. **कोकणांत** पाठवावयासी कागद पाठविला आहे तो **कोकनांत** पाठवून जाब आणून आम्हांकडे पाठविला पाहिजे. वरकड इकडील वर्तमान **भटजीस** लिहिलें आहे त्याजवरून कळेल. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे. हे विनंती.

(22) Naro Anant Gadre writes to Vaidya brothers from Nagpur in detail the difficulties of realising the revenue of Kelwad (Kelod), Bhugaon, Tekadi, Peth Nagpur, and Ramtek and also the remedies they should adopt He has communicated the rumour that Janoji bawa returned from Bengal invasion. He requests Vishwanathbhat to accompany Raghuji bawa to Nagpur.

---

*No. 23* **श्री** आषाढ शु. ६। १६७०
जून २१, १७४८

राजश्रियाविराजित राजमान्यराजश्री **बाळंभट वैद्य** व राज्श्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यांसीः—

सेवक **महादाजी अनंत नामजाद, किले गोविंदगड** कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. **महादजी पाटणा** याजबरोबरीं पत्रें पाठविलीं तीं

आजी भोमवारीं सायंकाळीं प्रविष्ट जाहालीं. लिहिलें वृत्त सविस्तर कळलें. सिर्के उभयतां लष्कर सुधा निघोन बहिरवगडीं गेले, खालीं उतरणार म्हणोन लिा तें कळलें, त्यांचे बातमीमध्यें आहों व खबरदारी जी करणें ती केली आहे, व भगवंतराव पोतनीस तीनशे राऊत व तीनशे पायांचा जमाव येसें निघोन खालीं महाडाकडे जाणार म्हणून लिा व रा मानाजी आंग्रे यांच्या व रा स्वामींच्या भेटी जाहल्या, बरा सन्मान केला, म्हणून लिा तें सर्व अर्थ कळलें. महाडाकडे आम्हाकडील स्वारी आहे, त्यास लेहून हुशार केले व बंदोबस्ती करावयाची त्याप्रकारें केली आहे. आपण आम्हांस जें वर्तमान अढळेल तें वरचेवरी लेहून पाठवीत जावें. आम्ही सर्व भरवसा आपला धरिला आहे. जोडी हलीं आपणाकडे मुजरत पाठविली आहे. याजबरोबरीं सर्व अर्थांतर लेहून पाठविला पाहिजे. बहुत काय लिहिणें. कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विनंति.

(23) Mahadaji Anant Godbole, an officer of Tuloji Angre at Govindgad relates in this letter the news sent by Vaidya brothers about the probable disturbance that will be created by Shirke and Bhagwantrao Potnis round about Mahad Manaji Angre's visit to Shahu is an important event mentioned in this letter, It took place in May or June of 1748.

—•••—

*No. 24* **श्रीबालकृष्ण** आषाढ व ३०।१६७०
जुलै, १४,१७४७

श्रीमंतसौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब यांणीं समस्तसेनाधुरंधर राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांसी आज्ञा केली ऐसीजे, तुम्हीं विनतिपत्र पाठविलें ते प्रविष्ट जाहलें. नबाब निजामन्मुलुख यांची भेटी-बा(भा)री सौरस्यें करून जाहली, येथील कितेक बंदोबस्त करावयाचे ते करून अवि-लंबेच हुजूर दर्शनास येतों, म्हणून लिहिलें, तें विदित जाहलें त्यावरून हें आज्ञा-पत्र सादर केलें असे. तरी त्याची तुमची भेटी जाहलियावर पुढें राजकारण कोणते केलें, कितीक दिवसा यावयाचे होईल व राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब

बंगालयांत गेले आहेत, त्याज कडील काय वर्तमान तें साद्यन्त विनति पत्रीं लिहून पाठविणें. चिरंजीव राजश्री बऱ्हाणजी मोहिते यांसी समागमें घेऊन येणें आणि त्यांचे खटावचे पारसीपखाने करून घेणें. जाणिजे छ २८ रजब रुजूसही बहुत लिहिणें तरी सूज्ञ असा. ( लेखनावधि )

(24) This letter is written by the Queen S Sagunabai to Raghuji Bhosale, inquiring what was discussed with Nizam during his interview and whether any news received about Janoji's activities in Bangal. She asked to bring with him Barhanji Mohite, who was her brother She intended that Shahu should adopt Mudhoji, Raghuji's son. Raghuji's wife S. Sulabai and S Sagunabai of Shahu were step (चुलत) sisters belonging to the family of Mohite. This explains the intention of Shahu to adopt Mudhoji.

---

*No. 25* श्री. ५ साबान तिसा आर्बैन
श्रा. शु. ६ । १६७२
जुलै २०, १७४८

याद राजश्री पंतसचीव.

याजकडे चिठी पोते.

ऐवज दरमाहा जेष्ठमास पैकीं अनुष्ठान निा वाडा दुसरा मा‍ा बाळंभट वैद्य रुा‍ये १५६।~ येकसे छपन रुा‍ा पांच आणे देणें. छ. ५ साबान सुा‍ा तिसा आर्बैन.

(25) Pant Sachiv is asked to pay Rs 156-5 0 for the Anusthan performed during the illness of Rani S. Sagunabai through Balambhat Vaidya in the month of Jyesta.

*No 26*

१० साबान

श्री

श्रावण शु ११।१६७०
जुलै २५।१७४८

याद़ी पाघुरणें धुवावयासी सुाा तिसा आर्बैन मया आलफ खुद़.

**बालंभट बावा**

१ तिवट कोर
१ झगा साधा
१ सेला जाफरखा(नी)
१ धोत्र कोर
१ सेला जाफ (खानी)
१ झगा

१ तिवट
१ झगा साधा
१ झगा
१ तिवट मुलाचें
१ झगा कोरा मुलाचा दोरवा
१ जाफरखानी सेला
१ झगा बुट्टेदार

बाकी छ १० शाबान

१ तीवट मुलाचें
१ झगा कोरा दोरवा मुलाचा

१ झगा नागमोडीचा पारवा
१ तिवट जुनें
१ तिवट कोरें
१ निमा दोरवा

**रामचंद्र पंत**

१ सेला
१ पागोटें
१ कोरा सेला
१ पागोटे
१ सेला
१ जोटकोरा
१ सेलाखसखसी
१ तिवट

**बालंभट बावा**

१ तिवट कोरा बेलापूर
१ झगाजिमादार
१ सेला जाफरखानी

**लक्ष्मण बल्लाळ**

१ सेला
१ पागोटें कोरें
१ सेला

**धोंडभट वैद्य**

१ सेला खसखसी
१ झगा साधा

| | |
|---|---|
| १ ताडपत्री पांढरी | पांग्रुरणें ७ |
| **केसो हरी सावरकर** | १८६ कोरीं २ |
| १ सेला साधा | ·॥६ जुनीं ९ |
| १ तिवट | १॥ |
| १ दोरवा कोरा | ·।· मुंडासें |
| १ निमा | २ |
| १ कमरबंद | आषाढ वद्य ९ |
| ९ | १ आंगरखा |
| **महादेवभट जोगलेकर** | १ झगा |
| १ सेला | १ तिवट कोर |
| **लक्षुमण** छ. ८ रमजान | १ पागोटें |
| १ पागाटे जुनें | १ सेला खसखसी |
| १ सेला खसखसी | १ झगा |
| जिनसा ह्याप्रों | १ झगा पारवा |

१ सेला कोरा कृष्णभट केळकर १ नवार बाजेची

(26) This is a list of clothes used in those days by Vaidyas and their clerks. They were given to a washerman to clean.

---

No. 27

२१ साबान

श्रीरामोजयति

श्रा व. ८। १६७०

आगष्ट ५, १७४८

श्रीमत राजश्री **रघुजीबावा भोसले** गोसावी यासि.

श्रो **खंडोजी गोगवले** हवालदार माहालभांडारग्रुह रामराम. विनति उपरी बा। ऐवज खाजगी वगैरे बाकी ता। सन समान पैकीं येणें अनुष्टान आचरे नि॥ राजश्री **बालंभट वैद्य** रुपये २४४१ दोन हजार च्यारसे येकेचाळीस. देऊन पावलियाचें कबज घेतलें पाहिजे. तेणेप्रों मजरा असे छ २१ माहे साबान सु॥ तिसा आर्बैन मया आल्फ हे विनति.

(27) Khandoji Gogawale, an officer in charge of queen's treasury asks Raghuji Bhosle to pay Rs. 2441 to Balambhat to meet the expenses of performing an Anustan at Achre, during the illness of S. Sagunabai

---

*No. 28* श्री श्रावण वद्य १०।१६७०
आगष्ट ७,, १७४८

श्रीमंत राजश्री **बालंभटजीबावा** व तथा
राजश्री **विस्वनाथबावा** स्वामींचे सेवेसी.

आज्ञा धारक **संकराजी कानो** सिरसां नमस्कार विनंती. उपरी येथील वर्तमान ता। श्रावण वद्य दशमी गु॥ **नागपूर** स्वामींचे आसीर्वादेकरून सुखरूप असो विशेष स्वामींनीं मजला वरातेवरी प्रा। **चांदे** येथें पाठविलें, त्यास सनदे प्रमाणें मुछेद्यांच्या भेटी घेऊन सनदा लाविल्या, दोन महिने इस्तमालेतीचे दिवस यामुळें कटकट बहुत केली, परंतु चालली नाहीं. पुढें श्रीमंत राजश्री **जानोजीबावा** यावयाची खबर आइकिली आणि राजश्री **साबाजीचा** सुभा अगोदर राजश्री **गंगाजीपंतीं** काडिला होता तो फिरोन त्याचा त्यास दिला. पहिला **बहिरोपंतास** दिला होता, मग **श्रीमंताची** खबर आइकोन त्याचा त्यास दिला. तेव्हां आमचे रुपयाची निकड लाविली. **बंगालियाहून** श्रीमंत आले. त्यांस कांहीं खर्चास दिले पाहिजे. **बहिरोपंतास** रुपया न मिळे. यामुळें **साबाजीस** सुभा देऊन, त्या पासून घेऊन आम्हांस पांच हजारांची **साताराची** खरी लिहून दिली आणि हुंडणावळ दर सेकडा रु॥ १८ आठरा प्रो नवसे रुपये घेतले. येकून पांच हजार नवसेचें कबज आमचें घेतलें. आम्ही म्हणत होतों जें, आमचे पदरीं नक्द रुपये घालणें आम्ही आपले खांद्यावरी नेऊन जाऊं, नाहींतरी कांहींतरी करून, रुपये नकदी देणें परंतु त्यास ते मुछेदी बोलिलें जें, आम्हांस नक्द रुपाया मिळत नाहीं, राजश्री **नाईकांची** हुंडी लिहून देतों. त्यास आम्ही दोन महिन्यांनीं रुपये देऊन, तुम्ही म्हणतां जें नकद द्या, तरी नगदीं कोठून द्यावे? प्रगणियांत तवजी पडिलीं नाहीं, तो पटी कसी करावी? येसी घालमेल करितों तो श्रीमंत **बंगाल्याहून** आले. **नागपुरास** दाखल जाले.राजश्री **गंगाजी-पंतास** पंचवीस रुपये मसाला करून जासूद पाठविले. मग **गंगाजीपंत** बोलिला

जें, **नागपुरास** जाऊन तुम्हांस रुपये देऊन ऐसें बोलिले. मग त्या जासुदा देखता आम्ही व सरकारचे जासूद आम्हा बराबरी होते त्यांणीं व आम्ही घराचे दरवाजे लाऊन पाणी बंद करून अन्न बंद केलें आणि आपले हातीं कटारी घेऊन दरवाज्यांत बैसलों जे, आमचे रुपये द्या तेव्हां तुम्ही **नागपुरास** जावें, नाहींतरी आपली हत्या तुमच्या दरवाज्यांत करितों. ऐसी निकड करून येक दिवस येक रात्र बैसलों. ते समई पाच हजारांची खरी हुंडी लिहून दिली आणि नवसे रु।। हुंडणावळ घेतली.

[ अपूर्ण ]

(28) Shankaraji Kano writes from Nagpur to Vaidya brothers why he cannot recover the money due from Chande when the officers in Chande heard the news of the arrival of Janoji, they gave the management of Sebaji's district to Bahiropant and ousted Gangajipant, but he was also unable to pay money to them They therefore took severe steps of keeping Gangaji in the house with door closed without water & food, to get the sum in cash. The letter is incomplete.

---

*No*. 29 श्रीशकर भाद्रपद शुध २ । १६७०
आगस्ट १४, १७४८

श्रीयासह चिरंजीव राजश्री **बिश्वनाथभट वैद्य** यांसी प्रति **बालंभट वैद्य** आनेक आसिरवाद. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे. यानंतरी दरबारचें वर्तमान तरी भाग्यसंपन्न **मातुश्री बाईसाहेब** वाडा दुंसरा ही निघोन **जेजूरीस** जावयासी निघोन काल मंदवारीं राजश्री **स्वामीसहित खेडास गेले.** आज **शिवथरचा** मुकाम आहे. मजल दरमजल **तुलजापुरास** जाणार. आम्हीं बराबर गेलों. सौभाग्यादिसंपन्न **मातुश्री बाईसाहेब** मंडली निघोन बुधवारीं जाणार आहेत. समागमें **पेसवेही** येतील. राजश्री **रघोजी भोसले उंदेरीस** आहेत. **नागपुराकडील** कागद आले, ते बजिनस तुम्हांकडेस पाठविले आहेत, त्यावरून कळेल. घरीं चौकीस माणसें राजश्री **पंतप्रतीनिधी** यांजकडील दाहा मागोन घेतलीं आहेत. चिंता न करणें.

तुम्ही अनुष्ठान जाहालें म्हणजे लवकर येणें. स्वारीस दोनतीन महिने लागतील. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें. धोत्रजोडा किमत रुा १३ तेराचा पाठविला आहे. हा घेणें हे आसिरवाद.

आपत्यें **लक्षुमणानें** च्यरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार. विनंती उपरी राजश्री **रामचंद्रपंत मेढीयासी** गेले आहेत. उदईक येतील. आपण अनुष्ठान जाहलियावरी त्वरेनें आलें पाहिजे. तीर्थस्वरूप स्वारीस गेले. आपणास कळावें म्हणोन लिहिलें आहे. बहुत काये लिहीणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

राजेश्री **महादाजीपंत गद्रे** व **सदाशिवभट जोगळेकर** स्वामीस सां नमस्कार.

(29) Shahu takes Rani Sagunabai to Jejuri where she died on August 25th, 1748



*No. 30* **श्रीशंकर** भाद्र. २ श. १६७०
आगस्ट १४, १७४८

असिर्वाद उपरी **श्रीमंत महाराजांचें** येथून कूच उदईक होऊन **अवधावर** जातात, तर उंट व हत्ती सत्वर पाठऊन देणें, भोई पाठविला आहे. याजबराबर पालें पाठऊन देणें व तुम्हीही येणें व **त्रिंबकभट वैद्यांची** महाराजांनीं याद केली होती त्यास पाठऊन देणें हे असीर्वाद.

= आठवण.

(30) The letter is written by Balambhat to Vishwanathbhat Chhatrapati Shrimant Maharaj means Shahu. He was to go via Aundh to Jejuri



No. 31 श्रीशंकर भाद्र. शु. ७ । १६७०
आगष्ट १९, १७४८
शुक्रवार

चिरंजीव राजश्री **भास्करास** प्रति **बाळंभट वैद्य** आसीर्वाद. उपर दगड आणून भिंत घालवणें व दोन च्यार नवे चाकर ठेऊन दोन आम्हाकडे पाठवणें. आम्हांस आगत्य पाहिजेत. खालीं **कोंकणांत** लेहून पाठवावें कीं, राजश्री **स्वामी जेजूरीस** गेले, त्यास तुम्ही अनुष्ठान उरकून सत्वर येणें. लोकांकडे पैका वसूल करणें. दोघे चाकर सत्वर पाठवणें. दोघे घरीं ठेवणें. शालनामेयाचें डगलें व दोन पागोटीं पाठवणें. आज भृगुवारीं प्रातःकाळीं कूच करून **सालपियास** गेलों. तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें आसे हे आसीर्वाद. राजश्री **रामचद्रपंत** यास नमस्कार. लिहिल्या प्रों पाठवणें. घरीं बहुत सावधपणें राहाणें. हे विनति. कांहीं फराळास पाठवणें. घरचें वर्तमान वरचेवर लेहून पाठवणें रोज दररोज. चिरंजीव **रामचंद्र** यास व **आनूंस** व **लक्षुमणास** आसीर्वाद.

राजश्री **रामचंद्रपंत** व **लक्षुमणपंत** यासि सा। नमस्कार व आसीर्वाद

(31) Balambhat writes this letter to Bhaskar.
Shahu goes to Jejuri with his ailing Rani Sagunabai who died there on 25th August 1748.

---

No. 32 **श्री** भाद्रपद शुद्ध ८।१६७०
आगष्ट,२० १७४८

श्रीमंत राजश्री **विश्वनाथभट बावा** स्वामीचे शेवेसी—

विनंति पो **रामचंद्र गोपाळ** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति ता। भाद्रपद सुध ८ पावेतों मु। **सातारा** समस्त सुखरूप आसोत. यानंतर सौभाग्यवती मातुश्री **बाईसाहेब** वाडा २ यांसि समाधान वाटत नाहीं, त्यास भाद्रपद शुध प्रतीपदेस मंदवार निघोन **खेडास** गेली. तेथून निघोन **जेजुरीवरून तुळजपुरास** जाणार म्हणोन स्वार होऊन निघाली. ती रोज कोस दोन कोस

प्रॉ जात आहेत भाद्रपद सुध सप्तमॉस साल्प्यावर गेली आहेत. तीर्थस्वरूप राजश्री बालंभट बाबा ही गेले आहेत. तमाम समागमें गेले आहेत. सौसंपन मातुश्री बाईसाहेब वाडा १ ही उदईक नवमीस रविवारीं स्वार होऊन जाणार आहेत. त्या समागमें प्रतिनिधीही जाणार आहेत. रा रघोजी भो या कडील काल कागद आले. तूर्त उदेरीवर आहेत. नाशरजंग याची भेटीचा मार आहे, तो होऊन मग नागपूर प्रांतास जाणार. वरकड येथील तमाम लोक गेले आहेत रामकरास आनुष्टान चतुर्थीस समाप्त करणार म्हणोन यैकिलें. त्यास जाहलें असेल तरी आपण सत्वर निघोन यावें. दिरंग न लावावा. वरकड वर्तमान येथा-स्थित आसे. आज्ञे प्रो वर्तणूक करीत आहों बहुत काये लिहिणें हे विनंति.

राजश्री सदाशिव भट व माहादाजीपंत व वरकड समस्तांस सा नम-स्कार हे विनंती.

(32) The illness of Rani Sagunabai and Shahu's movements are described in this letter He was taking her to Tuljapur. Rani Sakawarbai stars tomorrow Pratinidhi accompanied her. Karkare desires that Vishwanathbhat should also go with them. as he has finished the anusthan in Konkan now.

---

No. 33 श्री १६७०

१६४८

यादी यैवज नेमणूक राजश्री यमाजीपंत

| | | | |
|---|---|---|---|
| निशा | रुपये | २०००० | राजश्री रघुनाथ भटजी |
| निशाकरार | | १५००० | राजश्री बऱ्हाणजीबाबा मोहिते |
| निशाकरार | | १५००० | राजश्री शिवाजीबावा मोहिते |
| | | १०००० | राजश्री बाबूराव उपाध्ये |
| | | १५००० | राजश्री विठोबा नाईक वाकडे |
| | | १५००० | राजश्री भगवंतराव |
| करार | | १०००० | राजश्री सिदंभटबावा |

| | | |
|---|---|---|
| | २०००० | राजश्री कोनरपंत |
| करारनिशा | १०००० | विष्णूपंत |
| करार | १०००० | विश्वनाथबावा वैद्य |
| | १४०००० | |
| | १०००० | सुकानंदबावा रुा |

(33) The date of the letter cannot be determined. The persons in the list kare well-known & are bankers. Yemaji means Yemaji Shivadeo mutalik of Pratinodhi It seems, he undertook to recoverthe amounts from the persons probably for Shahu Chhatrapati Raghunath bhat zi mhare Patvardhan Barhanji Mohite is a brother of the Rani Sagunabai, Vithoba Naik Wakade is a great banker of Wai, Smidambhat Sirname, is Purohit (P. D 20 30) Konerpant is Bhaskarram Kolatkar's brother of Pandewadi, & a Sarmdar of Bhosle. Vishnupant is by Sirname Gadre one of the agents of Sugunabai (P. D. 18, 86, 88) Sukanabawa is one of Shahus Courtiers (P D. 18 88)

---

*No. 34* श्रीआईआदिपुरुष भाद्र. व. २। १६७०
आगष्ट २९, १७४८

वेदमूर्ती राजश्री बालंभट व विश्वनाथभट वैद्य स्वामी गोसावी यासि.

सेवक जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल भाद्रपद वद्य द्वितीया जाणऊन स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. आपण बहुता दिवशीं पत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ केला आला. कर्जाच्या व मामलत्याच्या रुपयाविसीं लिहिलें यैसी यांसि मामलेचे येक सालची चिटी आम्ही पन्नास रुपयाची आपणास दिली आहे, आणि आपण लिहिलें कीं, तीसालचे दीडशे रुपये द्यावे, म्हणऊन लिहिलें तर आम्हांकडे कांहीं तिसालाचा गुंता नाहीं. भटजीचा भटजीकडेच असेल. आम्हाकडे कांहीं दोन सालचा गुंता नाहीं. येक सालची पन्नास रुपयाची चिठी स्वामीस आम्ही दिली आहे. तो यैवज आम्ही वारून घ्यावा, त्यास प्रस्तुत कांहीं अद्यापि हंगांम नाहीं. हंगामी गुंता वारून देऊं. यानंतर कर्जाच्या रुप

याचा मजकूर तरी बहुत दिवस जाहले हें खरें।· आहेत. परंतु आमचा विचार वेडीचा प्रसंग जाहला आहे तो आपणास परस्परें दखल जाहलाच आहे. हात चालिल्यावर ज्याचा पैसा ध्यावा तो काय न × × × यैसे कोणाचे चितांत आहे यैसें नाहीं. परंतु दो हजारास यत्न न चाले. संकराजी कानो यांनीं येथें दोन रोज अतीषय बहुत केला, तो कांहीं पत्रीं लिहितां पुरवत नाहीं यांणीं आपलें कर्तव्य करावयाचें त्यास चुकले नाहीं. हात चाले सारखा असिल्यावर इतके करून ध्यावेसें काय आहे, परंतु येत्न काय करावा याजकरितां सोसावे लागतें. यैशास आपण थोर आहेत. आपले देणें दिल्या विना वाट नाहीं या लोकीं न दिल्हे तरी पुढले जन्मीं देणें लागेल सुटतें यैसें नाहीं येथील आमचा अर्थांतर आवघा संकराजीपंती पाहिला आहे सांगता कलल, मारविलेयासी रुपये ७ सात देविले ते ढिल्हे असेत. कललें पाहिजे ×बहुत काये लिहिणें हें विनंति.

---

×पुढील अक्षर प्रतिनिधींचे स्वत चे

(34) This is a letter by Jagajivanrao Pratinishi to Vaidya brothers informing that he was unable to pay their debt at present,

---

*No. 35* श्री कार्तीक शु. १, १६७०
आक्टो. १२, १७४८

राजश्री बाळंभट वैद्य ता राजश्री विश्वनाथ वैद्य गोसावी यासीं

श्रों जिवराव सिंदे हिमत बहादर दंडवत विनंती. सुरू तिसा आर्बैन मयाअलफ. यैवज सरकार बाा पेशजी विद्यमान्य राजश्री घनबा मंत्री यैवजी लखमोजी खोजे रुपये २००० अक्षरी दोन हजार पुण्यसुद पूर्णिमेस पावता करणें. शके १६७० विभव नाम संवत्सरे कार्तिक सुद प्रतीपदा छ १ माहे जिलकाद हे विनंति.

(35) Jivarao Shinde Himat Bahadur requests Vaidya brothers to pay Rs. 2000 to Lakmoji Khoje, instead of paying the same to Ghanaba Mantri,

---

No. 36 श्री छ. २२ जिल्काद ३४
का. व. ९ । १६७०
नवबर ३,१७४८

शकराजी नारायणाचा शिक्का व मोर्तब
पद्मदलसम चौकोनी दुरेघी

दस्तक सर राजश्री पंतसचीव

ताहाकमाविसदार जमाती माहालानिहाय सुमातिसा आर्बैन मयाआलफ राजश्री **बाळंभट** व **विस्वनाथभट वैद्य** यांचे तांदूळ **जांबली** तो गुंजणमावल येथून **सातारीयास** बैल सर ३० तीस भरून येतील, त्यास मार्गी कोण्ही मुजाहीम न होणें. जाणिजे. छ २२ जिल्काद (मोर्तब सुद.)

सुरू सुद बार

(36) Permit is given by Pant Sachiv to Vaidya brothers for taking 30 bullocks loaded with rice, from Jambali to Satara This precaution saves trouble from officers, in the way At this time Vaidyas were living at Satara.

---

*No 37* श्री छ २५ जिल्काद
का. वद्य १२।१६७०
नवबर ६, १७४८

राजश्री **विसाजी विष्णू** गोसावी यांसी.

स्नों **रघोजी भोसले सेनासाहेबसुभा** दंडवत सु॥ तिसा आर्बैन मया अलफ राजश्री **विसाजी रघुनाथ** वकील यांस हत्तीचे गाशाबद्दल बनात गज ७ सात व अस्तर छीट व झालरेस तापता येणेप्रों देणें. जाणिजे छ २५ माहे जिलकाद. हत्तीचा गाशा तयार करून देणें. वरशाबदल ताणे सुमारें ४० चाळीस देणें. छ मजकूर बहुत काये लिहिणें. मोर्तबसुद.

पुढील मजकुर लेखकाच्या हातचा.

(37) Raghuji Bhosle orders Visaji Vishnu that Vishwanathbhat should be supplied the necessary cloth for preparing a nice cover (गालीच्या) for his elephant and also 40 strong strings to keep it in place on the animal every year.

*No. 38* श्री मार्ग शुध ५ १६७०
नवबर १४।१७४८

राजेश्रिया विराजित राजमान्य राजेश्री **विश्वनाथ** वैद्य
स्वामी गो°

**सिवभट साठे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी बाबत **मकडाई** तालुका श्रीमंत राजेश्री **राणोजी भोसले** यांजकडील कमाविस आपणांस श्रीमत **रघोजी भोसले** सेनासाहेबसुभा यांजकडून कमाविस आपण केली, मुक्रार रुपये ५००० अक्षरी पांच हजार, निमे पौष सुध पौर्णिमा रुपये २५०० अक्षरी अडीच हजार देऊन बाकी निमे रुपये २५०० अक्षरी अडीच हजार चैत्र सुध पौर्णिमेस देऊं. बशत **राणोजी भोसले** यांची सनद पाठऊन द्यावी. जर सनद न आली तरी आपले रुपये तुम्ही माघारे द्यावे. मशार-निलेकडील कमाविसदार यांणीं वसूल महाली घेतला असेल, तो या रुपयांत मजुरा घेऊन. शके १६७० विभवनाम संछेर मार्गेश्वर सुध पंचमी ५ कमाविस विभवनाम संछेर हे विनंती.

रा° **राणोजी भोसले** याकडील कमाविसदार यांणीं वसूल महाली घेतला असेल तो दीड महिनिग्यांत वसुलाचें पत्र आणून देऊं. हे वि(न)ति.

वसूल रु° मा° **जखापा** देविले रु° राजसापुतलासा देवलसी **खोलापूर-कर** वादेयास पैषसुध १५ रु° २५०० अक्षरी अडीच हजार दिले.

(38) This is the earliest mention of Shiwabhat Sathe who is managing the Bhosle's district of Makadai (near Khandwa). He is known as the Subhedar of Katak appointed by Janoji Bhosle In this letter it is said that Raghuji Bhosle gave him the Kamavisi of the Makadi district for Rs. 5000/-

---

*No. 39* **श्रीरामचंद्र** मार्ग. वद्य १।१६७०
नवबर २४, १७४८

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **विश्वनाथभट वैद्य** स्वामी गोसावी यांसी—

पो° **चिमणाजी नारायण सचीव** नमस्कार विनति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणें. विशेष. राजश्री **बाळाजी पंडित प्रधान**

ते केलें पाहिजे. तेणेंकरून **राजश्री** संतोषी होतील. दसरियास येवज न पावे तर राजश्री **स्वामी** स विपर्यास दिसोन येईल. येदर्थी पूर्वीही आपण पांच सात वेला लिहीतच आलो. येक **खावंद** संतोषी असिलिया सर्व गोष्टी उपयोगी पडतील. राजश्री **विसाजी गोविंद** यांस आपणापासीं ठेऊन घेणें. यांचें काजकाम कारभार यांचे हातें घेतलिया मनसुब्यास उपयोगी पडतील. राजश्री **कोनेरपंत** यांचे चिरंजीव तेथें आहेत, त्यांचे हाते पूर्ववत् प्रमाणें कारभार घेतलिया राजश्री **कोनेरपंत** येथें असिले, तऱ्ही आपणापासींच आहेत. येथेंही **कर्नाटकचा** कारभार आहे. हे येथें असिलियानें उपयोगासच पडेल वरकड उभयेता येथील कितेक मजकूर सागतील, तो अर्थ सविस्तर घ्यानांत आणून राजश्री **कोनेरपंतास** आपण जे समई आज्ञा करितील ते समई आपणापासींच आहेत+ बहुत काय लिहिणें लोभ असो देणे हे आशिर्वाद.

---

+ पुढील मजकूर ठकारांच्या हातचा.

( 39 ) This is an important letter revealing why Shahu was so anxiously calling Raghuji to his presence. Shahu believed, Raghuji had amassed vast wealth from Bengal and demanded a Share in it to pay off his debts, which he wished to clear before he died. Raghuji in his personal visit ro Satara in 1747 had possibly agreed to pay off Shahu's debts. He sent messengers and special agents to Raghuji for that purpose. This letter also proves that Shahu wanted Raghuji's presence at Satara, not so much for settling the succession, but to have his debts cleared off.

---

No. 40 श्री

रघूजीचा शिक्का भाद्रपद व. ४।१६७१
व मोर्तब यावर आहेत सपटंबर १९, १७४९

दा। मा। अनाम **देशमुख** व **देशपांडिये** मामले **रामटेक प्रांत देवगड** यासी. **रघोजी भोसले सेनासाहेब सुभा** सुहूरसन खमसैन मया व अलफ. मौजे **डुमरी-चिखल्या** पा। मजकूर हा गाव वेदमुहूर्ती राजश्री **सदाशिवभट चिपुळणकर** व **परशरामभट भाभे** दि। राजश्री **विसाजी रघुनाथ वकील** यांसी दरोबस्त मुकासा दिल्हा असे. तरी मौजे मजकूरचा **माल** व **सायेर** व **जकाती** कुलबाब, कुलकानू, वसूल वेदमुहूर्तीस सुरलीत देवणें. जाणिजे. छ १७ माहे शौवाल ( मोर्तबसूद ).

( 40 ) Raghuji orders Deshmukh and Deshpande of Ramatek that as the right of revenue collection of Dumri Chikhalya is given to the agents of Vishwanathbhat Vaidya, viz. Sadashivbhat Chipalunkar and Parashurambhat Bhabhe, they should receive the same without any obstruction.

---

No. 41 श्री आश्विन शु. ५,१६७१
आक्टोबर ५, १७४९

तीर्थस्वरूप राजश्री **बालंभट बावा वैद्य.**

वडिलांचे सेवेसी.

आपत्ये **विश्वनाथभट वैद्य** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. ता। आश्विन शुध ५ मु॥ लष्कर ना॥ **देऊलगांव राजयाचे.** सुखरूप आसो विशेष. आपणाकडील पत्र येउन वर्तमान कलत नाहीं, तरी सविस्तर लेहून पाठवावे व दरबारचे सकल वृत ल्याहावें. आम्ही मजल दरमजल **श्रीमंतां**समागमें देशास येत असो. वडिलांस कलावे. घरीं व दरबारीं बहुत सावधपणे असावें. बहुत काये लिहिणे. लोकांकडील ऐवजाची निकड करावी हे विनंती. ( ना॥ = नजिक )

राजश्री **रामचंद्रपंतास** नमस्कार, लि॥ परिसिजे.

आपत्ये **नारो सिवदेव** सा॥ नमस्कार.

सहस्त्रायु चिरंजीव राजश्री **भिकू** व **रामचंद्र** व **बाबूस** आसिर्वाद.

( 41 ) This letter of Vishwanathbhat to Balambhat from Camp near Rajyache Deulgaon in Berar shows that he was very anxious to know the news of the Satara Court. He started with Raghuji to go to Satara.

---

No. 42 श्री आश्वीन व. ४।१६७१
आटोबर १८।१७४९

राजमान्य राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेब सुभा** यासी. अज्ञा केली ऐसीजे, तुम्हाकडे दिवाणच्या ऐवजाबदल राजश्री **विसाजी रघुनाथ** यास पाठविलें. त्यास बहुत दिवस जाहले ; परंतु ऐवज येत नाहीं. येथे तो खर्चाची निकड आहे. तर झाडियानसीं ऐवज मारनिलेचे पदरीं घालून सत्वर रवानगी करणे. ऐवजपैकीं तूर्त ऐवज रुपये १०००० दहा हजार पाठविले ते पावले, छ. १७. जिल्काद सु॥ खमसैन मया अलफ.

+ पाठि(व)ले ते पावले रुपये दा हजार १००००. सूज्ञ असा+

---

+ मधील मजकूर **शाहुमहाराजां**च्या हातचा : दिवाण = सरकार.

(42) Shahu in his own hand acknowledges receipt of Rs. ten thousand, sent by Raghuji Bhosale, who owed tohim as debt. This shows that Shahu was active at this time also in collecting money to pay off what he owed to others.

---

No. 43 श्री. आश्विन व. ४।१६७१
अक्टो. १८,१७४९

राजश्री **विश्वनाथ भट वैद्य** यासी. आज्ञा केली ऐशीजे. तुम्ही विनंतीपत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेबसुभा** यांजकडे सरकारचा यैवज याजवळ येणे त्याविसीं तुम्हांस जाते समयी जे आज्ञा करणें ते केली आहे; परंतु अद्याप निकाल होऊन तुमचे येणं होत नाहीं. तुम्हांस जाऊन तर बहुत दिवस जाहले. अजुनी न या हे कोण गोष्ट? याउपरीं दिरंगावर न घालितां आज्ञेप्रमाणे यैवजाचा निकाल करून घेऊन सत्वर हुजुर येणें. दिवसगत येकंद्र लागो न देणें. हुजूरची वोढ आहे हे तुम्ही जाणतच आहां. तरी यैवज घेऊन सीघ्रवत येणे. + बहुत काय लिहिणे. +

---

+ मधील मजकूर **शाहू महाराजा**च्या हातचा, या पत्रांत सरकारचा यैवज म्हणजेच दिवाणचा यैवज असा अर्थ आहे (याच तारखेचे रघूजीस लिहिलेलें पत्र पहा.)

(43) Shahu urgently requires money and laments the delay, Vishwanathbhat is causing on his return.

---

No. 44 श्री अश्वीन वद्य ४।१६७१
आक्टोबर १८, १७४९

राजश्री **विश्वनाथ भट वैद्य** यासी. आज्ञा केली ऐसीजे. राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेबसुभा** यांजकडे **जामदारखानिया** कडील व राजश्री **देवराव** याचा यैवज दोनतीन साला येणें. याकरितां तुम्हांसमागमें **जामदार** देऊन पाठविले. तुम्हांस जाऊन किती दिवस जाहले? अद्याप कांहींच स्वालजाब पाठविला नाहीं. याजवरून तुम्हांस यैवजाची चिंता नाहीं ऐसे **स्वामीस** दिसोन आलें. दसरा

आला. अद्याप सावकाराची निशा होऊन कामकाज चालत नाहीं. अगदीं **जामदार-खानिया**चा कारभारच बंद जाहला आहे. इतकियावर यैवजास दिवसगत लागलिया उत्तम नाहीं. यैवजाची निकड आहे. याजकरितां हालीं हुजरे पाठविले आहेत. तरी तुम्ही ढील न करितां यैवज झाडियानिशीं निर्गम करून घेऊन पाठऊन देणे. दिवसगत लागलिया **स्वामीस** मानणार नाहीं. दोनी यैवज झाडा करून **जामदाराच्या** पदरीं घालून सत्वर रवाना करणे. + बहुत काये लिहीन. +

---

+ मधील अक्षर **महाराजां**च्या स्वतःच्या हातचें.

( 44 ) Poor Shahu ailing on his deathbed at Satara is doing his very best to call funds from Raghuji to pay off his debts. Raghuji clearly avoided the payment, as shown in this letter, after repeated despatch of special messengers and agents. Deorao mentioned in this letter is Lapate and was working as agent of Sagunabai in company with Vishnupant Gadre and Baloji Salokhe ( See P. D. 18 · 88 ).

---

No. 45 श्री+शंकर आश्विन वा ७।१६७१

आक्टो. २१,१७४९

तीर्थस्वरूप राजश्री **बाळंभट दादा** स्वामी वडिलांचे सेवेसी.

आपत्यें **विश्वनाथें** चरणावरी मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विनति. येथील कुशल ता। आस्विन वद्य सप्तमी पावेतों मु। **नागपूर** वडिलाचे आसिर्वादें-करून सुखरूप आसो विशेष. वडिलांकडील पत्रे आलीं तीं पावलीं. लिहिला अर्थ कलो आला. त्यास उद्ईक राजेश्री **सेनासाहेबसुभा** येथून कूच करून **कलंबेश्वरास** जाणार. पुढें मजल दरमजल **वराड** प्रांते जातात. आम्ही समागमें आहों. निरोप घेऊन अविलबेंच येतों. दरबारचें वर्तमान व घरचें वर्तमान सविस्तर लेहून पाठविलें पाहिजे. आपणांस **पूर्वी** पत्रें लि। व येते समयीं सांगितलें आहे. त्यास दरबारचें वर्तमान राजश्री **स्वामी**कडील व **देवढी**कडील मनास आणोन लेहून पाठवावें. त्यासारिखें राजश्री **सेनासाहेबसुभा** यांसी घेऊन येऊं. तरी हे तेथे आल्यानें राजश्री **स्वामी**कडे अगर **देवडी**कडे गुंता न पडे आणि यांचा बहुमान करून रवानगी सत्वर होये ऐसें असिलें तरी राजश्री **स्वामींचा** हातरोखा व **देवडीचें** पत्र ऐसी देऊन राजश्री **बऱ्हाणजी मोहिते** व राजश्री **कृष्णाजी केशव** यांसी सत्वर पाठवावें. त्यासारिखें यांसी घेऊन येऊं + बहुत काये लिहिणें हे विनंति. +

---

+ मधील अक्षर लेखकाचें स्वतःचें. देवढीकडील = राणीकडील.

(45) This is a reflection on the last days of Shahu. Raghuji even so late required an autograph letter from Shahu. Possibly there were rumours that he was unconscious or unable to execute work.

---

No. 46 श्री छ २ जिल्काद

पत्रावर शिक्का व अश्वीन व. १२।१६७१

मोर्तब आहेत. आक्टोबर २६, १७४९

राजश्री **विश्वनाथभट वैद्य** गोसावी यांसी.

दा। अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रों **राघोजी भोसले सेनासाहेब सुभा** दण्डवत विनति, उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करणें. विशेष तुम्हांस कितेक सांगणें तें सागितलें आहे, त्यास तुम्ही तो अर्थ चितांत धरून मार्गीं कोठे न गुंततां मजल दरमजल जाणें. जावयासी येकंद्र दिसगतीवर न पडेल तें करून सत्वर तुमचे जाणें होये तें करणें. येविशीं विस्तारें ल्याहावें तरी तुम्हांसही अगत्यच आहे. तुम्ही सातारेयासी पोचतांच जो मजकूर होईल, तो जलदीनें आम्हांकडे लेहून पाठवणे. तुमचे उतराचा मार्ग पहात असो. रा छ २५ जिलकाद. + जलदीणें जाऊन पोहोचणे. कुठ मेहमाणीस न गुंतणे. सत्वर जाणें. बहुत ल्याहवें तर तुम्ही शाहाणे आसा. कळल पाहिजे. बहुत काये लिहिणें हे विनंती + ( मोर्तब सुद )

मेहमानी = आतिथ्य, मेजवानी

---

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा.

(46) Raghuji, at last, for the present abandoned the idea of going to Satara personally and sent Vishwanathbhat urgently to obtain correct news of Shahu's health, upon receipt of which he was going to decide definitely his own plans of going to Satara.

No. 47

२२ जिल्हेज
कार्तिक वद्य ९ शके १६७१
नोव्हेंबर ७, १७४९

याादी सनगें **नांदेडी** खानगी **सातारा** छ २२ माहे जिलहेज सुा खमसैन मयांआलफ सनगें सुमार.

२० **बिंबाजी बावा भोसले**
१० तिवटें, ५शेले, ५ दोरवे.
२०

५ **बनसीपुरी बावा**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा, १ महमुदी जोट.
५

१४ **बऱ्हाणजी बाबा मोहिते**
५ तिवटे, ३ शेले, २ दोरवे, ४ महमुद्या.
१४

४ **राघो नारायेण राजवाडथे**
१ तिवटं, १ शेला, १ दोरवा, १ महमुदी साधी
४

४ **कोनेरपंत**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा.
४

४ **अंबाजी महाडिक**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा.
४

४ **सदासिव दिक्षित**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा.
४

४ **येशवंतराव महादेव**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा.
४

४ **ह्याणगोजी मोहिते**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा.
४

२ **विसाजी बलाळ**
१ तिवटें, १ शेला दोरवा.
२

४ **सिवाजी बाबा मोहिते**
२ तिवटें, १ शेला, १ दोरवा.
४

१९

५०

६९

सनगें तपसीलवार
३१ तिवटें, १६ शेले,
१६ दोरवे, ६ महमुद्या.
६९

( महमुदी = मखमली वस्त्र ).

५

( 47 ) This is a list of dresses, presented to persons of influence at the Satara Court, probably sent by Nizam.

---

No. 48 श्री कार्तिक वद्य २।१६७१
नवंबर १५, १७४९

राजश्रियाविराजित राजमान्य राजेश्री **लक्षुमणपंत जोशी** मुा **वाई** स्वामी गोसावी यासी—

पो **बाबूभट साठे** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल ताा कार्तिक वद्य द्वितीया पावेतों मुकाम **बुरंबाड** येथें समस्त सुखरूप आसो विशेष. तुम्हांकडील बहुत दिवस वर्तमान कलत नाहीं तरी यैसें न करावें. पत्र पाठऊन सांभाल करीत गेलें पाहिजे. आमचे घरचें कजियाचें वर्तमान आपणास मागें सांगितले होते, त्यास कागद पाठवावयाचे आपणास स्मरण जाहलें नाहीं. त्यास हालीं पत्र पाठविलें आहे. तरी प्राचीन गांव **बुरंबाड** राजश्री **केसोबा नाईक सरदेसाई** यांचा वतनी. यांणीं **बुरंबाड**करांस जागा साऱ्यांस दिल्हे त्यास आम्ही राहिलों आहों. हे ठिकाण **सरदेसाई** यांणीं वो रो **सोमनाथभट भिडे** यांसी दिल्हे होते. तो कांहीं दिवस ठिकाणावर होता, तो मृत्य पावला. पोटीं पुत्रसंतान नाहीं. यास्तव वो रो. **कृष्णंभट साठे** हे त्यांचे जावई, यास्तव **सरदेसाई** यांसी पुसोन ठिकाण **कृष्णंभट** यांचें स्वाधीन केले. **कृष्णंभट साठे** हे आमचे आजे, त्यास आजिपरियंत आम्हाखालीं ठिकाण आहे, त्यास राजश्री **राघो पनदेव** व यांचे भाऊ आम्हांजवळ ठिकाणाचा कजिया लाविला आहे कीं, ठिकाण आमचें. त्यावरून आम्ही रा **सरदेसाई** यांजकडे जाऊन न्याय केला. त्यास **सरदेसाई** यांणीं आम्हांस पत्र करून दिल्हें आहे; परंतु **राघो पनदेव साठे** कजिया करितात. **त्यांस** आपणास मागे सांगितले आहे, याप्रमाणे ताकीदपत्र पाठवावे. ज्याप्रमाणं कागदांत मजकूर लिहिला आहे, त्याप्रमाणे सनदेत मजकूर ल्याहावा. तुम्ही दरबारीं राहाता. त्यास कांहीं अधिक खुलासा काढून ताकीदपत्र लौकर पाठवावीं. कागद वाचून पाहाणें, फाडून टाकावा. बहुत + काय लिहिणें हे विनति. आम्ही मजकूर लिहिला आहे तोच मजकूर **देसाई** यांणीं आम्हास कागद करून दिल्हा आहे, त्यांत मजकूर तोच आहे, हे विनंती. +

+ राजश्री **सिवाजी नारायेण भावे** यांसी पत्र लिहिले आहे. हे त्यास पावतें करणें. आमची समई **सिवाजीपंत** यांचे घरीं आहे ती तुमचीं माणसें खालीं आलीं तर समई आमची पावती करणें. हे विनती. +

---

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा.

( 48 ) In this letter, Babubhat Sathe of Burambad writes to Laxman Ballal Joshi how this village of Sardesai came in the family of Bhide and Sathe. Laxman Ballal's family belongs to this village and Vaidya Brothers were their nearest relatives. The Sathe family's book of their history does not give the required information of their relation with Bhide of Burambad. The Mavalankar i.e. Sardesai family's book of their history is useful only in knowing how Sathe family got the Mahajanki from Sardesai. The date of the letter is uncertain. The letter is informative only.

---

No. 49 श्री+शंकर+ का. व. ५।१६७१

शनिवार

नवंबर १८, १७४९

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री **नारोपंत गद्रे का। भुगाव** वगैरे गोसावी यासी—

सेवक **विस्वनाथ भट वैद्य** कृतानेक नमस्कार. विनंति उपरी. येथील क्षेम जाणोन स्वकुशल लिहीत जाणें. विशेष तुम्ही **कालोजी** जासुदा बराबर पत्र पाठविलें तें पावोन वर्तमान अवगत जाहालें. त्यावरून आम्ही स्वार होऊन कार्तीक पंचमी मंदवारीं लस्करास येऊन राजश्री **रघोजी बावांची** भेटी जाहाली. तुम्हांस कलावें म्हणोन लिहिले आहे. तेथें तुम्हांजवळ घोडीं आहेत. तीं कुल लाहान मोठीं आम्हाकडेस पाठवणें. तुम्ही आपणांस येक घोडें बसावयास ठेऊन वरकड घोडीं व सिंगरें त्यास बारगीर लागतील ते ठेऊन सत्वर घोडीं पाठवणे व जासूद बरोबर देणें. तुम्ही तेथें आठ पंधरा दिवस राहोन मौजे **टेकाडी** वगैरे कामाकाजाचा बंदोबस्त करणें. बाकीसाकी कांहीं बसूल करावयाची असेल ते वसूल करणें. चौरोजीं मागाहून गांवच्या ताकिदी वगैरे कामाकाजाच्या ताकिदी पाठऊन देतों. कललें पा. जीनखोगरांची डागडुजी करून सामान मजबूद करून घोडीं सत्वर पाठवणें. जीन येकदोन नसतील तर नवे घेणें. कांहीं यैवज जमा जाहाला असेल तो पाठवणें. व पागेचें पाल व कंठाळ आसेल तें पाठवणे. + बहुत काये लिहिणें हे विनति. +

सेवक **केसो हरी सावरकर** कृतानेक सां। नमस्कार विनति उपरी. लिखितार्थ परिसिजे. सेवकावर कृपा करीत जावे, हे विनति. तुमचे घरचीं मुलेंमनुशें सर्व सुखरूप आहेत. तुम्हांस कन्यारत्न जाहालें तें कललेंच असेल. कृपा कीजे हे विनति.

---

+ मधील मकूर **विश्वनाथभटा**च्या हातचा.

( 49 ) Vishwanathbhat writes to Naro Anant Gadre who was at Bhugaon, certain hints about the revenue collection and the care of horses which were with him. In this letter the day of Vishwanhthbhat going to see Raghuji is definitely given. The very day is given to this letter. Bargir is a horsemin and Jasud is a messenger.

---

No. 50 श्री कार्तिक वद्य १०।१६७१
नवंबर २३, १७४९

चिरंजीव विजयीभव राजमान्य राजश्री **बाळंभट** व **विस्वनाथ भट वैद्य** यासी प्रती **केसो बाहिरव वैद्य** आसीर्वाद उपरी. येथील कुशल ता। कार्तिक वद्य दसमी पावेतों मु॥ पुणे सुखरूप असो विशेष. राजश्री **रामाजी मल्हार** याजकडून पाच हजार रुपये रा। **गोविंद सामराज** यासी देविलेत व रा। **दाजी बावाजी** यांसी रुपये तीन हजार येकून आठा हजारांची चिठी केली, ते त्यांस येथें **बाबूराव मल्हार** यास देवाज्ञा जाहाली. आज सा रोज जाहाले येथे आम्ही **रामाजी मल्हार** याजवळ गेलों होतों, तुमचें व **आपाजी**पंताचें पत्र दाखविलें. त्यास त्यांणीं सागितलें कीं, **बाबा**पासून वीस हजार रुपये तुमचे वारावयासी घेऊन गेले, त्यास त्यांणीं कोणास दिल्हे हे न कळे. प्रस्तुत प्रसंग यैसा आहे. ह्या दिवसीं रुपये मिळत नाहीं, तुमचे रुपये व्याजें घेतले आहेत, दोन च्यार महिनेयांनीं तुमचे रुपये येतील. कांहीं चिंता न करावी. यैसें त्यांहीं जाब दिल्हा, येथें प्रस्तुत निकड करितां नये. याजकरितां पत्रें माघारीं पाठविलीं आहेत. बहुत काये लिहिणें हे आसीर्वाद.

( 50 ) Keso Bahirao Vaidya writes to Vaidya Brothers that Rs. 5,000 to Govind Samraj and Rs. 3,000 to Daji Bawaji were to be paid by Ramaji Barve at their word. Kesopant had gone to Ramaji Malhar to demand money, he owed to Vaidyas. He knew from him that Baburao Malhar died six days ago i. e. on 18-11-1749 and he had taken Rs. 20,000 from him to pay the debt. But he did not know to whom he paid the money. However, he assured Kesopant, that the sum would be returned in 2 or 4 months. This letter definitely gives the date of Baburao Barve's death.

---

No. 51 श्री २ मोहरम

मार्ग. शु. ४।१६७१

डिसेंबर २, १७४९

नकल

सिका आहे

आज्ञापत्र राजश्री **येसवंतराव माहादेव खासनिवीस** ता। मोकदमानी का। **बावधन** सां। हवेली **वाई** सुा।खमसैन मया आलफ. राजश्री **बाळंभट** व **विस्वनाथभट वैद्य** यासी राजश्री **स्वमींनीं** जमीन का। मा।र पैकीं बिघे ८। तीस इनाम पेसजी दिल्हा आहे. त्याप्रमाणे चालवणे. उजूर न करणें. जाणिजे छ २ मोहरम. या पत्राची नकल लेहून घेऊन आसल पत्र भोगवटीयासी देणें. छ मा।र ( मोर्तब सुद )

( 51 ) This paper proves that Shahu was transacting state business two weeks before his death, which took place on 15-12-1749. This letter is an order, issued to Mokadam of Baodhan, not to bring any obstruction to Vaidya Brothers, for the enjoyment of the Inam lands granted to them by a Sanad of 23-3-44, by Khasanivis alias Potnis.

---

No. 52 श्री छ. ४ मोहरम

पा। मागसीर्ष वद्य २ मोहरम

मार्ग. शु. ६। १६७१

डिसेंबर ४, १७४९

पुरवणी राजश्री **विसाजी रघुनाथ वकील** गोसावी यासी—

विनति उपरी. राजश्री **येसवंतराव** व **बऱ्हाणजी बावा मोहिते** व **सदासिव दिक्षित** व **कोनेरपंत** व **विसाजी गोविंद** यांसी पत्रें पाठविलीं आहेत. त्यास तुम्ही वाचून पाहून देयाचीं असतील त्यांस देणे अगर न द्यावयाचीं असतील, तर न देणें. आम्ही **निर्मळ** प्रांते आसो. तर पत्राचे उत्तर सत्वर पाठवणें. छ ४ मोहरम. जाब सत्वर पाठवणें बहुत कायेलिहिने हे विनंति. + ( मोर्तब सुद )

---

+ मधील मजकूर रघूजीचे हातचा.

( 52 ) This paper reveals Raghuji's reluctance to go to Shahu's presance as required. He is loitering during the journey and not hastening to go to Satara. Sadashiv Dixit is, by Surname, Thakar.

No. 53

श्री+रामोजयति+

मोर्तब चौकोनी

१६ मोहरम
मार्ग. व. ४। १६७१
डिसें. १६, १७४९

राजश्री **बालंभट वैद्य**. गोसावी यांसी.

स्नों **खंडोजी गोगवले** हवालदार माहालभांडारग्रह दंडवत विनंति उपरी. बा। येवज हवाला राजश्री **रघूजी बावा** भोसलेपैकी देणें. * **दरुणीमहाल बाडा पहिला** ता। **लिंगापा नाईक तांबेकर** रुपये १०००० दाहा हजार देणें, छ १६ माहे मोहरम सुा। खमसैन मया अलफ+हे विनंति पर. ( मोर्तबसुद ).

बार

---

+ मधील मजकूर लेखकाच्या हातचा. * अंतःपुर, जनानखाना.

( 53 ) Balambhat Vaidya was asked to pay Rs. ten thousands to Lingappa Tambawekar by Khandoji, Gogawale, the manager of the Treasury of Sakawarbai, for Raghuji Bhosle who owed money to her.

---

No. 54

छ २१ मोहरम
मार्गसीर्ष वद्य ८। १६७१
डिसेंबर २१, १७४९

राजेश्री **नारो अनंत** दिमत **विस्वनाथभट वैद्य** कमाविसदार कर्यात **भुगाऊ** गोसावी यासी.

दा। अखंडितलक्षेमी आलंकृत्य राजमान्ये स्नों **साबाजी भोसले** दंडिवत

(शिक्यांतील मजकूर) सुा। तिसा आर्बैन मया आलफ. गोमा × × मीर**खानमो**

० श्री ‿ **सेबु** माजे **भागदूर** याचे बैल दोन तुम्ही चावडीहून नेलेत.

रघुवीर चर तरी सदरहू बैल **मोरखानाचे** हवाला करन. उजर असले तरी

णी तत्पर सा हुजूर येन. बैल घेऊन येन. या कामास जासूद **हर्तीबाई जानी**

बाजी भोसले ता। देवडी पाठविल आहे. यास रुपया येक देन. जानीजे.

निरंतर ता। छ २१ माहे मोहरम बहुत काये लिहिने ( श्री मोर्तुब सुद )

( 54 ) This letter is, probably the whole, in the hand of Sabaji Bhosle. The Seal and the Mortab are also on it in an octegon shape. The seal differs, a little from the one given in P. D. 20·167, photoed.

---

No. 55 श्री २५ मोहरम

शिक्का व मोर्तब मार्गशीर्ष व. १२।१६७१

अष्टकोनी दुहेरी डिसेंबर २५, १७४९

पत्रावर आहेत.

राजश्री **विष्णुपंत** गोसावी यासी.

दा। अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नों **रघोजी भोसले सेनासाहेब सुभा** दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें ते प्रविष्ठ होऊन लेखन अभिप्राय कळो आला. पत्रीं कितेक पर्यायें दृष्टांत द्राष्टांतें करून लिहिलें. ऐसी यासी आपण उपरोधें करून ल्याहावे ऐसें काय आहे ? कर्जावामाविसीं अधिक उणें चार दिवस लागले, म्हणून चितांत कल्पना आणावी यैसे नाहीं. लस्कराच्या वोढीचा प्रसंग पहिल्यापासून तुम्हांस अवगतच आहे. त्यामध्यें आपल्या ठायीं द्वैतार्थ आहे ऐसें नाहीं. आमचें न्यून तेंच आपण पूर्ण करीतील येदर्थी भरवसा आपलाच आहे. या सरदारीचें अगत्य तुम्हांसच आहे. या उप्रातिक थोडक्याच दिवसांत कर्जाचा यैवज पाठवून देतों, येविसीं समाधान असो दिल्हे पाहिजे. राजश्री **राघो विष्णू** व राजश्री **नारो दादाजी** येथें आहेत. हेही आपणांस लिहितील. वरकड कित्येक वर्तमान राजश्री **वेसाजी रघुनाथ** व राजश्री **अंबाजीराम** सांगतां कळों येईल, सदैव पत्रद्वारे कुशळवृत्त लेहून संतोषवीत असिलें पाहिजे. रा. छ २५ मोहरम. + बहुत काये लिहिणें. हे विनंती. + ( मोर्तबसुद ).

---

+ मधील मजकूर **रघूजीं**च्या हातचा.

( 55 ) Raghuji Bhosle writes to Vishnupant probably one of the administrators of Sagunabai, the Queen, that the debt money will soon be sent. The letters, sent by Ragho Vishnu and Naro Dadaji will make it clear why the money is delayed. Vishwanathbhat and Ambajiram, who had, he expected, reached Satara, might have given the details. Vishnupant's surname is Gadre. Her two other agents were Devajipant Lapate and Mahadji Salokhe (Dubal). (P.D. 18 · 86, 88).

---

No. 56 श्री

नेहमीचा शिक्का व मोर्तब छ. २५ मोहरम

पत्रावर आहेत. मार्ग. व. १२।१६७१

डिसें. २५, १७४९

राजश्री **बाळंभट वैद्य** गोसावी यांसी.

दा। अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नों **रघोजी भोसले** सेनासाहेब

सुभा दंडवत विनति उपरि. येथील कुषल जाणून स्वकीयें कुशलें लेखन करीत गेलें पाहिजे. आपण पत्र पाठविलें तें पावोन लिहिला अर्थ कळो आला. महाराज राजश्री स्वामीस विनतिपत्र लिहून राजश्री **विसाजी रघुनाथ** व राजश्री **अंबाजीराम** पाठविलें आहेत. सविस्तर वर्तमान सांगतील, त्यावरून कळों येईल. या उपरी आमचेही कूच होऊन **तुळजापूर** प्रांतें येतों. दरबारचें वर्तमान वरचेवर लिहून पाठवीत जावें. सदैव पत्रीं कुशलार्थ लेखन करून संतोषवीत गेलें पाहिजे. रा छ २५ मोहरम. + बहुत काये लिहिणें. हे विनति. + ( मोर्तबसुद )

---

+ मधील मजकूर **रघूजी**च्या हातचा.

( 56 ) This letter was written by Raghuji to Balambhat Vaidya with the intention that he should inform the Maharaja why his coming was delayed. Ambajiram may be Mahadik. Letters of the same contents were sent by Raghuji to Konappa Purandare, Bhikajipant and Bhaskarrao Panditrao.

---

No. 57 श्री सांब २९ मोहरम

पौष. शु. १। १६७१

डिसेंबर २९, १७४९

नकल

राजश्री **विस्वनाथ भट वैद्य** स्वामी गोसावी यासी.

सेवक **कासिनाथ भास्कर** कृतानेक नमस्कार विनंति उपरी. तुम्हांपासून बाबत पा **सुरंजी** वगैरे रुपये २३००० तेवीस हजार घेतले, यांसि व्याज दरमहा दरसदे रु. १ येक प्रों आसे. जाले मुदतीचें व्याज व यैन हिसेब करून देऊं. मिती पौष्य सुध प्रतीपदा छ. २९ मोहरम सुा खमसैन मया अलफ. बहुत काये लिहिणें हे विनति.

सदरहू यैवज येणे प्रों.

२०००० पा **सुरंजी**

२००० पा **कुरंदखेडी**

१००० **म्हसांग** व **लाखणवाडा** येथील घासदाणा व मालपो

२३०००

( 57 ) Kasi Bhaskar Kolatkar gives to Vishwanthbhat a raceipt of Rs. 23 thousands, paid to him in advance, before the Collection of revenue of the three villages, at an interest of Re. 1 p. c. p. m. It is doubtful whether Kasiba was born in 1744, at Kashi, as he was giving a receipt at the age of 5.

---

# वैद्यघराण्याची १५० वर्षांवर तीन अमदानींतील स्वराज्यसेवा

## [ छत्रपति, पेशवे व राष्ट्रीय सभा ]

लेखक :— **परिचित**

वैद्य–घराण्यांतलि आद्य पुरुष श्री. रघुनाथभट वैद्य हे रत्नागिरी जिल्ह्यांतील लावगन गांवचे राहणारे. शिवछत्रपतींचे काळात ते देशावर आले. यांना भास्करभट, बाळंभट व विश्वनाथभट असे तीन मुलगे. भास्करभट हे शाहूमहाराज यांचे विश्वस्त सल्लागार होते. छत्रपतींनीं बाजीराव यांचे कारकीर्दीत यांच्या सेवेबद्दल कांहीं गांव व जमिनी इनाम दिल्या. ते १७३९ सालीं वारले. यानतरचे काळांत दोन भाऊ बाळंभट व विश्वनाथभट यांचा बोलबाला शाहूमहाराज यांचे दरबारीं बराच झाला. विश्वनाथभट हे फार हुशार होते. शाहूचे दरबारीं रघूजी भोसले, आंग्रे, अमात्य, वगैरे सरदार यांस आपले वकीलच मानीत. यांचे सल्ल्याशिवाय हे कोणतीच गोष्ट करीत नसत. राजकीय सल्ल्याबरोबर पैशांची सोयही ते सर्व मराठे सरदारांना जरूर तेव्हां करून देत. यांचे काळांत वैद्यांचा सालाचा देवघेवीचा आढावा ३० । ३५ लाखांचेवर असे. छत्रपति, पेशवे, भोसले, अमात्य, आंग्रे या सर्वांस ह्यांनीं पैशाची भास्करभटांप्रमाणें मदत केली आहे. शाहूमहाराज यांचे मृत्यूचे वेळीं नागपुराहून रघूजी भोसले यास घेऊन येणेच्या कामगिरीवर विश्वनाथभट यांचीच योजना केलेली होती. राजकीय सल्लागारी, सरदारांची वकिली व सावकारी या तीन कामगिऱ्या हे करीत असत. १७५३ मध्यें बाळंभट वारल्यावर एकटे विश्वनाथभट हें काम पहात. ५७-५८ सालांत १–१॥ हजार माणसे बरोबर घेऊन हे काशीयात्रेस सर्वत्र पूर्वयोजना करून गेले होते; परंतु बनारसजवळ अबदालीचे लोकांनीं यांना अटक करून ठेवलें होते. साठ हजार रुपये देऊन सुटका करून घ्यावी लागली. पानिपतानंतर विश्वनाथभटांचे चिरंजीव बापूराव वैद्य हे नाना फडणिसाचे समवयस्क असल्यामुळें त्यांचे सान्निध्यांत होते. त्यांच्या मुत्सद्देगिरीचा उपयोग नानांनीं पुष्कळ ठिकाणीं करून घेतला. त्यांनीं पेशव्यांचे नागपूरचे दरबारीं वकील म्हणून यांची योजना केली होती. अहल्याबाई होळकर व पेशवे यांचेमध्यें जमाखर्चाचे बाबत वाद उत्पन्न झाला तेव्हां हें काम बापूराव यांचेकडे त्यांनीं सोंपविलें होतें. त्याचप्रमाणें खर्ड्यांचे लढाईपूर्वी निजामाचे हिशोबाबाबत बापूराव यांस हैद्राबाद येथें १७९३ सालीं पाठविले होते. १७९५ त या हिशेबाबाबतच खर्ड्याची प्रसिद्ध लढाई झाली. या वेळीं नागपूरकरांना लढाईवर आणण्याची कामगिरी बापूराव याचेवर सोंपविली होती. यांचे चिरंजीव नारायणराव हे नानांचे विश्वासांतलि शिष्य असल्यामुळें तेही हजर होते. तसेंच बाळंभट यांचा नातू रघुनाथराव हाही नारायणराव यास मदत करणेस हजर होता. या लढाईचे सरसेनापति ऐत्या वेळेस परशरामभाऊ पटवर्धन यांस नेमलें होतें. यांचा रघुनाथराव वैद्य हा जांवई होता. यानें या लढाईचीं बातमीपत्रें वडील कृष्णराव यांस पाठविलीं होतीं. अशा रीतीनें वैद्य कुटुंबांतील तिघे या लढाईवर हजर होते. बापूराव १७९५ सालीं हवापालट करण्यास टोक्यास गेलें

चिरंजीव नारायणराव यांस नाना फडणीस यांनीं भोसले दरबारीं वडिलांच्या जागीं वकील नेमलें. अशा रीतीनें ही तीन पिढ्यांची परराष्ट्रीय वकिली चालू होती. परंतु शेवटच्या बाजीराव गादीवर आल्यावर नाना फडणीस व त्यांचे सहकारी यांना फार त्रास झाला. नारायणराव यांनाही मार खाऊन कैद भोगावी लागली. नागपूरकर भोसले यास तैनाती फौज स्वीकारूं नका असा सल्ला देणारे नारायणराव होते, म्हणून ब्रिटिश रेसिडेंटांनीं त्यांचेविरुद्ध खटपट करून त्यांना नागपूरचा संबंध तोडणें भाग पाडलें, व याबरोबरच तिकडील ३०।४० गांवचे उत्पन्नासही मुकावें लागले. बाजीरावानें वसईचा तह केला, तेव्हां ते वसईस हजर होते. पण तहाचे वेळीं ते हजर नव्हते. ब्रिटिशांविरुद्ध कट करण्याचे त्यांचे सर्व प्रयत्न फसले. हे गृहस्थ फार उदार होते. यांनीं १७ वेळां घरावर तुळशीपत्र ठेवून ब्राह्मणांना संपत्ति लुटण्यास सांगितली अशी आख्यायिका रा. ब. देशमुख, लोकहितवादी, यांनीं ऐतिहासिक गोष्टी, भाग २ मध्ये प्रसिद्ध केली आहे ती अशी:—

'नारायणराव वैद्य वाईकर हे नागपुरास भोसले सेनासाहेब सुभा याजकडे पेशव्यांचे वकील होते. त्यांचे दातृत्व इतके होतें कीं, त्यांनीं तर १७ वेळ आपण व बायको घरातून बाहेर निघून घरादारासह सर्व दौलतीचे सर्वस्वदान केले, तरी त्यांचा पुनः संसार जमून ते लाखो रुपयांचे धनी बनले. याकरितां पेशवाईत हे एक कर्णच होते, असे म्हणण्यास हरकत नाहीं. एके चंद्रग्रहणांत याचे घरीं भोसले सेनासाहेब सुभा यांजकडून एक लाख रुपयांचा भरणा झाला असतां रात्रीं ग्रहणात त्यांनीं तो सर्व वांटून दिल्यामुळे कांहीं राहिले नाही; हे समजल्यावर भोसले यानी पुनः एक लाख रुपये त्यांजकडे पाठवून दिले!'

वांई–धोम रस्त्यावर ६ मैल आंब्याचीं झाडें लावलीं व त्याचीं फळे सर्वांस घेण्याचें मुक्तद्वार ठेवलें. अद्याप लोक त्या झाडांचे आंबे फुकट नेतात. मुत्सद्दी ( डिप्लोमॅट ) म्हणून त्यांचा लौकिक होता. अखेरचे त्यांचे दिवस कष्टाचे गेले. ते मिळकत विकून निष्कर्जी झाले. संन्यास घेऊन १८२८ त ते वांईस समाधिस्थ झाले. मराठी साम्राज्याशीं निष्ठने राहावयाचे ठरविल्यामुळे त्यांचें सर्व गेले, परंतु त्यांनीं त्याची पर्वा केली नाही. १८२८ ते १८५८ पर्यंतचा काळ हा ब्रिटिश दहशतीचा होता. रंगो बापूजी वगैरेंचे हाल याच काळात झाले. बंडाची झळ साताऱ्यास थोडी लागली, परंतु नानासाहेब पेशव्याचे बंड म्हणजे ब्रिटिशांच्या साम्राज्याच्या शेवटाची ही सुरवात होती. धक्का देतां येतो एवढी गोष्ट तेव्हां सिद्ध झाली होती. नंतर सनदशीर मार्गाने चळवळ करावी, असे वारे वाहूं लागले. श्री. महादेव गोविंद रानडे, दादाभाई नौरोजी, बद्रुद्दिन तय्यबजी, चिपळूणकर, टिळक, गोखले, वगैरे मंडळींनीं या मार्गाचा पुकारा केला. पुण्यास कॉंग्रेस, सार्वजनिक सभा, वगैरे चळवळी सुरू झाल्या. सातारा जिल्ह्यांत वांई या गांवास प्राधान्य होतें. माधवरावजी रानडे यांचे विश्वस्त रामकृष्ण माधवराव ऊर्फ श्री. नानासाहेब वैद्य यांनाच त्यांनीं वाईस सार्वजनिक सभा, छोटी कॉंग्रेस, लवाद कोर्ट, वगैरे चळवळी करण्यास सांगितल्या व 'वृत्तसार'

या नांवाचे वर्तमानपत्र काढण्यास लावले. नानासाहेब १८४५ त जन्मले होते. ऐन तिशींत ते जोमाने हीं सर्व कामें करीत असत. सातारा जिल्ह्याचे ते एक प्रमुख पुढारी होते. महाबळेश्वरीं जाणाऱ्या येणाऱ्या गव्हर्नराकडे गाऱ्हाणीं मांडण्याचा त्यांचा सपाटा फार मोठा होता. लो. टिळक, ना. गोखले यांचेशीं त्यांचा चांगला परिचय होता. यांची सनदशीर चळवळ सरकारास जाचक होऊं लागली, तेव्हां वाईंतलि १३ ब्राह्मण मंडळीवर बांबाचे प्रकरणांत खटले भरले गेले व नानासाहेब यांस १ महिन्याची सर्वा-पेक्षां जास्त शिक्षा रॅंड साहेब, सातारचे हंगामी कलेक्टर असतांना देवविली.

'वृत्तसार' पत्राचा लौकिक व दबदबाही त्या वेळीं बरा होता. नानासाहेब वृद्ध होत चालल्यावर त्याचे सार्वजनिक कामाची जबाबदारी त्यांचे मुलगे भाऊसाहेब वैद्य यानीं पत्करली होती. तसेच एक चिरंजीव डॉ. आनंदराव लो. टिळक यांनीं काढलेल्या प्लेग हॉस्पिटलवर काम करीत होते. आनंदराव हे १९०८ सालीं प्लेगनें वारले व भाऊसाहेब हे १९१२ साली वारले. सार्वजनिक काम व पत्रकर्ते हाच भाऊसाहेब याचा व्यवसाय होता. द्रविड हायस्कूलचे स्थापनेत ते एक प्रमुख होते. द्रविड बधूंकडून मोठी देणगी मिळविण्यांत त्यांची खटपट फार होती. वैद्यांचें वाईचें एकत्र कुटुंब हे एक आदरणीय दृश्य होते. नानासाहेब याचे बंधु अण्णासाहेब हे प्रथमतः 'वृत्तसार' पत्राचे संपादक होते. या मोठ्या कुटुंबांतील मुलाचे शिक्षणाची सर्व जबाबदारी नानासाहेबांचे पुतणे शंकरराव वैद्य यानीं नोकरी करून पत्करली होती. साताऱ्यास १९०३ ते १९१० पर्यंत हायस्कूलमध्ये शिक्षक असतांना प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ हेडमास्तर गणेश व्यंकटेश जोशी याच्याशीं त्यांचा निकट संबंध आला होता. लोकमान्य शिक्षा भोगून आल्यावर वाईस आले होते तेव्हा ते नानासाहेबांचे-कडेच उतरले होते. पुण्यासही १।२ वेळा टिळकांस भेटण्यास नानासाहेब गेले होते. त्या वेळीं त्यांनीं बाबूराव यांस बरोबर नेऊन ओळख करून दिली होती. सार्वजनिक काम हा वैद्य घराण्यातील व्यवसायच होता. म. गांधी याचे असहकारितेचे चळवळीस वैद्य घरण्याचा पाठिंबा असे. बाबूराव वैद्य यांनीं १९२० सालीं न्यू. पूना कॉलेज सोडून ते टिळक महाविद्यालयाचे पदवीधर झाले व साताऱ्यास 'समर्थ' नांवाचे साप्ताहिक काढून जिल्ह्यात पुष्कळच जागृति केली. श्री. भाऊसाहेब सोमण यांचे ते विश्वासांतील असे एक आहेत. १९२३ ते ३८ सालापर्यंतच्या जिल्हा सभा व कॉंग्रेस यांत ते प्रमुखपणानें होते. कॉंग्रेसच्या मुंबई व दिल्ली कौन्सिलांचे निवडणुकींत 'समर्थ' पत्राच्या सेवेचा मोठा वांटा आहे. १९३७ सालीं कॉंग्रेसचें पहिलें मंत्रिमंडळ निवडण्याचे वेळीं पक्षपुढारी मि. नरिमन का श्री. बाळासाहेब खेर अशी परिस्थिति निर्माण झाली होती, तेव्हां श्री. सोमण यांनीं आपली सर्व पुण्याई खर्च करून श्री. नरिमन यांस आग्रह सोडण्यास लावला. त्या वाटाघाटींत बाबूराव वैद्य व बुवा गोसावी हे सोमणांचेबरोबर होते. गांधी-युगांत 'वृत्तसार'चे संपादक गोविंदराव वैद्य, त्यांचे चुलतबंधु माधवराव वैद्य ( वाई इलेक्ट्रिक कंपनीचे मॅ.

यथाशक्ति यथामति देशसेवा करीत आहेत. १९४५ सालीं बापूरावांनीं आपल्या महाबळेश्वर येथील आनंदवनभुवनमध्ये म. गांधी यांचे हस्तें **प्रवृत्ति व निवृत्ति** असे दोन वटवृक्ष लावून गरीब विद्यार्थ्यांस मोफत उतरण्याची सोय केली आहे. नानासाहेबांचे एक चिरंजीव दत्तोपंत वैद्य यानीं टाटांचीं धरणें, विजगापट्टम येथील शिपयार्ड व ब्रह्मदेश येथील इरावतीवरील पूल यांवर मेकॅनिकल इंजिनियर म्हणून उत्कृष्ट काम करून लौकिक मिळविला व आतां इनाम गांवीं कान्हाटी येथे मोठ्या प्रमाणावर शेती करून जास्त धान्य पिकविण्याचे प्रयोग चालविले आहेत. त्यांचा नोकरींतील लौकिक फार मोठा. पगाराव्यतिरिक्त पैसा माहीत नाही. रा. शंकरराव वैद्य यांनीं फलटण हायस्कूल, सातारा हायस्कूल व पुणें ट्रेनिंग कॉलेज या संस्थांत शिक्षकाचे काम केले. या संस्थांतील विद्यार्थी अद्याप त्यांना मानतात. अनेकांना मदत करणे हीच आपली सेवा असें ते मानीत आले आहेत. सरकारी कारभारांतील गरिबांना जाचक होणाऱ्या बारीक-सारीक गोष्टी सरकारचे निदर्शनास आणून त्यांत त्यांनीं चिकाटीने जय मिळविला आहे. कोर्ट-कचेऱ्यात तक्तीवर अर्ज न करतां कार्डावर केला तर चालतो ही गोष्ट घडवून आणली. मनिऑर्डरीचे फॉर्मावर मजकूर लिहिणेस अधिक जागा पाहिजे ह्यासाठीं खटपट करून तें घडविलें. कोर्ट-फी वाढली तेव्हां प्रोसेस-फीही वाढली असें समजून अनेक कोर्टांनीं वाढ प्रोसेस-फी वसूल केली; परंतु हे गैरकायदा आहे, सरकारला ती घेता येत नाहीं असे यानीं भाडण करून ती बंद करावयास लावली. कौन्सिलांत ती लाखावर घेतली होती असे आंकडेही प्रसिद्ध झाले होते. अशा बारकाव्याच्या अनेक गोष्टी त्यांनीं घडवून आणल्या. मुंबई कौन्सिल व दिल्ली कौन्सिलांत गेलीं २५-३० वर्षे कौन्सिलर मंडळीकडून प्रश्न विचारून निरनिराळे प्रश्नांचा खुलासा करून घेत. कै. राव. नारायण त्रिंबक वैद्य, श्री. देसाई, श्री. आबासाहेब मुजुमदार, श्री. विंचुरकर, श्री. सोमण, वगैरे मंडळीकडून प्रश्न विचारीत असत. इनाम गांवांसाठीं ९८ अ कलम पास करून घेण्यांत यांचेच प्रयत्न होते. इनाम गांवांचे प्रश्नांत रा. शंकरराव यांचेइतकी माहिती क्वचित् इतरांस असेल. गेलीं १५–२० वर्षे घरच्या दफ्तरातील जुन्या कागदपत्रांचे अत्यंत कष्टानें संशोधन करून इतिहासांतील अनेक प्रसंग उकलण्यास मदत केलेली आहे. त्यांनीं ४ खंड प्रसिद्ध केले असून आणखी ३।४ खंडांचे साहित्य त्यांचेजवळ आहे. ही शंकरराव यांची कामगिरी पितृऋण फेडण्याचे दृष्टीनें फारच महत्त्वाची आहे. बापूरावाचे धाकटे बंधु नारायणराव हे पुण्यास डॉक्टरीचा धंदा करीत असून आरोग्यमंडळाचे चिटणीस आहेत व आपल्या सहाध्यायांबरोबर फिरत्या दवाखान्याचे काम मोफत करीत असतात. अशा रीतीनें सतत एकामागून एक देशहित करणारीं माणसे एका कुटुंबांत क्वचित् निघतात. १५० वर्षांवर या कुटुंबाची ही राष्ट्रसेवा आहे. ही छत्रपति शाहू व पेशवे यांचे वेळची परराष्ट्रीय वकिलाची कामगिरी व कॉंग्रेस–काळामधील जनसेवा अभिनंदनीय नाहीं असे कोण म्हणेल ?

---

# जुन्या ऐतिहासिक कागदपत्रास निश्चित तारीख
# देण्यात येणाऱ्या जास्त अडचणी

'ऐतिहासिक पत्रांच्या प्रकाशना संबंधीं अडचणी' हा निबंध भा. इ. सं. मंडळापुढें वाचण्यांत आला होता. तो वैद्य दफतरातील कागदांचा खंड २ यांत छापण्यांत येत आहे. त्यांतील ६ व्या परिच्छेदात निश्चित तारीख ठरविण्यास येणारी एकच अडचण दिली आहे. आणखीही अडचणी येतात ही गोष्ट, वैद्य दफतर पुरवणी खंड १ च्या प्रस्तावनेंत पान १९ परिच्छेद ५, व रा बळवंत दत्तात्रय आपटे यांचे भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिक वर्ष २० अं. ४ व वर्ष २२ अं २ मधील निबंध यांत स्पष्ट करण्यांत आली आहे. वैद्य दफतरांतील जुनीं हस्तलिखित पंचांगें पाहून रा. आपटे यांनी मोडक जंत्रीवरून ठरविण्यांत येणाऱ्या तारखा कशा चुकतात हे मला दाखविलें. मोडक जंत्री तयार करतांना पंचांगाशी तारखा ताडून पाहिल्या असत्या तर ह्या चुका झाल्या नसत्या. रा. आपटे यांनी दाखविलेल्या चुका महत्वाच्या असल्याबद्दल माझी खात्री झाल्यामुळें त्या चुका त्यांच्या मदतीनें संशोधकांच्या नजरेस आणण्यासाठीं हा निबंध लिहिला आहे.

२ कागदांतील अधिकमास, साल, तिथी, व वार यांचे जंत्रीशी अंतर पडते हें ऐतिहासिक कागदांचे अध्ययन करणारांच्या अनुभवास आलेलें आहे. तिथी व वार यांत अंतर पडण्याचें कारण, पत्र लिहितांना जी तिथी असते ती देण्याचा पूर्वी परिपाठ असे; पण पंचांगांत सूर्योदयी असलेली तिथी प्रथमतः देतात व तीच जंत्रींत दिलेली आहे यामुळें पत्रांतील तिथी व वार यांत पुष्कळवेळां फरक दिसून येतो. दिवसाच्या मध्यंतरी लागलेली तिथी जंत्रीत दिलेली नसते ती पंचांगावरून ठरवितां येते. कारण त्यांत तिथी त्या दिवशी किती घटका व पळे असतें, हें दिलेलें असतें. संशोधकाजवळ पंचांगें असतात असें नाही यामुळें त्यास चुकीचा उलगडा करतां येत नाहीं. या कामीं पिले जंत्री उपयोगी पडते.

३ मुसलमानी महिन्याची पहिली तारीख चंद्रदर्शन ज्या दिवशीं होते त्या दिवशी असते असा पुष्कळांचा समज असतो. पण हस्तलिखित पंचांगावरून असें स्पष्ट दिसतें कीं चंद्रदर्शनाच्या दुसऱ्या दिवशी पहिली मुसलमानी महिन्याची तारीख असते. ही गोष्ट तज्ञ मुसलमानास ठाऊक आहे.

४ पिले जंत्रींत मुसलमानी महिन्याचे दिवस २९ व ३० असें एकाडएक दिलेले आहेत, ही त्यांनीं चूक केलेली दिसते. हस्तलिखित पंचांगांत पिल्यांच्या जंत्री प्रमाणें मुसलमानी महिन्याचे दिवस दिलेले नाहीत. त्यांत लागोपाठ २९ किंवा ३० दिवसांचे

महिने आढळून येतात. उदाहरणार्थ शके १७५० मध्यें जेष्ठ शु. २ गुरुवारीं सवाल महिन्याची तारीख मोडक जंत्रीत ३० दिली आहे. पण त्यांतच जिल्कादची शेवटची तारीख २९ दिली आहे. हस्तलिखित पंचांगांत या सालची जिल्काद महिन्याची शेवटची तारीख ३० दिली आहे. पिले जंत्रींत महिन्याची (मुसलमानी) पहिली तारीख चंद्रदर्शनाच्या दुसऱ्या दिवशीं धरीत नाहींत असें वाटतें. (मला तें पाहतां आलें नाहीं.) मोडकांच्या जंत्रीत मुसलमानी महिन्याचे दिवस देण्यांत धरबंद राहिलेला नाही.

५ मोडकांच्या जंत्रीत अधिक महिन्याची नोंद चुकीची दिलेली आहे. शके १७६३ व १७६४ मध्यें अधिक महिने आश्वीन व चैत्र असें दिलें आहेत. लागोपाठ दोन सालें अधिक महिना कसा आला? हस्तलिखित पंचांगांत शके १७६३ मध्यें अधिक आश्विन आहे पण शके १७६४ मध्यें अधिक महिना नाही. या गोष्टीवरून निश्चित तारीख लावण्यांत चूक होणें साहाजिक आहे हे स्पष्ट होते. म्हणून संशोधकांनीं या फरका बद्दल विचार करून हा फरक कसा टाळतां येईल हें ठरविणें जरूर आहे.

रा. आपटे यानीं मजजवळील हस्तलिखित पंचागें व मोडक जंत्री घेऊन जी टिपणें मला दाखविलीं त्याचा खुलासा खालीं देत आहे.

(अ) अधिक मासः—

| मोडक जंत्री | हस्तलिखित पंचांग |
|---|---|
| शके १७४४ अश्वीन अधिक आहे | यांत अधिक नाही. |
| शके १७४५ अधिक मास नाही | यांत चैत्र अधिक आहे. |
| शके १७६४ चैत्र अधिक आहे | यात अधिक नाहीं. |

पुरंदरे व खरे यांच्या जंत्रीत अधिक मासाचा फरक दिसून येतो.

| पुरंदरे | खरे |
|---|---|
| शके १६०९:—ज्येष्ठ अधिक | आषाढ अधिक |
| " १६१२:—चैत्र " | वैशाख " |
| " १६१४:—श्रावण " | भाद्रपद " |
| " १६२०:—वैशाख " | ज्येष्ठ " |
| " १६२२:—भाद्रपद " | आश्विन " |

मोडकजत्री शके १६५० पासून पुढें आहे यामुळे त्याबरोबर ताडून पाहतां येत नाहीं

| | |
|---|---|
| मोडकजंत्रींत शके १६८५ मध्यें अधिक ज्येष्ट दिला आहे | पंचांगांत व पुरंदरेजत्रीत तो आषाढांत दिला आहे |

(ब) मृगार्कः—मृगलागल्याच्या तिथीत फरक

| हस्तलिखित पंचांग | मोडकजंत्री |
|---|---|
| शके १७४८ जेष्ठ व० ५ रविवार | जेष्ठ व० ६ सोमवार |
| ” १७४८ वैशाख व० ३० सोमवार | जेष्ठ शु० १ मंगळवार |
| ” १७५५ जेष्ठ व० ३ बुधवार | जेष्ठ व. ४ गुरूवार |
| ” १७५६ वैशाख व. १३ गुरुवार | वैशाख व. १४ शुक्रवार |
| ” १७६३ जेष्ठ व. १ शनिवार | ज्येष्ठ व. २ रविवार |
| ” १७६४ वैशाख व १२ रविवार | वैशाख व १३ सोमवार |
| × ” १७६७ ज्येष्ठ शु १ गुरुवार | ज्येष्ठ शु. १ शुक्रवार |
| ” १७७१ ज्येष्ठ शु. १४ सोमवार | ज्येष्ठ शु. १३ रविवार |

जंत्रीत मृगेर्कः असे लिहिलेले नसतें पण त्या तिथीवर + फुली असते. तशीच फुली आर्बी व फसली सनावर असते कारण त्या सनात फरक होतो. म्हणजे नवें साल आर्बी व फसली सुरू होते. दक्षिणेत शिवराज्यापासून राजशकाबरोबर फसली सनही चालू होता व तोच सन जुन्या कागदांत असतो म्हणून मृग लागल्याच्या तिथीतील फरक संशोधकांनीं विचारांत घेणें जरूर आहे.

(क) तिथींची क्षयवृद्धीः-

× शके १७६७ च्या वैशाखांत आमावस्येची वृद्धि म्हणजे २ आमावास्या, बुधवारी व गुरुवारी अशा, मोडकजंत्रीत दिल्या आहेत पण पंचागांत वैशाख व. ३० ची वृद्धि नसून ती बुधवारी दिली आहे. जेष्ठ शु. १ ची मात्र वृद्धि म्हणजे ती गुरूवारी व शुक्रवारी दिली आहे.

६ कागदाची तारीख ठरविताना पुढील गोष्टीही विचारांत घेणे जरूर आहे

(१) नर्मदेच्या दक्षिणभागीं चांद्रमास असतो तो अमावास्येपासून अमावास्ये पर्यंत असतो म्हणून त्यास अमान्त म्हणतात. उत्तरभागी पूर्णिमान्त मास चालतो. यामुळें उत्तरभागातून दक्षिणेत आलेल्या पत्रांतील पक्षांत फरक पडणें संभवनीय आहे. तिकडील वद्य म्हणजे इकडील शुद्ध असतो. हे तारीख ठरवितांना पाहणें जरूर आहे.

(२) अमली सन जंत्रींत दिलेला नाही. हा ओरिसाकडे चालतो. माझ्या दफ्तरात तिकडील इनामगावचे हिशोब आहेत त्यांत संवत फसलीसन,वार व मुसलमानीं महिनेही दिलेले असून त्याच्या तारखा दिल्या आहेत ते जंत्रीशी ताडून पाहता संवतांत कमी २ व कधीं ३ वर्षाचे अंतर दिसून येते याबद्दल मी एक पत्र मंडळाच्या संमेलनांत वाचून या फरकाबद्दल निबंध वाचला होता या फरकाचे कारण मला अजून ही समजलें नाहीं निरनिराळ्या प्रांतात वर्षारंभ निरनिराळ्या महिन्यांत होतो असें एक कारण देण्यांत येतें पण त्यामुळे माझें समाधान झालेले नाही. या हिशोबांत रघूजी

भोसल्याच्या मोठमोठ्या सरदारांचा उल्लेख असून त्यांच्याशी वैद्याचा देवघेवीचा संबंध आलेला आहे.

## १७४२ ते १७४९ च्या कागदांतील महत्वाच्या माणसांची सूची

ही देतांना नांवाच्या पुढें त्याबद्दल त्रोटक माहिती नंतर ज्या सालांत त्याचा उल्लेख आला आहे ते कौसात लिहून त्यांतील कागदाचा नंबर दिला आहे.

———

# स्थलसूची